विश्वसाहित्य : १७ :

# 'प्रेमळ घर'

अनुवादक :

सौ. कृष्णाबाई मोटे

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबई ४

मूल्य अडीच रुपये

# अनुक्रमणिका

इतर कांहीं विश्वसाहित्य :

| | |
|---|---|
| ● धडधडतें काळीज | २–२५ |
| ● आरोपी | २–५० |
| ● एकटा | २–५० |
| ● अमेरिकन संस्कृति | २ |
| ● असा आहे रशिया | २ |
| ● ध्रुवाचा अस्त | ५ |
| ● मी विजयी आहें | २ |
| ● अखेरचा रामराम | २–५० |
| ● आशियांतील धर्म संग्राम | १–५० |
| ● बेन फ्रँकलिन | १–५० |
| ● जॉर्ज वॉशिंग्टन | १–५० |
| ● अखेरचें पान | २–५० |
| ● अब्राहम लिंकन | १–५० |
| ● स्वातंत्र्याचीं नवीं क्षितिजें | २ |
| ● हेलेनकेलर : एक व्यक्तिरेखा | १–५० |
| ● बाळपणीचा काळ सुखाचा | २–५० |
| ● प्रेमळ घर | २–५० |
| ● स्वातंत्र्यवीर | २–५० |
| ● पांच भावांची गोष्ट | १–५० |

# १. नवा मुलगा

आंद्रिसला मीं प्रथम पाहिलें तो दिवस मला अजून आठवतो. एकोणीसशें पन्नास सालच्या जानेवारींतील गोष्ट. मी त्या वेळीं सातवीच्या वर्गाचा तास घेत होतें. एकाएकीं, आमच्या शाळेच्या मुख्य अध्यापिका माझ्या वर्गांत आल्या व मला म्हणाल्या, "बाई, हा एक नवीन मुलगा आणला आहे तुमच्याकडे, लटाव्हियांतला. पोरका अनाथ निराश्रित मुलगा आहे तो. रशियाच्या युद्धकैद्यांमधून इकडे आला. मग मी सांगेन तुम्हांला याची सारी माहिती. अजून तरी त्याला इंग्रजींत कांहीं येत नाहीं. अर्थात् त्यानें कांहीं अडतें असें नाहीं म्हणा. माझी खात्री आहे तुम्ही त्याला नीट सांभाळून घ्याल. तुमचं नि त्याचं खास चांगलं जमून जाईल."

मला वाटतें बाईच्या मुखानें त्या वेळीं भवितव्यताच बोलून गेली. मला एवढें सांगून मोठ्या बाई घाईघाईनें निघून गेल्या. आंद्रिस मात्र मागें राहिला. किरकोळ अंगाचा, निळ्या डोळ्यांचा, सोनेरी केसांचा; अकरापेक्षां कांहीं त्याचें वय खास जास्त नसावें.

आंद्रिसला इंग्रजी कळत नव्हतें. पण इथें तरी रशियन किंवा लटाव्हियन कुणाला येत होतें! मी त्याच्याकडे पाहीं, तो माझ्याकडे पाही. सारा वर्ग आमच्याकडे पाहत राहिला. एक क्षण माझ्या मनांत एक व्रात्य कल्पना चमकून गेली कीं, याला इंग्रजी नसलें येत तरी खाणाखुणांची करपल्लवी तर समजेल कीं नाहीं ? करावी सुरवात! पण मी नुसती त्याच्याकडे पाहून हसलें तेवढीच. तोहि किंचित्काल माझ्याकडे बारकाईनें पाहत राहिला. हळूहळू त्याच्याही तोंडावर स्मित पसरत गेलें. पण किती लाजरें! किती सावधगिरीचें!

मला वाटतें या पहिल्या दृष्टभेटींतच भवितव्यतेनें आमची एक विचित्र गांठ मारली. आणि पुढें? आंद्रिसच्या शब्दांत बोलायचें तर 'प्रेमळ घरांत' यापुढें जें घडलें तें केवळ त्यामुळेंच. खरं म्हणजे त्यावेळीं आम्ही एक शब्दसुद्धां एकमेकांशीं बोललों नव्हतों. बोलतां येतच होतं कुठें? तरीपण या पहिल्या दृष्टिक्षेपांतच आम्हां दोघांत एक प्रकारचें स्नेहाचें-आपुलकीचें-नातें निर्माण

झालें होतें, एवढें मात्र निश्चित. किती विचित्र होतें हें स्नेहबंधन! कुठें एक किडकिडीत, निळ्या डोळ्यांचा, लहानसा, परदेशी, पोरका पोरगा आणि कुठें एक वयस्कर, लठ्ठ, जाड फ्रेमीचा चष्मा लावणारी मास्तरीण!

कांहीं वेळ तरी त्या सातवीच्या वर्गाला शिकविण्याचें व या पोरक्या मुलाकडे लक्ष ठेवण्याचें काम मला कसें काय साधेल याबद्दल मी जरा साशंक झालें. पण एवढें खरें कीं या नव्या जबाबदारींत जरा गंमत होती. आणि माझें मन ती अंगावर घेण्यासाठीं ओढ घेत होतें.

पुढें थोड्याच दिवसांनीं मला कळलें कीं, अगदीं लहानपणींच कांहीं महिन्यांचा असतांना आंद्रिसचे आईवडील दोघेही निवर्तले. त्यामुळें रिगा येथल्या एका प्रॉटेस्टंट अनाथाश्रमांत तो वाढला. पुढें १९४४ सालीं, लटाव्हियावर रशियानें स्वारी करून बॉंबफेक केली. त्या काळांत हीं पोरें कशींबशीं एकत्र तग धरून राहिलीं. त्यावर निराश्रितांच्या निरनिराळ्या शिबिरांतून त्यांच्या बदल्या होत होत अखेर हीं जर्मनींत येऊन पोहोंचलीं. दुसरें महायुद्ध संपेपर्यंत तीं तेथेंच होतीं. महायुद्धानंतर जर्मनीवर जेव्हां तीन राष्ट्रांचा अंमल सुरू झाला तेव्हां हीं मुलें ब्रिटिशांच्या ताब्यांत असलेल्या जर्मन विभागांत होतीं. तेथून 'चर्च वर्ल्ड सर्व्हिस' या संस्थेच्या मदतीनें तीं अमेरिकेंत आलीं. त्यानंतर अमेरिकेंत निरनिराळ्या कुटुंबांतून वाढविण्या करतां म्हणून त्यांना देण्यांत आलें. आंद्रिस १९४९ च्या सुमारास अमेरिकेंत येऊन दाखल झाला होता. न्यू जर्सीच्या सार्वजनिक शाळेंत त्यानें एक सहामाहीही काढली होती. तेवढ्यांतच त्याची बदली करण्यांत आली. १९५० च्या जानेवारीमध्यें त्याला जवळच असलेल्या आमच्या खाजगी शाळेंत घालण्यांत आलें.

बालसंगोपन संस्थेमार्फत आंद्रिसला ज्या कुटुंबांत वाढविण्याकरतां म्हणून देण्यांत आलें होतें, त्या घराची गणना चांगल्या सुखवस्तु व सुसंस्कृत कुटुंबांत होत होती. मात्र एवढें खरें कीं त्या कुटुंबांतील सारी मंडळी प्रौढ असून तेथें कोणी लहान मुलें मात्र नव्हतीं. पण लहान मुलें नसलीं तरी घरांत कुत्रे, मांजरें, वगैरे निरनिराळ्या प्रकारचीं पाळींव जनावरें व प्राणी इतके होते कीं त्यामुळें मुलाला एकटें वाटूं नये.

शिवाय घरमालकांची फारच मोठी शेती व बागाईत इस्टेट असून ती ते स्वतः करीत. त्यामुळें घरांत जरी थोडें औपचारिक रीतीभातीचें वातावरण असलें तरी बाहेर शेतांत काम करतांना बरीच मोकळीक सांपडे व तशीं कामें हीं कुटुंबांतील माणसें करीत असत.

खरें म्हणजे या घरमालकांच्या मनांतून आंद्रिसला दत्तकच घ्यावयाचा होता. पण त्याला कायद्याची अडचण होती. न्यूजर्सीच्या कायद्याप्रमाणें एक वर्ष पुरें झाल्याशिवाय असें दत्तविधान कायदेशीर झालें नसतें. म्हणूनच त्या मंडळींनीं आंद्रिसला चांगलें शिक्षण मिळावें या हेतूनें मुद्दाम खाजगी शाळेंत घातला.

तसें पाहिलें तर आंद्रिससारख्या निराश्रित मुलाला नीट वळण लागावें, त्याचें शिक्षण चांगलें व्हावें, या सद्धेतूनेंच कां होईना पण त्यांचे जे हे प्रयत्न चालू होते त्यांत, माझ्या मतें तरी, त्यांची जरा घाईच होत होती. परक्या परदेशांतून युद्धाच्या खाईत सांपडून वाताहत होऊन आलेला तो निराश्रित अनाथ पोरगा, तो एकदम या नव्या व्यवस्थित कुटुंबांत, तें कितीही चांगलें असलें तरी, कसा रुळणार? पण ही गोष्ट त्या मंडळीच्या लक्षांत आली नाहीं. त्याला नव्या वातावरणांत रुळायची संधि न देतांच त्या गृहस्थांनीं त्यावर शिक्षणाचा मारा सुरू केला.

पियानो व व्हायोलिन वाजवितां यावें म्हणून त्याला त्या शिक्षणाकरतां मास्तर ठेवण्यांत आले. त्यानें झटपट इंग्रजी शिकावें, बोलावें व लिहावें याकरतां शिकस्तीचे प्रयत्न सुरू झाले.

भाषेच्या बाबतींत आंद्रिसची मोठी मजेदार अवस्था होती. बर्फाचा गोळा घरंगळत खालीं जाऊं लागला कीं चिकटेल तें सारें बरोबर घेऊन जातो. तशीच आंद्रिसची स्थिति झाली होती. आंद्रिस व त्याच्याबरोबरीचीं इतर मुलें जेव्हां जर्मनींत गेलीं, तेव्हां तीं मोठ्या हट्टानें मायभाषेला चिकटून राहिली. तीं जर्मन बोलत नसत. पण जर्मनींतच राहिल्यावर हळूहळू बरेचसे जर्मन शब्द, वाक्प्रचार त्यांच्या भाषणांत येऊं लागले. सरते शेवटीं तर या मुलांची लटाव्हियन व रशियन भाषांची भेळ बनली, अगदीं ऐकणाराला गोंधळांत पाडणारी.

अमेरिकेंत आलेलीं प्रौढ लटाव्हिअन माणसें जेव्हां या मुलांशीं बोलण्याचा प्रयत्न करीत, तेव्हां तीं काय म्हणतात तें या मुलांना समजत नसे. त्या माणसांच्या मतें ह्या मुलांची भाषा म्हणजे धड ना एक भाराभर चिंध्या अशा रीतीनें लटा-व्हियन, रशियन, जर्मन, शिवाय मुलांचे असे स्वतःचे वाक्प्रचार या सर्वांची खिचडी होती. त्यांना खरी एक अशी कोणतीच भाषा येत नव्हती. पण तीं मुलें आपसांत बोलूं लागलीं कीं झक्क बोलत व एकमेकांचें आपआपसांत त्यांना छान समजे पण.

महायुद्ध संपलें तेव्हां हीं मुलें ब्रिटिशांच्या ताब्यांतल्या जर्मनींत आलीं. पण त्यांच्या खिचडी भाषेंत इंग्रजीची भर पडण्यापूर्वीच त्यांची अमेरिकेंत उचलबांगडी झाली. आंद्रिसला अमेरिकेंत येऊन वास्तविक सहा महिने लोटले होते. तरी

अजून इंग्रजीचा मात्र त्याला फारसा गंध नव्हता. त्याच्याशीं बोलतांना शाळेंत शिकलेल्या जर्मन शब्दांची आठवण करून करून मी काम भागवीत असें. पण तें सुद्धां यथातथाच.

आतां माझ्यावर पहिली कोणती जबाबदारी आली असेल तर ती म्हणजे आंद्रिसला इंग्रजी–अमेरिकन धाटणीचें–पण सरळ इंग्रजी शिकविण्याची. किंबहुना जवळच्या सार्वजनिक शाळेंतून काढून आमच्या खाजगी शाळेंत घालण्यांत त्या घरमालकांचा हाच हेतु होता कीं त्याच्याकडे विशेष वैयक्तिक लक्ष दिलें जावें.

आमच्या शाळेची गणना चांगल्या प्रतीच्या शाळांत होई. शाळेचें ठिकाणही मोठें रम्य होतें. अरण्यांतील जुन्या आश्रमांप्रमाणें भोवतीं वृक्षलतांनीं झाकळलेल्या वनस्थलींत आमच्या शाळेची इमारत बांधली होती. जवळच एक लहानसा ओढा खळखळ वाहतांना दिसे. कितीतरी वेळां त्याच्या प्रवाहावर सुंदरशीं मोठीं सफेत बदकें विहरतांना दिसत. वर्गांतून, क्रीडांगणावर, निरुपद्रवी छानदार कुत्रे पण मुलांबरोबर बागडत फिरत. त्याशिवाय आमच्या शाळेचा असा एक लहानसा तबेलाही होता. त्या तबेल्यांत एक लहानसें, शांत तट्टू जीन चढवून मुलांना बसण्याकरतां नेहमीं सज्ज ठेवलेलें असे. या सर्व गोष्टींनीं मुलांना शाळा फारच आवडत असे.

आंद्रिस आला त्या पहिल्याच दिवशीं, वर्गांतील मुलें लिहिण्याचें काम करूं लागलीं, तशीं मीं आंद्रिसला तबेल्याकडे नेऊन घोड्यावर बसविलें व फिरविलें. त्याला मोठी मजा वाटली या खेळाची. पण या सर्व खेळांतून मी त्याला इंग्रजीचे प्रात्यक्षिक पाठ देत होतें. 'घोडा' 'तट्टू' 'शेपटी', 'जीन', 'बदक' असे किती तरी नवीन शब्द शिकला तो. तट्टाला खायला देतांना 'खा' शब्दाचें ज्ञान झालें. अशाच कित्येक क्रियांतून किती तरी नवीन शब्दांची भरती झाली. आमचा हा धडा फारच मजेशीर व यशस्वी झाला. पुढें वर्गांत आल्यावर एक मुलगा, मुलगी, तट्टू, बदक, कुत्रा अशीं चित्रें काढून मीं त्याच्याकरितां एक चित्राचें पुस्तक तयार केलें. त्याखालीं मोठ्या अक्षरांत तीं सारीं नांवें लिहिलीं. आंद्रिसला या धड्याची मोठी गंमत वाटली. मोठ्या आवडीनें त्यानें ते शब्द वाचून लिहावयास घेतले.

आंद्रिस फारच झपाट्यानें शिकूं लागला. मलाही इतका हुषार व शिकायला उत्सुक असलेला विद्यार्थी मिळाल्याचें समाधान लाभलें. त्या वेळीं तो खरोखरी प्रत्येक धड्यावर फार चांगली मेहनत घेई. लिहितांना, सुरवातीलाच तो किती

स्वच्छ, सुवाच्य अक्षरांत आपले नवे इंग्रजी शब्द लिही, पण तेवढ्यानें त्याचें समाधान होत नसे. 'चांगलं, जास्ती चांगलं' असें म्हणून, फिरून तो ते सारे शब्द सुवाच्य व नीटनेटक्या अक्षरांत लिहून काढी. प्रत्येक गोष्ट सुंदर, काळजीपूर्वक व नमुनेदार करायची त्याला मोठी हौस. सर्वच बाबतींत त्याची ही हौस दिसून येई. फळा स्वच्छ करण्यासारखें साधें काम जरी त्याच्याकडे असलें तरी तो तें इतकें काळजीपूर्वक करी कीं नुसता फळा पुसून त्याचें कधीं समाधान व्हावयाचें नाहीं. तो स्वच्छ धुवून, कोरडा करून, एकही डाग किंवा ओघळ दिसणार नाहीं इतका लख्ख करण्याकडे त्याची प्रवृत्ति असे. शिवाय हें सारें काम तो इतक्या झपाट्यानें व सफाईनें करी कीं त्यांत कुणालाही एवढी खोड काढतां येऊं नये.

त्याची एकाग्रता तर कांहीं विलक्षणच होती. एकदां तो अभ्यासाला लागला कीं, वर्गात काय वाटेल तें होवो, त्याचें त्याकडे यत्किंचितही कधीं लक्ष जायचें नाहीं. त्याचे डोळे, मन, सारें आपल्या कामांत व्यग्र. शाळेच्या त्या सुरवातीच्या दिवसांत त्यानें कधीं कुणाची खोडी काढली नाहीं कीं स्वतःचा वेळही वायां घालविला नाहीं. आपल्याला येऊं लागलें या कल्पनेनें त्याला फार आनंद होई, अभिमान वाटे. तो प्रत्येक गोष्ट करी ती पण अगदीं शिस्तीनें आणि झपाट्यानें.

आंद्रिस गणितें अगदीं बिनचूक सोडवी. बेरीज, वजाबाकी, गुणाकार, लहान एक आंकड्याचे भागाकार त्याला चांगले येत होते. हें पाहून मीं मोठे भागाकार घ्यायला सुरवात केली. आंद्रिसनें लवकरच त्यांत चांगलीच प्रगति केली. त्याची ती शीघ्र ग्रहणशक्ति पाहून तर हा मुलगा चांगला हुशार निघेल अशी माझी खात्री होत चालली. कारण आमच्या लहानपणीं मास्तर नेहमीं म्हणायचे कीं लठ्ठ भागाकारापुढें मठ्ठ मुलें अडेल तट्टासारखीं अडतात. आंद्रिसच्या पुढें ही अडचण केव्हांच येतांना दिसली नाहीं. त्यामुळें तर त्याच्या हुषारीबद्दल मला कधीं एवढीशी शंका सुद्धां शिवली नाहीं.

पण एके दिवशीं मला आश्चर्याचा मोठा धक्काच बसला. एक दिवस मला असें सांगण्यांत आलें कीं, अमेरिकेंत आल्यानंतर निराश्रित मुलांची जी चाचणी घेण्यांत आली, त्यांत आंद्रिसपुढें त्याच्या बुद्धिमत्तेचा निदर्शक (I. Q.) म्हणून ६५ हा आंकडा दिला असून फारच मंदबुद्धि विद्यार्थ्यांत त्याची गणना केलेली आहे.

कांहीं काल माझा विश्वासच बसेना. शंभर I. Q. चीं मुलें म्हणजे बऱ्याच कमी प्रतीचीं असें समजतात अशा वेळीं पांसष्ट I. Q. असणारा आंद्रिस म्हणजे नुसता मठ्ठच नसून जवळजवळ अर्धवट वेडयांच्याच सदरांत पडत होता.

"खास कांहीं तरी चूक झाली आहे" मी तावातावानें बोलूं लागलें. "या मुलाचा I.Q. खरोखरच ६५ असेल तर विजारीचीं बटनें तरी त्याला धड लावतां येतील का?" मीं प्रश्न केला.

मला तरी अधिकाऱ्यांची त्या चाचणी परीक्षेंत निश्चित चूक झाली असावी असें वाटत होतें. अर्थात् ही चूक घडण्याचें कारण म्हणजे त्याचें इंग्रजीचें अज्ञान यापलीकडे कांहीं नाहीं. कारण बोलतांना पुष्कळ वेळां तो इतक्या हुषारीनें व तल्लखपणें आपल्याकडे पाही कीं पाहणाराला वाटावें जणुं कांहीं याला सारें कळलेंच आहे. पण तें त्याला कळलेलें नसे. तेव्हां त्याच्या इंग्रजीच्या अज्ञानामुळें तरी ही चूक झाली असावी किंवा एकाद्या भलत्याच मुलाचा I.Q. ह्याचा म्हणून आंद्रिसच्या पुढें चुकून मांडला गेला असावा. मीं या बाबतींत छडा लावायचें ठरविलें. पण दुर्दैव असें कीं, हा छडा लावायच्या पूर्वी मीच स्वतः आजारी पडलें. ती इतकी कीं, मला तडकाफडकीं हॉस्पिटलमध्येंच नेण्यांत आलें. जवळजवळ एक महिना मी आजारीच होतें.

हॉस्पिटलांतून बरी होऊन मी ज्या दिवशीं शाळेंत पहिल्यांदा रुजू झालें त्या दिवशीं, "बाई बाई, आलांत तुम्ही? बरं वाटतं आतां?" इ. प्रश्न करीत विद्यार्थ्यांनीं माझ्या भोवतीं प्रथम नुसता गलका केला. अर्थात् ही औपचारिक विचारपूस झाल्यावर सगळीं मुलें आपआपल्या कामाला लागलीं. आंद्रिस मात्र जागचा हलला नाहीं. कितीतरी वेळ मुकाट्यानें तो टक लावून माझ्याकडे पाहत राहिला. त्याच्या दोन्ही गालांवरून सारखे अश्रू ओघळत होते.

"आंद्रिस, काय झालं तुला? कां रडतोस असा? बरं नाहीं वाटलं तुला मी आलें म्हणून!"

त्याच्या तोंडून शब्दच फुटेना. बरें वाटलें असें सांगण्याकरतां होकारार्थी त्यानें नुसती मान हलविली. "बाई, तुम्ही मेलां नाहीं तर?" अखेर त्याच्या रुद्ध कंठांतून हुंदक्याबरोबर शब्द बाहेर पडले.

"वेडा कुठला! मी मेलें तर नाहींच, उलट किती चांगलं वाटतंय् मला!"

"पण मला वाटलं तुम्ही मेलांच. बॉंब पडला नी खलास झालां." फिरून हुंदक्याबरोबर शब्द आले.

"वेडा रे वेडा! बघ माझ्याकडे, तसं कांहीं झालं नाहीं. आणि वेड्या, अमेरिकेंत कुठें बॉंब पडतात का?"

"तें कांहीं सांगतां येत नाहीं." आंद्रिसनें साशंकपणें उत्तर केलें.

युद्धाच्या धुमश्चक्रींत झालेल्या बॉंबफेकीचा त्याच्या मनावर किती परिणाम झाला होता हें मला नंतर पुष्कळच वेळां दिसून आलें. कुणी घरीं लवकर आलें नाहीं, उशीर झाला, कीं त्याला वाटे, बॉंबफेकींत तो मनुष्य बहुधा ठारच झाला असावा. एकदां माझा मुलगा पॉल लवकर घरीं आला नाहीं. मीं सहज म्हटलें, "काय झालें पॉलला कुणास ठाऊक ? कां बरं आज इतका उशीर झाला ?"

"मेला असेल तो!" आंद्रिसचें अगदीं थंड स्वरांत उत्तर आलें.

"बॉंब पडला असेल नी खलास झाला असेल, दुसरं काय?"

पण पहिल्यांदा मीं त्याला असें बोलतांना ऐकलें, तें मी आजारीपणांतून उठून आल्यावर. मी दिसेनाशी झालें म्हणजे बॉंबफेकींत मेलें, अशीच त्याची समजूत होती. म्हणून मला परत आलेली पाहतांच त्याला एकदम गहिंवरून आलें. मी फिरून कधीं दिसेन अशी कल्पनाच नसावी त्याला.

आज त्याचे खांदे इतके वाकले होते कीं एकाद्या पोक आलेल्या माणसासारखा तो दिसूं लागला.

आंद्रिस आधींच फार किडकिडीत, त्यांतून जणुं काय साऱ्या जगाचें दुःखाचें ओझें त्याच्या खांद्यावर दिल्यासारखा खांदे वाकून चालायचा. मनानें अस्वस्थ झाला, म्हणजे तर हें पोक फारच वाढे. आज तर त्याचे ते खांदे इतके वांकले होते, कीं एकाद्या पोक आलेल्या माणसासारखा तो दिसूं लागला.

मला कां तें कळून चुकलें. मीं म्हटलें, "वेड्या, असं काय बरं ? बघ पाहूं माझ्याकडे ! माझ्यावर बॉंब पडलेला नाहीं. चांगली धडधाकड जिवंत आहें मी ! आतां वाईट नाहीं अं वाटून घ्यायचं, हं."

माझ्या शब्दांचा इष्ट तो परिणाम झाला. पोक गेलें. खांदे ताठ सरळ रेषेंत झाले. एकाद्या लष्करी शिपायासारख्या टांचेला टांच भिडवून त्यानें मला सलाम केला. "किती छान झालं तुम्ही परत आलांत तें!" असें म्हणून स्वारी वर्गांत निघून गेली.

हळूहळू माझ्या लक्षांत येऊं लागलें कीं मी नसतांना त्याचें कांहीं तरी बिनसलें असावें. तो बिलकूल पूर्वींसारखा राहिला नव्हता.

पहिल्यांदा तो आमच्या शाळेंत आला, तेव्हां किती गरीब, भित्रा, कमाल आज्ञाधारक, असा वाटायचा. इतका कीं भयंकर जरबेच्या धाकांत तो राहिला असावा असेंच आम्हांला वाटे. पण आतां ? सारेंच बदललें होतें.

ती एकाग्रता, ती अगदीं नमुनेदार काम करायची वृत्ति, तो गरीब स्वभाव,

आज्ञाधारकपणा, सारं कुठल्या कुठें पळालं होतं, कोण जाणे! स्पष्टच सांगायचें तर तो चांगलाच व्रात्य उनाड बनला होता. वरिष्ठ माणसांचें न ऐकतां, त्यांना सतावून सोडायचें, त्यांना वाटेल तशीं उद्धट उत्तरें द्यायचीं, या कामांत तो अगदीं तरबेज झाला होता. त्या बाबतींत त्याला शब्दांची सुद्धां अडचण पडत नसे.

शाळेंतील अधिकारी तर त्याच्या या वागणुकीनें चांगलेच जेरीस आले होते. युरोपांतील करड्या शिस्तीच्या वातावरणांतून इकडे मोकळ्या वातावरणांत आल्यानें त्याच्यावर असा परिणाम झाला असावा असें सर्वांना वाटे. ते त्याच्यापुढें हात टेकीत. धाक नसलेल्या मोकळ्या वातावरणांत कसें वागावें हें आंद्रिसला समजत नव्हतें, हें माझ्याही लवकरच लक्षांत येऊन चुकलें. पण याखेरीज आणखीही एक गोष्ट मला अस्वस्थ करून सोडीत होती. मीं मागें सांगितलेंच आहे कीं पहिल्या-पहिल्यांदा, मला त्याच्या बुद्धिनिदर्शका(I. Q.)विषयीं दाट शंका होती, पण आतां तपासून पाहिलं तर त्यांत चूक झाली नसावी असं वाटूं लागलं. कारण आंद्रिसची आतांची एकंदर प्रगति पाहतां, तो नुसताच मंदबुद्धि नसून, पक्का मठ्ठच असावा, असें वाटूं लागलें होतें. पुढच्या आयुष्यांत बिनडोक्याच्या हमालीशिवाय तो कांहीं करूं शकेल असें सुद्धां वाटत नव्हतें.

याचा परिणाम व्हायचा तोच झाला. ज्या कुटुंबानें त्याला दत्तक म्हणून घ्यावयाचें ठरविलें होतें त्यांना तर यामुळें जबर धक्काच बसला. एकाद्या मंदबुद्धि निराश्रित अनाथाला सहानुभूतीनें वागविणें गोष्ट वेगळी आणि असा मंदबुद्धि कुटुंबाचा भावी वारस म्हणून दत्तक घेणें ही गोष्ट वेगळी. त्यांची आंद्रिसच्या बाबतींत कमालीची निराशा झाली. बहुधा आंद्रिसलाही या गोष्टीची जाणीव झाली असावी. म्हणूनच कीं काय कोण जाणे, त्याचें त्या कुटुंबाशीं वर्तन दिवसानुदिवस जास्तच बिघडत चाललें.

पहिल्यापासूनच आम्हां सगळ्यांच्या एक गोष्ट लक्षांत आली होती, ती ही कीं, आंद्रिसला जे लोक दत्तक म्हणून घेऊं इच्छीत होते, त्या कुटुंबाची त्यानें लवकर लवकर शिकून चांगली प्रगति दाखवावी अशी इच्छा होती. किंबहुना शीघ्र प्रगतीवरच त्यांचा सारा भर होता. पण, यामुळेंच सारं बिनसलं असावं. त्या कुटुंबांत सारींच प्रौढ माणसें होतीं. त्यामुळें आंद्रिसवर सारखी नजर राही. जरा तो चुकला कीं त्याच्यावर मोकळेपणीं, चांगलीच टीका होई. प्रत्येकजण त्याला आपापल्या तऱ्हेनें सुधारण्याचा उपदेश करी. त्यानें चांगली प्रगति दाखवावी म्हणून अभ्यासांत, गाण्यांत, अधिक मेहनत करण्याचा लकडा पण त्याच्या पाठीशीं

लागे. या सर्व गोष्टींनीं आंद्रिस चिडचिड करूं लागला. त्याच्या चित्ताची स्थिरता नाहींशी होऊन, तो कमालीचा अस्वस्थ दिसे. हळूहळू हा चिडखोरपणा वाढत जाऊन भलतीच आरडाओरड, रडारड, व आक्रस्ताळी वागणूक यांत त्याचें पर्यवसान होऊं लागलें. खरें सांगायचें तर आंद्रिसची त्या दिवसांतील वागणूक, भोवतालच्या लोकांना एक न सुटणारें कोडें होऊन बसली.

ज्या कुटुंबांत आंद्रिस राहत होता त्या गृहस्थांनीं आंद्रिस मंदबुद्धि, मट्ठ ठरल्यानंतरही तो सुधेपणीं वागता, शांतपणें राहता, तर त्याची नोकर म्हणून आपल्या शेतावरच्या मजुरांत खास सोय लावली असती. पण आंद्रिसनें त्यालाही जागा ठेवली नाहीं. उघड उघड बंडखोरीचा विरुद्ध पवित्राच त्यानें घेतला. मला वाटतें, फारच थोड्या कालावधींत त्याच्या शक्तीबाहेर प्रगति करण्याची अपेक्षा केल्यानें त्याच्या कोवळ्या मनाला भलताच ताण बसला. व अधिक ताण बसल्यानें उडणाऱ्या विजेच्या 'फ्यूज' प्रमाणें त्याची अवस्था झाली.

घरीं असतांना आंद्रिसला पियानो व व्हायोलिन या दोन वाद्यांचे धडे देण्यांत येत असत. वास्तविक संगीताकडे त्याचा फारसा कल नव्हता. त्यामुळें या वयांत व त्याच्या त्या अवस्थेंत, अशा प्रकारचे दोन्ही धडे घेणें त्याला जड जात असावें, असें बाहेरच्या तिऱ्हाइताच्या सुद्धां चटकन् लक्षांत येई. पहिल्याप्रथम त्यानें त्यांतही बरीच चांगली प्रगति केली; नाहीं असें नाहीं. घरच्या माणसांना व त्याला स्वतःलाही त्यानें पुष्कळ समाधान वाटलें; पण पुढें सगळ्याच कामांची यादी भराभर वाढूं लागल्यावर हे दोन्ही धडे ओझ्यासारखे जड जाऊं लागले. तो त्यांची तयारीच करेनासा झाला. मास्तर त्याबाबत कांहीं बोलले तर त्यानें इतकीं उद्धट उत्तरें द्यावयास सुरवात केली कीं, त्यामुळें संगीताची शिकवणी बंद करणें भाग पडलें. अर्थात् ही गोष्ट त्याच्या मनाला झोंबल्याशिवाय मात्र राहिली नाहीं.

शाळेंत मीच त्याचे धडे घेत असें. तें मात्र तो मुकाट्यानें करी. लवकरच आम्हीं अपूर्णांकांना सुरवात केली. तेही तो सहज शिकला. वाचनाच्या बाबतींत-ही त्याची धीरेधीरे पण चांगलीच प्रगति होत होती.

बालबोधीचीं पुस्तकें संपल्यावर पहिल्या पुस्तकाला आम्हीं सुरवात केली. तें त्याच्या मानानें जरा कठीण होतें तरी मोठ्या नेटानें तें संपविल्याचें समाधान त्याला मिळालें. त्यानंतर दुसरींही पुस्तकें मीं त्याच्याकडून वाचून घेतलीं. तींही त्यानें संपविलीं. थोडक्यांत शाळेच्या एका सहामाहींत त्यानें तीन वर्षांचे

प्राथमिक वाचनाचे पाठ सहज पूर्ण करून टाकले. ही त्याची प्रगति पाहत असतां, त्याला मंदबुद्धि ठरवणें मला तरी शक्य नव्हतें. पण त्याच्या घरची सगळी परिस्थिति व त्याची झालेली मनःस्थिति लक्षांत घेतां आतांच त्याच्या बुद्धिमत्तेचा निदर्शक (I. Q.) काढण्यांत कांहीं अर्थ नव्हता म्हणून आम्ही त्याकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. कारण त्यावरून खरा अंदाज बांधणें जडच गेलें असतें.

असो. एक गोष्ट मात्र निश्चित दिसून येत होती कीं, अभ्यासांत जरी त्याची प्रगति होत असली तरी त्याचें शाळेंतलें वर्तन मात्र ठीक नव्हतें. त्याचा तो पूर्वीचा भित्रेपणा आणि हा नवा रानटीपणा—किती महदंतर होतें या दोन वागणुकींत! आतांशा तर त्यानें थुंकायलाच सुरवात केली होती. कधीं कधीं, वर्गात धडा चालू असतां, तो इतक्या प्रचंड जोरानें हसे कीं, त्याला आवरतां आवरतां मुष्किल होई. दुपारच्या जेवायच्या वेळीं तर तो फारच धूम करून सोडी.

आमच्या शाळेंत, दुपारच्या वेळीं, मुलांना नेहमीं गरम जेवण देण्यांत येत असे. त्यावेळीं तर प्रथम प्रथम आंद्रिस शुद्ध जंगली जनावरासारखा वागे. जें दिसेल तें सारें अन्न लुबाडून भराभर फस्त करायचें अशी त्याची संवयच होती. बहुधा युद्धकैद्यांच्या शिबिरांतील अन्नदुर्भिक्षामुळें ही संवय त्याला जडली असावी. पण त्याचा परिणाम असा झाला कीं, प्रथम प्रथम शाळेंत आला जेवायच्या वेळीं तो वकून, हात लांब करून, भराभर सांपडेल त्या मुलांच्या ताटांतलें अन्न खुश्शाल स्वतःच्या ताटांत ओढून घेई; व मग कोणीं तें घेऊं नये म्हणून खांदे वाकवून ताटाभोवतीं हाताचा विळखा घालून बसे. नंतर हळूच डोकें खालीं करून, विळखा तसाच कायम ठेवून, पुढच्या दोन्ही हातांनीं भराभर अन्न तोंडांत कोंबून, गिधाडासारखें फस्त करी. हें सारें करीत असतां दुसऱ्यांच्या पानांतून आणखी काय लंपास करतां येईल या विचारानें त्याची गिधाडी नजर भोवतालच्या पानांकडे मोठ्या अधाशासारखी फिरत राही.

हळूहळू, जेव्हां त्याचें त्यालाच कळून आलें कीं अमेरिकेंत भरपूर अन्न मिळत असून असें वागायची जरुरी नाहीं, तेव्हां त्याची वागणूक सुधारली. मग तो इतर मुलांसारखें शांतपणें बसून वाढायची वाट पाहूं लागला. चमचा, कांटा, सुरी यांनीं व्यवस्थितपणें जेवायलाही त्यानें सुरवात केली. अशा रीतीनें माणसांत आल्यावर तो शांत असतांना जेव्हां टेबलावर जेवण घेई, तेव्हां त्याच्या अंगीं असलेल्या सुंदर रीतीभाती पाहून सर्वांना आश्चर्य वाटे. पण कां कोणास ठाऊक, आतांशा त्याच्यांत एकाएकीं फिरून बदल झाला नि फिरून तो पहिल्या

वळणावर आला. फिरून त्यानें दुसऱ्यांच्या पानांतलें लुबाडून फस्त करायला सुरवात केली. चमचे, सुरी टाकून, हातानेंच तोंडांत अन्न कोबूं लागला. एवढ्यावर थांबला असता, तरी चाललें असतें, पण त्याची मजल त्याच्याही पुढें गेली. कधीं कधीं पानांतलें अन्न भोवतालच्या मुलांच्या डोक्यांवर फेकायलाच त्यानें सुरवात केली. एकदां तर तोंडांतल्या नळीनें पीत असलेल्या दुधाचा चुळकाच त्यानें दुसऱ्या मुलांच्या तोंडावर टाकला. अशा वेळीं कोणीं रागावलें कीं, तो खदखदा हसे. त्याच्या मनांत चाललेल्या धुमश्चक्रीमुळें तो फिरून बिथरून गेला असावा हें आम्हांला कळे. पण कळलें तरी इतक्या साऱ्या गोष्टी सहन तरी कशा करणार? आणि मुलांवर दाब तरी कसा ठेवणार? त्याच्यांत एकदम झालेल्या या बदलानें मुलांचा तो एक उपहासाचा विषय झाला; त्यामुळें तर तो अधिकच बिथरून गेला.

एवढें खरें कीं तो कितीही विचित्र वागत असला तरी लबाडी व नीचपणा दोन्हीं त्याच्या वागणुकींत कधींच दिसलीं नाहींत. एवढेंच नव्हे—तो असा बेताल वागूं लागला कीं पुष्कळदां मी त्याला चांगलेंच खडसावीत असें. मग तेवढ्यापुरतें अमेरिकन लकबीनें 'O.K., O.K.' करीत तो माझें ऐके व शांत होई. पण पुढें पुढें खेळतांना क्रीडांगणावर त्याची ही आसुरी वृत्ति उचल खाते असें दिसून येऊं लागलें.

एकदां तर मळसूत्राच्या बरणीचें झाकण फिरवून फिरवून काढावें तसें एका लहान मुलाचें डोकें हातांत धरून तो फिरवीत असतां माझ्या दृष्टीस पडलें. मी एकदम घाबरून जाऊन त्याचा हात पकडला व घाबरून संतापानेंच ओरडलें,

"आंद्रिस, काय चालवलें आहेस तूं?"

"मी त्याला ठार करणार होतों," आंद्रिसनें गंभीरपणें उत्तर दिलें.

त्यानें म्हटल्याप्रमाणें केलें असतें याबद्दल मला बिलकुल शंकाच उरली नाहीं. कारण खरोखरच तितक्या सफाईनें व व्यवस्थितपणें त्यानें आपलें कृत्य चालवलें होतें. अशा रीतीचें मरण ही गोष्ट आंद्रिसच्या नेहमीं पाहण्यांतली होती. माझी खात्री आहे कीं, जर त्याला मीं थांबवला नसता तर अक्षरशः मुंडी मुरगळून खास त्यानें त्या मुलाचा प्राण घेतला असता.

मुलामुलांच्या आपसांतील भांडणांतच नव्हे तर खेळांत सुद्धां त्याचा हा राक्षसीपणा जागा होतांना दिसून येई.

आंद्रिसला आमच्या बऱ्याच खेळांची तशी कांहींच माहिती नव्हती. त्यामुळें

आपण गेलों नी खेळतां आलें नाहीं कीं मुलें हसतील या भीतीनें तो नवीन नवीन खेळांत बिलकुल भाग न घेतां उदासपणें बाजूला बसून राही. मात्र खेळाकडे त्याचें मोठ्या बारकाईचें लक्ष असे. अखेर एक दिवस त्याच्या डोक्यांत शिरलें कीं बास्केट बॉलमध्यें दुसरें तिसरें कांहीं नसून चेंडू आपल्याकडे घ्यायचा व कांहीं करून दुसऱ्या पक्षाच्या हातीं जाऊं द्यायचा नाहीं. हें डोक्यांत शिरल्याबरोबर स्वारी जी ताडकन् बसलया जागेवरून उठली, ती मैदानांत, मुलांमध्यें शिरून चेंडूकडे धावूं लागली. मग काय विचारतां, वाटेंत येईल त्याला चापट्या, धक्काबुक्की, मुष्टिमोदक, गुद्दे यांचा खुराक चारून, वेळेनुसार थोबाडींत ठेवून, चावून, स्वारीनें एकदांचा चेंडू हस्तगत केला; व वाटेंत येईल त्याला सफा करीत स्वारी चेंडू घेऊन पळाली. त्याचा हा झंझावाती प्रवेश इतका अनपेक्षित होता कीं, दोन्ही पक्ष आकरून त्याच्याकडे पाहून हसूं लागले. अखेर व्हायचें तें होऊन खेळ खतम् झाला. पण एवढें खरें कीं, त्या दिवसापासून आंद्रिसला खेळाची गोडी लागली. खेळांत नीट रीतीनें भाग घेऊन खिलाडूपणा अंगीं बाणायला मात्र कांहीं दिवस जावे लागले.

या साऱ्या अवधींत आंद्रिस राहत असलेल्या कुटुंबाशीं शाळेनें चांगलेच संबंध ठेवले होते. मी आजारीपणांतून उठून आल्यावर त्या लोकांनीं 'बोलण्याकरतां' म्हणून मला भेटीला बोलाविलें.

फारच सुंदर व मोठी वाडी होती ती. वाडींत शिरल्यापासून निवासस्थानीं जाईपर्यंतचा रस्ता दुतर्फा मोठ्या वृक्षांनीं आच्छादित असल्यानें फारच शोभिवंत दिसे. निवासस्थानीं आल्यावर शिकारी कुत्र्यांनीं माझें स्वागत केलें. खरोखर कोणत्याही मुलाला आवडावे असे सुंदर व चांगले कुत्रे होते ते. आंत शिरतांना, आंद्रिसचें ह्या घरांत जुळलें नाहीं तर काय नामी संधि या पोराच्या हातून जाईल असेही विचार माझ्या मनांत आल्याशिवाय राहिले नाहींत. पण आंद्रिसला हा पोक्त विचार कुठला यायला ! अनाथ, निराश्रित असलेला तो पोर हीही सोन्यासारखी संधि फुकट दवडीत होता. घरामधली त्याची वागणूक रोजच्या रोज इतकी बिघडत चालली होती कीं, सारीं माणसें अगदीं कंटाळून गेलीं. याच तऱ्हेनें तो वागत राहिला तर काय होणार हें अगदीं उघड दिसत होतें. ठरलेल्या एक वर्षाच्या अवधीची वाट पाहणेंसुद्धां त्या लोकांना शक्य झालें नसतें.

एवढें मात्र कबूल करणें भाग आहे कीं, विचार करतां, आंद्रिसला इतकी सुवर्णसंधि नकोशी कां वाटावी याला सुद्धां तशींच कारणें होतीं.

या कुटुंबांतील सारीच मंडळी प्रौढ व औपचारिकपणाला जपणारी असल्यानें आंद्रिसच्या प्रत्येक कृतीकडे फार कांटेकोरपणें पाहत. शिवाय आंद्रिसबद्दलच्या त्यांच्या अपेक्षाही फारच होत्या. खरं सागायचं तर लहान मुलाची आवड असलेल्या पण त्याशीं कसें वागावें हें माहीत नसलेल्या माणसांशीं आंद्रिसची गांठ पडली होती. त्यांतून आंद्रिस युद्धाच्या वणव्यांतून पोळून आलेला निराश्रित नि अनाथ. तो तितका साधासुधा, गरीब कुठून असणार !

चार शहाणे एकत्र जमले कीं त्यांचें कधीं एकमत व्हायचें नाहीं, तसाच थोडासा त्या घरांत प्रकार होता. प्रत्येकजण आपापल्या तऱ्हेनें त्यावर टीका करी व त्याला शिस्त लावायचा प्रयत्न करी. याचा परिणाम व्हायचा तोच होऊन आंद्रिस कुठल्याच शिस्तींत बसायचें नाकारूं लागला. आंद्रिस चांगलाच हळुवार बनला. कांहीं केलें तरी हीं माणसें सतत आपल्यावर टीकाच करतात अशीच त्याची भावना होऊन गेली; त्यामुळें मोठीं माणसें काय बोलतात हें चोरून ऐकायची त्याला संवय जडली. तीं माणसें त्याच्याविषयीं बोलत नसलीं तरी याला वाटे तीं आपल्याचबद्दल बोलत आहेत. शिवाय, तीं काय बोलतात हें त्याला कळतही नव्हतें. तरी एकाद्या फटींत कशाच्या तरी आडोशाला लपून बसून, तो सारखें चोरून ऐकायचा प्रयत्न करी. अशा वेळीं यदाकदाचित् तो सांपडला व त्याला तेथून बाहेर घालविण्याचा प्रयत्न केला कीं, "मला माहीत आहे तुम्ही माझ्या-बद्दल बोलतां तें" असें म्हणून चिडून तो ओरडूं लागायचा.

ही सगळी वागणूक म्हणजे त्याच्या मनांत उठूं पाहणाऱ्या भावनात्मक तुफानाच्या धोक्याची सूचनाच होती.

पण त्या प्रौढ मंडळींना हें कळावें कसें ! आपण बरें करायला जात असतां त्या मुलाला त्याचें कांहींच न वाटतां तो उलटतो, अशी त्यांची समजूत होऊन आंद्रिसबद्दलचा त्यांचा राग वाढतच चालला.

चांगलीं मुलें आईबापाशीं कसें नीट वागतात तसें त्यानें वागावें म्हणून ते लोक मनापासून विनवण्या करीत. पण त्याचा सुद्धां त्यावर कांहीं एक परिणाम होईना. बाकी साहजिकच नव्हतें का तें? ज्या मुलाला आई ना बाप, अनाथाश्रमांत वाढलेला, तेथून युद्धकैद्यांच्या शिबिरांत सांपडलेला. त्याला आई, बाप, मुलगा असें म्हटल्यानें किंवा असें कितीही आळवून सांगितलें तरी काय बोध होणार !

याचा अर्थ असा नव्हे कीं त्याला त्या शब्दांचा अर्थ कळत नव्हता. तो

कळत असे. पण त्या शब्दाबरोबर तुमच्या-माझ्या मनांत उठणाऱ्या भावनांना तो संपूर्णपणें पारखा होता.

त्याला पाळायला घेतलेल्या कुटुंबाकडून याच तक्रारी ऐकूं येत. "या मुलाचें किती चांगलें करा, त्याला त्याचें काडी इतकंसुद्धां वाटत नाहीं. आम्ही कांहीं त्याच्याकरतां कांहीं करतों आहों, ही जाणीवच मुळीं त्याला नाहीं. नवीन आला तेव्हां थोडेंसें तरी काम करी, नीट वागे, पण आतां एकाद्याचा जीव चालला तरी हा उठून पाणी देणार नाहीं इतका निर्दय झाला आहे."

अशा नी आणखी किती गोष्टी. "भारी बाई उच्छाद आणतो हा. कधीं आंघोळ कर म्हटलें तर साफ नाहीं सांगतो. आंतली चड्डी सुद्धां बदलायची तर कोण मारामार करावी लागते!"

"काम करायला सांगितलें तर सदा नन्नाचा पाढा. पण रोज खर्चाला मात्र पैसे हवेत, खायला हवें, बक्षिसें हवींत, तें मात्र भरपूर पाहिजे. त्यांत जरा कमी पडलें कीं, इतका आकस्ताळीपणा करतो कीं, त्या भरांत हा कुणाला काय करील याचा नेम सुद्धां सांगतां येत नाहीं."

या साऱ्या वागणुकीचा त्याच्या बुद्धिमत्तानिदर्शक अंका (I. Q.) कडे पाहत अर्थ लावायचा म्हटला तर कोणत्याहि गोष्टीचा कार्यकारणभाव लक्षांत घेऊन वागावें इतकी सुद्धां त्याला अक्कल असल्याचें दिसत नव्हतें. खरं म्हणजे इतकी कमी बुद्धि असलेल्या मुलांना हा विचारच करतां येत नाहीं.

अखेरीला तर त्या लोकांनीं चक्क कबुली दिली कीं, या पोराचें काय करावें हें आम्हांला कळतच नाहीं. तसा तो कांहीं अगदीं वाईट आहे अशांतला भाग नाहीं. माया लावून घेण्याजोगें पुष्कळ आहे या मुलांत, पण आम्हांला तो एवढें सुद्धां जवळपास येऊंच देत नाहीं मुळीं. तुमच्याशीं त्याचें जमतें असें दिसतें. मग सांगा पाहूं काय करावें आम्हीं?"

आंद्रिसचें माझ्याशीं जुळे ही गोष्ट कांहीं खोटी नव्हती. योगायोगाच्या गोष्टी म्हणून हें जुळलें असें म्हणतां येईल. पण त्या बरोबरच एक गोष्ट विसरतां येत नाहीं ती ही कीं, मी मुलें वागवून घेण्याच्या बाबतींत नवशिकी नसून, मला चांगलाच अनुभव होता. या बाबतींत मला तरी असें म्हणावेंसें वाटतें कीं, मुलांना कसें वागवावें याचे तात्त्विक पाठ देतां येतील. नाहीं असें नाहीं. पण अखेर प्रत्यक्ष वागवितांना या पाठांपेक्षां मुळांत अंगीं असलेलें शहाणपणच अधिक उपयोगी पडतें. तें मात्र तुमच्या अंगीं असायला पाहिजे.

त्या कुटुंबांत तेवढ्याचीच उणीव होती हें माझ्या लक्षांत यायला उशीर लागला नाहीं. त्यामुळें काय करायचें हा प्रश्नच होता. एकंदरींत या भेटीनंतर आंद्रिसच्या भवितव्याविषयीं भीति वाटून व्यथित मनानेंच मी घरीं गेलें.

माझी भीति लवकरच खरी ठरली. आंद्रिस एके दिवशीं शाळेंत आला तो काय! पांढरा फटफटीत, आजाऱ्यासारखा चेहरा, कमाल वाकलेले खांदे, लाल लाल, सुजलेले, डोळे अशा अवतारांतच आला. त्याच्या डोळ्यांभोवतीं असणारीं काळीं वर्तुळें आज आणखीच खोल गेल्यानें उठून दिसत होतीं.

"काय झालं रे आंद्रिस? बरं नाहीं का तुला? कशाला आलास मग शाळेला? घरीं जातोस का?"

"नाहीं, नाहीं. मला नाहीं जायचें तिथें. माझें तें घरच नाहीं यापुढें."

तोडक्या मोडक्या इंग्रजींत त्यानें उत्तर दिलें.

"घर नाहीं म्हणजे काय?"

"तूं आतां राह्यचं नाहींस इथं, चालता हो इथून, म्हणून त्या लोकांनीं मला सांगितलं. पण कुठें जायचं तें मला तर माहीत नाहीं. मला इथंच राह्यचंय्!" आंद्रिस मोडक्या तोडक्या इंग्रजींत म्हणाला.

त्यानें एकदम बाकावर डोकें टेकलें व सकाळचे नऊ वाजले होते तरी तो चटकन् झोपीं गेला.

वर्गांतील सारीं मुलें सहानुभूतीनें गप्प बसून राहिलीं. आणि मग एकाएकीं आंद्रिस जागा झाला आणि वर्गाबाहेर धावत गेला. त्याला काय झालें हें बघण्याकरितां एक मुलगाही त्याच्या पाठोपाठ गेला. थोड्याच वेळांत दोघे परत आले. आंद्रिसचा चेहरा हिरवा झाला होता.

"उचमळतें आहे पोटांत." आंद्रिसनें उत्तर दिलें.

तावडतोब मीं शाळेच्या कचेरींत कळविलें. आंद्रिस नको नको म्हणत असतांही त्याला घरीं पोहोंचविण्यांत आलें.

घरीं पोहोंचविल्यावर तेथें काय प्रकार घडला होता हें आम्हांला कळून चुकलें. आदल्या रात्रीं त्यानें कुणाला तरी सुरी दाखवली. साहजिकच घाबरून घरच्या माणसांनीं त्याला कोंडून ठेवला. पण त्यानें इतकी आरडाओरड, दंगामस्ती सुरू केली कीं सारी रात्र कुणाला झोपूं दिलें नाहीं कीं तो स्वतः झोपला नाहीं. यानंतर काय होणार हें दिसत होतें.

बाकी आंद्रिसला शाळेंतून परत पाठविलें तेव्हां सारीं मुलें हळहळलीं. तो

आडदांड असला तरी मोठा उत्साही व मजेदार पोरगा होता.

मधून मधून शाळेंत आंद्रिसबद्दल बातम्या यायच्या. कुणी सांगे, "त्यानें फिरून कोणाला तरी सुरी दाखविली म्हणून दुसऱ्या घरांतूनहि त्याला परत घालविण्यांत आलें. आतां त्याला आणखी दुसऱ्या ठिकाणीं ठेवलाय्."

या नव्या ठिकाणीं घरांतल्या आईनें त्याच्या थोबाडींत मारली. त्याबरोबर आंद्रिस जो बाहेर पळाला तो एक गोटा उचलून त्यानें बरोबर त्या बाईच्या कपाळावरच नेम धरला. नशीब म्हणून तो नेम चुकला. नाहीं तर अनर्थच ओढवला असता. साहजिकच त्याही ठिकाणाहून त्याची उचलबांगडी झाली.

या बाबतींत, मोठा सज्जनपणाचा आव आणून, त्या बाईनें त्याला मारायला नको होतें, असें मला म्हणायचें नाहीं. किंवा आंद्रिसची यांत कांहीं चूक नसेल, असेंहि मला बिलकुल वाटत नाहीं. पण एवढें वाटतें खरें कीं, त्या बाईचें चुकलें. कारण असें आहे कीं थोबाडींत मारली कीं त्या माणसाला भारी अपमान वाटतो. तो खवळतोच मुळीं. आंद्रिस तरी अशा वेळीं फारच बेताल होई. अनुभवांतीं मला एवढें पक्कें कळून चुकलें होतें कीं, आंद्रिसला वठणीवर आणायची पाळी आली कीं त्याला नुसती थोबाडींत देण्यांत कांहीं अर्थ नव्हता. चांगला चोपून सरळ पाडल्याशिवाय त्याला भंगच होत नसे.

माझा हा उपाय आसुरी म्हणून लोक नाकें मुरडतील, याची मला पुरी कल्पना आहे. आंद्रिस खरोखरच फार पशुतुल्य यातनांतून गेला होता; तो स्वतःच पुष्कळदां फुशारकी मारी कीं रोज आपल्याला माराचा खुराकच असायचा मुळीं.

पुढें तो मोकळेपणीं बोलूं लागल्यावर मला त्यानें चांगलेंच वर्णन करून सांगितलें त्या वेळच्या परिस्थितीचें. "मला अगदीं वाईट म्हणून टिपून काढण्यांत आलें होतें." थोड्याशा अभिमानानें, थोड्याशा मिस्किलपणें, त्यानें सांगायला सुरवात केली, "तिथें एक अधिकारी होता तो तर कमरेचा कातड्याचा पट्टा काढून रोज सकाळीं मला चांगलें फोडून काढायचा. तो गेला कीं शिपाई बंदुकीवरच्या त्यांच्या लांब लांब सुऱ्या माझ्याजवळ आणून भोसकण्याची भीति दाखवायचे."

या सगळ्या अनुभवांतून गेलेल्या मुलाला 'तूं वाईट केलेंस', 'खोडकरपणा आहे हा', असें समजावून सांगत बसण्यांत काय अर्थ होता? चांगली ठेवून दिल्याशिवाय ही समजावणीची भाषा त्याला कळतच नव्हती. उलट अशा समजावणीमुळें त्याचा गैरसमज मात्र होई व त्याला वाटूं लागे कीं, कांहीं नाहीं,

या माणसांत फारसा रामच नाहीं. अशा परिस्थितींत तुमच्या गोडीनें सांगण्याचा त्यावर कांहीं एक परिणाम होत नसे. आंद्रिसला एकाद्या गोष्टीबद्दल नीट विचार करणें ही गोष्ट मुळीं माहितीच नव्हती. तसं त्याला शिकवलंच नव्हतं कुणीं.

फिरून शाळेंत बातमी आली कीं आंद्रिसला आणखी एका नव्या घरीं तात्पुरतें सध्यां ठेवण्यांत आलें आहे व त्याचें काय करायचें, ह्याचा अधिकारी विचार करीत आहेत.

कां कुणास ठाऊक, मला ही बातमी ऐकून त्या मुलाबद्दल एक प्रकारची काळजी वाटूं लागली. म्हणूनच मी एक दिवसाची रजा घेऊन त्याला ज्या घरीं ठेवला होता त्या ठिकाणीं भेटायला गेलें.

माझी गाडी त्या घरासमोर थांबली नी त्याच क्षणीं आंद्रिस माझ्या नजरेस पडला. तो बाहेरच, रिकाम टेकड्यासारखा शून्य मनानें पाहत उभा होता. किती शून्य आणि भकास नजर होती त्याची! साऱ्या जगावरून ओवाळून टाकलेला, एकटा, असा दिसत होता तो!

मी येईन अशी त्याला कल्पना नसावी. म्हणूनच मला पाहिल्याबरोबर आनंदानें नाचत नाचत तो माझ्याकडे धावत आला नी एकदम सारें शरीर माझ्या अंगावर झोकून देऊन आनंदातिशयानें हसत ओरडत त्यानें मला घट्ट मिठी मारली. मात्र दुसऱ्याच क्षणीं त्याचें हसूं मावळून तो रडूं लागला. तो सुद्धां धाय मोकलून. आजवर बांध घालून अडवलेलें सारें पाणी आज बांध फोडून उसळून आलें होतें. भूकंपाप्रमाणें त्याचे हुंदके सुद्धां अगदीं आंतून, खालून पायाच्या नखापासून जोर-जोरानें वर उसळून सारें शरीर गद्गदा हलवीत होते. आपले हात आवळून त्यानें मला अधिकच घट्ट मिठी मारली. त्याचें सारें शरीर हींव भरल्यासारखें थरथरत होतें. याला आतांच नीट आवरला नाहीं तर एकादे वेळीं फिट यायची म्हणून मीं त्याला घट्ट धरून ठेवला. तरी त्याचे हुंदके व शरिराची थरथर चालूच होती. आंद्रिसला मीं तसा पोटाशीं धरला, तशीं माझें मन मला उपदेश करूं लागलें. "कां उगीच मूर्खासारखें करतेस? तूं घरीं का नेणार आहेस त्याला? वय झालंय् तुझं, कशी वाढवशील एवढ्या लहान मुलाला? त्यांतून तो सुधा आहे का? बेताल पोर तो! त्याला नीट धाक दाखवायचा म्हटलें तर कोणी वडीलधारें पुरुष माणूस तरी आहे का तुझ्या घरांत? तूं तर अशी गतधवा. नको पडूं अशी मुद्दाम खोड्यांत. तुला सारें भोवेल तें. शिवाय तुला झेपणार तरी आहे का त्याला घेणें?"

खरा होता हा उपदेश. पटतच होता तो सारासारविवेकबुद्धीला. पण हृदयांतील भावना कांहीं वेगळेंच बोलूं लागल्या. "हां आंद्रिस, किती बरं रडायचं आतां. चल येतोस का माझ्याबरोबर माझ्या घरीं?"

केवढा आधार वाटला त्या लहानशा पोरक्या मनाला! माझ्या खांद्यावर डोकें ठेवून हुंदके देत देतच त्यांतून होकार आला.

"मग जा पाहूं आण तुझें सामान."

झालें. लगेच आंद्रिसचें डोकें वर उचललें गेलें. बोटांनीं डोळे पुसले. तळहाताच्या पाठीवर नाकही साफ झालें. मोठ्या आनंदानें, आंसवांनीं अजून किती तरी ओला असलेला चेहरा तसाच घेऊन, आनंदाची एक आरोळी देऊन, स्वारी सामान आणायला हरणाप्रमाणें उड्या टाकीत गेली.

एक उडींतच दोन पिशव्या घेऊन तो ताडकन् बाहेर आला. मला वाटलें त्याचें सामान बांधून तयारच असावें.

"मला वाटलंच तुम्ही याल म्हणून." आंद्रिस म्हणाला. आणि खरोखरच मी आलें. त्याला न्यायचा मार्ग मात्र तेवढा सुकर नव्हता.

ज्या वेलफेअर ऑफिसरकडे आंद्रिसकडे बघायचें काम होतें, त्यानें हळूच मला मी आंद्रिसला घेऊन जाणें ठीक होणार नाहीं असें समजावून सांगितलें. त्याचं तें म्हणणं बरोबर होतं. मला सुद्धां तें पटत होतं. खरंच आहे. कुठें अकरा वर्षांचा वाढता मुलगा आणि कुठें साठी उलटलेली म्हातारी. कशी वाढवणार ती अशा मुलाला. "शिवाय तुमच्या घरांत धाक राहायला वडिलांसारखें पुरुष माणूस पाहिजे तें कुठें आहे?"

त्यांनीं दाखवलेली अडचण बरोबर होती. माझेंहि मन मधून साशंक होई. उगीच न झेपणाऱ्या गोष्टी अंगावर घ्यायची माझी पण तयारी नव्हती. आधींच शाळेंतून घरीं गेलें कीं मला किती तरी वेळां थकल्यासारखें वाटे व मी पडून राहत असें. घरांत लहान मुलगा असला कीं तें कसें जुळणार? सकाळीं लवकर उठायला पाहिजे. कशा होणार या साऱ्या गोष्टी? "तुमचं आतां वय झालंय्. तुम्हांला विश्रांति पाहिजे. तेव्हां आतां साऱ्या गोष्टी नीट संभाळून केल्या पाहिजेत तुम्ही?" त्या ऑफिसरचे शब्द फिरून फिरून माझ्या कानांत घुमत होते.

पण खरें बोलायचें तर त्याचें सांगणें मला मनांत बिलकुल पटत नव्हतें. 'ते' गेल्यावर दोन वर्षें मीं विश्रांतीच घेतली. खूप मरेपर्यंत विश्रांति घेतली. अखेर तिचाच कंटाळा आला. सगळं जीवन नीरस, एकाकी व कंटाळवाणें वाटूं

लागलें. लोक म्हणत विश्रांति घ्या. मी विश्रांति घेई, पण त्यामुळेंच उलट अधिक थकत चाललें. आयुष्यांत एक भयंकर पोकळी निर्माण झाल्यासारखें वाटूं लागलें. अखेर बदल म्हणून मीं शाळेंत शिकवायचें काम अंगावर घेतलें. कांहीं अंशीं ती पोकळी भरून आली. तेवढ्यांतच आंद्रिसही आला. किती भयचकित झालेलें निरनिराळ्या भावनातिरेकानें थरथरत असलेलं जंगली पांखरूं होतें तें.

आंद्रिसला जवळ ठेवण्यांत शहाणपणा नसेल. पण आम्हां दोघांनाही कुणी नव्हतें आणि एकमेकांची जरुरी वाटत होती.

हळूहळू मीं तसा त्या अधिकाऱ्यांशीं युक्तिवाद सुरू केला. "मजजवळ नको, कबूल. पण मग दुसरं कोण घ्यायला तयार आहे या मुलाला? आहे कुणी? नाहीं. मग काय करणार तुम्ही याचें? तेंही तुम्हांला कळत नाहीं. मग मलाच कां प्रयत्न करूं देत नाहीं? हा कांहीं पहिलाच नाहीं मीं मुलगा पाळीत! माझ्या स्वतःच्या तीन मुलांबरोबर मीं आजवर अशीं मुलें पाळलीं आहेत कीं. मग आतांही मला पाहूं द्या कीं कसं काय मी जमवून घेतें ती!"

"तुम्ही म्हणतां तें खरं, पण आमच्या नियमाविरुद्ध आहे तें."

"अगदीं खरं." मीं पण कबूल केलें. आणि विचारलें, "पण हा मुलगा तरी कुठें तुमच्या नियमांत बसतोय्! तोही बसत नाहीं, मीही बसत नाहीं. मग आमची जोडी राहूं द्या ना. बघून घेऊं आम्ही."

"पण अखेर घरांत पुरुष माणूस नसल्यानें नाहीं आम्हांला ठेवतां येत तुमच्या-पाशीं," त्या माणसानें आग्रहच धरला.

त्यालाही माझ्याजवळ उत्तर होतेंच. "माझ्याहि कुटुंबांत एक पुरुष आहे." मीं उत्तर दिलें. माझ्या घरांत खरोखरीच एक पुरुष होता. अर्थात् तो नुकत्याच लांब विजारी घालूं लागला होता ही गोष्ट वेगळी.

योगायोगाच्या गोष्टी म्हणा ना, पण थोड्याच दिवसांपूर्वी डेव्हिड माझ्याकडे घर म्हणून राह्यला आला होता. तसा त्याला मी सात वर्षांचा असल्यापासून ओळखीत होतें. त्या बिचाऱ्याला स्वतःचें घर म्हणून कधींच लाभलें नव्हतें. आज एकाकडे, उद्यां एकाकडे अशी सारखी त्याची आजवर वारांगुळी होत होती. अखेर तो एकदांचा हायस्कूलची परीक्षा उत्तीर्ण होऊन कामधंद्याला लागला होता. आपल्याला घरासारखें राह्यला मिळावें अशी त्याची मोठी इच्छा. त्याचा भाऊ जिमी जॉन हा नुकतेंच माझ्याकडचें शिक्षण आटोपून कॉलेजांत गेला होता. म्हणून डेव्हिड माझ्यामागें लागतांच मीं चटकन् कबूल केलें. "जा तुझ्या भावाचाच बिछाना

आहे. ठेव तुझें बिऱ्हाड तिथें." असें म्हणून मीं नुकताच त्याला ठेवून घेतला होता. पण आज त्याचें तें वास्तव्य उपयोगाला आलें. नियमाप्रमाणें जरूर असलेली वडीलधाऱ्या पुरुषाची अट माझ्या घराच्या बाबतींत पुरी झाली.

सगळ्या अटी पूर्ण झाल्यानें आंद्रिसनें माझ्या घरीं राहावें असें ठरलें.

वेलफेअर ऑफिसरला तरीसुद्धां धाकधूक वाटतच होती. "पहा बुवा, एवढा घेतां आहांत ठेवून याला, पण त्यानें फार त्रास देऊं नये म्हणजे झालं. तुम्हांला कधीं हा कह्याबाहेर जातो असं वाटलं तर 'कसं कळवूं' असं नका मनांत आणूं. खुश्शाल कळवा नि आम्ही त्याची केव्हांही सोय करूं."

"अर्थात् बढाई मारायची म्हणून नाहीं, पण मला खात्री आहे कीं, या मुलाला मी नीट वागवून घेईन. अहो, मुलें वाढवायचीं म्हणजे कांहीं मला नवी गोष्ट नाहीं. चांगली संवय आहे मला. पाहूं या आतां काय होतें तें." मीं उत्तर केलें व आम्हीं एकमेकांची रजा घेतली.

आंद्रिसची जोखीम म्हणजे खरोखर एक जुगारच होता माझा.

आतांपावेतों मीं दुसरीं मुलें वाढविलीं होतीं, नाहीं असें नाहीं. पण तीं अमेरिकन मुलें, मला त्यांचं सारं माहीत होतं. आंद्रिसच्या बाबतींत सारेंच नवीन, अनोळखी, सारा प्रयोगच करून पाहायचा होता. पण त्या प्रयोगाच्या जाणिवेनें माझें मन कमालीचें उत्सुक झालें होतें. कुणी म्हणत ही तारेवरची कसरत आहे! पण एवढें खरें कीं ती करून पाहायचें मी ठरविलें.

आंद्रिसचे सुऱ्या दाखविण्याचे प्रकार, गोटे फेकणें, सारे प्रकार माझ्या कानावर आले होते. मलाही ते आवडले नसते. पण त्याला जेव्हां मीं घरीं राह्यला आणला तेव्हां एक चकार शब्द काढला नाहीं मीं त्यासंबंधीं. उलट एवढेंच म्हटलें, "आंद्रिस, तुला माहीत आहे ना तूं पूर्वीं राहत होतास तसं मोठं घर नाहीं माझं."

"काळजी नको. मोठं घर नसलं तर नसलं. मला प्रेमळ घर पाहिजे आहे." आंद्रिसचें उत्तर आलें. 'प्रेमळ घर' म्हणजे त्याची कल्पना काय हें त्या वेळीं मला कळलें नाहीं. शिवाय तें तितकें समजावून सांगण्याइतकें त्याला तरी इंग्रजीचें ज्ञान कुठें होतें?

मागें मीं सांगितलेंच आहे कीं, आंद्रिस ज्या घरीं प्रथम आला तें घर–घर कसलें, मोठा महालच होता तो! त्याच्यापुढें आमचें घर म्हणजे निव्वळ खोपट म्हटलें तरी चालेल. पण आंद्रिसच्या वागणुकींत हा फरक कधींच दिसून आला नाहीं, कीं एका शब्दानें त्यानें या महदंतराची आम्हांला जाणीव दिली नाहीं.

वास्तविक एखादे वेळीं त्यानें तसें दर्शविलें असतें तरी चुकलें नसतें. अखेर लहानच होता तो.

पण अगदीं पहिल्यापासून आंद्रिसनें आमच्या सर्व गोष्टींविषयीं पसंती दर्शविली. तो नेहमीं म्हणे, "मला जुनींच घरें, जुनीं माणसें आणि जुन्या मोटार गाड्या आवडतात."

जुना हा शब्द, बहुधा, परिचित—जेथें माणसाला परिचितपणामुळें बरें वाटतें अशा अर्थानें तो वापरीत असावा. अमेरिकेंत आल्यापासून सारें इतकें नवीन व अपरिचित त्याला दिसत होतें कीं, बिचारा अगदीं भांबावून गेल्यासारखा झाला होता. आमच्या घरीं टापटीप बेताचीच असे. पण त्यानें कधीं ब्र काढला नाहीं त्याबद्दल. एके दिवशीं मात्र तो माझ्या जुन्या गाडीकडे बघून हळहळला. "बिचारी म्हातारी झाली आतां. आतां नाहीं उंचावर चढायची." हळहळत त्यानें उद्गार काढले.

पुढें एकदां तर एका म्हाताऱ्या बाईबद्दल सहानुभूति दाखवून त्यानें आम्हांला थक्कच करून सोडलें. आम्ही मोटरमधून चाललों होतों. रस्त्याच्या बाजूनें एक अतिशय म्हातारी, वाकलेली, गरीब, बाई कसा बसा रस्ता आक्रमीत होती. आंद्रिसच्यानें राहवेना. "थांबव, थांबव ना गाडी. गरीब बिचारी, किती थकली आहे. मला रडूं येतं असं पाहिलं कीं. बाई, तिला घे ना आपल्या गाडींत. बघ, किती दुःखी आहे ती. बघ आई. माझ्याकरतां घे ना तिला. आपण पोहोंचवूं."

असा होता मीं त्या दिवशीं आणलेला नवा मुलगा.

## २. आंद्रिस आणि कार्लिस

आंद्रिसला घेऊन घरीं जाण्याकरतां मी मोटरनें निघालें. वाटेंत मे महिन्याचें सुंदर ऊन तळपत होतें. जातां जातां माझ्या मुली 'ट्रॉट' आणि 'टिन्सी' मला काय म्हणतील हा विचार येई. आंद्रिसला आणून घराची सारी शांतता बिघडविली असें तर त्यांना वाटणार नाहीं ना, असा विचार आला. माझा मुलगा नुकताच वैद्यकीय शिक्षणक्रम पुरा करून हॉस्पिटलमध्यें अनुभव घेत होता. त्याला सारा दिवस रात्र तेथेंच राहावें लागे.

तेव्हां त्याचा प्रश्नच नव्हता.

डेव्हिडची तर बिलकूल हरकत नव्हती. उलट घरांत एकादा लहान मुलगा म्हणजे चांगली करमणूक असेंच त्याला वाटत होतें. ट्रॉट शाळेंत शिकवी व घरीं राही. तिला पण एक लहान मुलगा येणार ही कल्पना आवडलीच. 'बरं जरा गजबजलेलें असतं घर' तिनें मला सांगितलं...आणि खरोखरच तसं झालं. आंद्रिसलाही ती आवडली. हळू हळू तर तो तिला ट्रॉट म्हणायचें टाकून लाडिकपणें 'ट्रोचा' म्हणे. मोठ्या आवडीनें, सलगीनें हाक मारायची असली तर त्याच्या भाषेंत ट्रॉटचें रूप बहुधा ट्रोचा होत असावें.

आमची टिन्सी मात्र कॉलेजांत शिकत असल्यानें दूरच्या गांवीं होती. तिला अजून घरांत डेव्हिड आणि आंद्रिस या नांवाचीं दोन मुलें आलीं आहेत याचा बिलकुल पत्ता नव्हता. साऱ्या गोष्टी इतक्या भराभर घडत होत्या कीं, त्या मला तिला साद्यंत कळवायला उसंतही मिळाली नाहीं. त्यामुळें एक दिवस तिनें मला टेलिफोन केला तेव्हां मोठी गंमत झाली.

घरीं कोणीही असलं तरी त्याला टेलिफोनवर बोलवा असें तिनें टेलिफोन करतांना सांगितलें होतें. आंद्रिसनें टेलिफोन घेतला. त्याचा तो 'ॲलो ॲलो' असा विदेशी जाड स्वर ऐकून तिला कोण बोलतें तें कळेना.

"कोण बोलतें आहे?" तिनें आश्चर्यचकित होऊनच प्रश्न केला.

"मी आंद्रिस" विदेशी इंग्रजींत उत्तर आलें.

"माफ करा अं, चूक नंबर लागला." असें म्हणून तिनें फिरून फोन

केला. याही वेळेला फिरून एक अपरिचित आवाज येऊं लागला.

"कोण बोलतें आहे?" तिनें विचारलें.

"मी डेव्हिड बोलतों आहें."

"डेव्हिड? कोण डेव्हिड?"

"कोण म्हणजे? मी इथेंच राहतों."

"असं. मग मघांशीं फोन कुणीं घेतला?"

"आंद्रिसनें."

"हा आंद्रिस कोण?"

"हो, तोहि इथेंच राहतो."

त्या दोघांचें थोडेंसें कांहींतरी बोलणं झाल्यावर अखेर तिनें मला बोलाविलें.

"आई, काय चाललें आहे आपल्या घरांत? मझ्या पदवीदान समारंभाच्या वेळीं तुम्ही कोण कोण याल हें कळलें तर जागा राखायला बरें म्हणून मीं फोन केला तर मला कळलें कीं तूं आणि ट्रॉट येणार पण डेव्हिडला कांहीं वेळ नाहीं म्हणून तो येऊं शकत नाहीं. कोण हा डेव्हिड? आणि तुमच्याबरोबर ॲन्ड्रयूज पण येत असल्याचें समजलें. हा ॲन्ड्रयूज तरी कोण? कोण गोळा केला आहेस एवढा गोतावळा?"

मीं सारें सांगितल्यावर डेव्हिडबद्दल तिची हरकत नसावी असें दिसलें. "ठीक दिसतो आहे तो पोरगा." पण आंद्रिसबद्दल ऐकून मात्र तिला राहावेना. "आई, कमाल केलीस! एक वेडा रशियन पोरगा पण आतां घरांत राहायचा का?" असे उद्गार काढल्याशिवाय तिला राहवेना.

जूनमध्यें आम्हीं टिन्सीच्या पदवीदान समारंभाला गेलों तेव्हां घरांत आंद्रिसकडे पाह्यला कोणी नसल्यानें त्याला घेऊन जाणें भागच होतें.

बाहेर मोठ्या मंडपांत समारंभाला सुरवात झाली. आंद्रिसला जागा मिळाली नाहीं तेव्हां तो जेथून चांगलें दिसेल तेथून पाहण्याचा प्रयत्न करीत, इकडे तिकडे भटकूं लागला. कॉलेजचे सगळे प्राध्यापक, विश्वस्त, इतर शिष्ट मंडळी आणि पदवी मिळणारे विद्यार्थी, सर्व पदवीदानाच्या वेळचे झगे घालून, डोक्यावर त्यांच्या विशिष्ट रंगीबेरंगी टोप्या चढवून, एका मुद्दाम तयार केलेल्या व्यासपीठावर अर्धवर्तुळाकार बसले होते. पदवी घेणारे विद्यार्थी एकेक चढत अध्यक्षासमोर यावे, म्हणून पायरीवर रांगेनें उभे केले होते.

हळू हळू आमची टिन्सी पण पदवीधराच्या सुंदर पोषाकांत डौलानें एक एक

पाऊल टाकीत अध्यक्षासमोर आली. इतक्यांत ट्रोचानें मला कोपरानें ढोसून हळूच विचारलें, "आई, पाहिलेंस का तें कोण तें?"

मला सुद्धां कितीतरी वेळ तसा भास होत होता. आतां ट्रोचानेंच खुणावल्यावर खात्री पटली. "बाई, नसेल ग तो!" मीं हळूच उद्गार काढले, "नाहीं कसा? तोच तो." कांहींसें घाबरत, कांहींसें हसत ती कुजबुजली.

मी जरा निरखून पाहतें तों, अध्यक्षांच्या लांबच्च लांब झग्यांत कांहींशी दडून गेलेली आंद्रिसची छोटी मूर्ति, वर येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या रांगेच्या टोकाशीं, अगदीं व्यवस्थित मांडी मोडून, खुश्शाल व्यासपीठावर विराजमान झालेली दिसत होती.

टिन्सी पुढें आली, व्यासपीठाच्या फळ्यावर बसलेल्या आंद्रिसनें तिच्याकडे पाहून स्मित केलें. टिन्सी म्हणजे आम्ही सारीं तिला लहान 'छोटी' म्हणतों हें त्याला माहीत होतें. म्हणूनच त्यानें तिचें नांव इन्चा ठेवलं होतं. इन्चा म्हणजे इन्चासारखी लहान, ही त्याची तें नांव ठेवण्यांत भावना असावी. असो. बसल्या ठिकाणाहून स्वारी हळूच हसून म्हणते,

"अलो इन्चा, शाबास"

जणुं काय कांहीं घडलेंच नाहीं असें दाखवून नीट चेहरा ठेवून इन्चाला पुढें जाणें भागच होतें. 'हॅलो आंद्री' असें कुजुबजून ती त्याच्याकडे पाहून हसली नी लगेच गंभीर मुद्रेनें अध्यक्षांसमोर पदवी घ्यायला उभी राहिली.

गंमत ही कीं त्याला तेथून कोणीच हुसकावलें नाहीं. त्यामुळें सारा समारंभ पार पडेपर्यंत स्वारी व्यवस्थित तिथेंच बसून राहिली.

मला छानच जागा मिळाली होती. आंद्रिसनें नंतर आम्हांला सांगितलें.

"चांगलंच रत्न मिळवलं आहेस आई" आमची पदवीधर मुलगी जरा नाखूष होऊनच उद्गारली.

काय उत्तर देणार मी! "हो जरा निराळा आहे खरा. पण आतां म्हातारपणीं मुलगा पाहिजे तर म्हटलें जरा राहूं दे नेहमींपेक्षां निराळा, दुसरें काय?" मीं उत्तर दिलें.

"वाः, चांगलाच वेगळा आहे इतरांपेक्षां" इन्चा उद्गारली. पण कां कोण जाणे, या उत्तरासरशीं मला किती वेगळें वाटूं लागलें. जणूं काय वाढलेल्या वयाचें सारें ओझें फेकून मी पुन्हा तरुणच्च झालें होतें. घरांत लहान मुलगा असल्यामुळें माझा थकवा तर कुठल्या कुठें पळाला होता.

आंद्रिस इतर चार चौघांसारखा सुधा मुलगा असता तर कदाचित् माझा हा उत्साह मावळला असता. फिरून म्हातारपणींचा थकवा सुरू झाला असता. पण आंद्रिस कुठल्या क्षणीं काय करील याचा नेम कुठें होता? त्यामुळें कधीं राग, कधीं गंमत, कधीं लोभ, कधीं आश्चर्य, कधीं आनंद, तर कधीं काय होणार हें न कळल्यानें येणारी अनिश्चितता या सगळ्यांशीं मी एकसारखा पाठशिवणीचा खेळच खेळत असें.

त्याचा कधीं कुणाला कांहीं एक नेमच सांगतां येत नसे. एकाद्या क्षणाला रस्त्यावरची एकादी गरीब म्हातारी पाहून कळवळून येऊन तो रडूं लागे तर दुसऱ्या क्षणीं केव्हां रागावून चावा घेईल याचा नेम नसे.

एकदां एक खेळांतला आग विझवायचा बंब त्यानें नीट केला. त्यांतून चांगलें पाणी उडवतां येऊं लागलें. साहजिकच आपण थोडीशी आग लावून ती आपल्या बंबानें विझवावी अशी त्याला इच्छा झाली. त्याकरतां अंगणांत त्यानें चांगला विस्तवही पेटविला. पण वारा असल्यानें ती आग इतकी भडकूं लागली कीं खरोखर सारा प्रकार कह्याबाहेरचा होणार कीं काय अशी आम्हांला भीति वाटूं लागली. त्यांतल्या त्यांत अवर्षण असल्यानें म्युनिसिपालिटीनें कुठें विस्तव पेटवून जाळ करायला सुद्धां मना केली होती. आगीच्या खात्यानें अशा जाळ करणारांना चांगलाच दंड ठेवला होता. अशा वेळीं मागल्या अंगणांत एकाएकीं जाळ भडकलेला पाहतां आमचें धाबें दणाणलें. त्यांतून वारा चांगलाच सुटला होता.

आम्हीं भराभर त्या जाळावर बादल्यांनीं पाणी ओतलें. एवढी सुद्धां ठिणगी चुकून माकून राहूं नये अशी पूर्ण खबरदारी घेतली.

आंद्रिसला तें पटलें नाहीं. त्याला जो रागाचा झटका येऊन त्यानें ओरडायला सुरुवात केली ती कांहींच्या बाहीच. वास्तविक त्याला आमच्याकडे येऊन चांगला आठवडा लोटला होता. त्याच्या पूर्वींच्या घरीं असे झटके त्याला वारंवार येत असत हेंही पण मीं ऐकलें होतें पण माझ्या घरीं आल्यापासून ते प्रत्यक्षांत पाहण्याचा प्रसंग आला नव्हता तो आला. 'मी वेडा. माझा जाळ विझवलात!" तो सारखा ओरडूं लागला. अखेर तर त्यानें माझ्या हाताचा असा कडकडून चावा घेतला कीं सारे दांतच उठले त्या हातावर.

मी अगदीं शांतपणें त्याला समजावून सांगायचा प्रयत्न केला. असा जाळ कां पेटवायचा नाहीं याचीं कारणें सांगितलीं. पण तो ऐकेच ना! अखेर या मुलांत कार्यकारणभाव ओळखून विचार करण्याची शक्तीच नाहीं असें बुद्धिमत्तेचा

दर्शक पारखणाऱ्यांनीं मला सांगितलें होतें तें पण आठवलें.

संतापानें बेभान होऊन माझ्याभोवतीं त्यानें नुसता पिंगा मांडला होता. अखेर मीं त्याला घट्ट धरून ठेवला व नीट समजावून सांगायचा प्रयत्न केला. पण त्यानें जी लाथ झाडायला सुरवात केली ती इतकी कीं माझी तर बाजू दुखूं लागली. मीं अखेर त्याचा हात सोडून दिला. 'तूं–अन्याय' मोडक्या इंग्रजींत तो किंचाळूं लागला. "मला म्हणतेस कीं मीं बंब चालवला तरी चालेल नी आतां नाहीं देत चालवून. खोटं बोलतेस." इतकें बोलल्यावर कुठें स्वारी कां चिडली हें मला उमगलें. तो आगीचा बंब नीट करीत असतांना मीं खरोखरच एक दिवस त्याला सांगितलें होतें कीं त्यानें तो नीट करावा नी चालवून पाहावा. पण आज तेंच तो करीत असतां मी त्याला करूं देत नव्हतें. त्यामुळें तो भडकला. पण तेवढ्यावरून मला मात्र एक गोष्ट कळून चुकली कीं, कांहीं समजतात तसा हा मूर्ख पोरगा नाहीं. त्याला विचार करतां येतो, कार्यकारणभाव कळतो, सारें कांहीं होतें. पण एकच अडचण दिसत होती, ती म्हणजे भाषेची. बिचाऱ्याचें इंग्रजीचें ज्ञान इतकें तुटपुंजें होतें कीं, त्याला आम्हीं जाळ करायचा नाहीं हें कां सांगतों हेंच मुळीं कळत नव्हतें. अवर्षण, आगीचें खातें, मना करणें, दंड, कायदा, संकट, वणवा इत्यादि शब्द जर त्याला माहीतच नव्हते तर तो काय करणार? त्यामुळें मी नको म्हणून सांगितलें तेव्हां त्याला फसविलें एवढीच त्याची भावना झाली.

आतां मी त्याचे हे सारे रागाचे झटके, आक्रस्ताळीपणा आठवूं लागलें कीं एक गोष्ट माझ्या लक्षांत येते ती ही कीं, तो जेव्हां जेव्हां भडकून जाई तेव्हां तेव्हां त्याच्या मुळाशीं त्याला असाच कांहीं अन्याय झाल्याची किंवा फसविल्याची भावना असे. माणसाच्या मनासारखें झालें नाहीं कीं प्रत्येक मनुष्य नेहमींच भडकतो. आंद्रिसच्या बाबतींत मात्र पुष्कळच वेळां हें भडकणें अन्यायाची चीड आल्यानें येत असे, असें मला तरी विचार केला कीं वाटूं लागतें. अर्थात् केव्हां केव्हां आपल्याला जरी त्या बाबतींत कांहींच गैर वाटत नसलें, तरी एवढें खरें कीं त्याला मात्र अन्याय झालेल्यासारखें वाटे. असें झालें कीं लगेच त्याचें माथें भडकून उठे. न्याय, स्वातंत्र्य याकरतां लढणाऱ्या अमेरिकन स्वातंत्र्य प्राप्तीच्या कोणत्याही वीरापेक्षां त्याची ही न्याय-अन्यायाची भावना कमी नव्हती. त्यामुळेंच तो इतक्या त्वेषानें तुटून पडे. अमेरिकन नागरिकत्वाला जरूर असणारी ही वृत्ति मुळांतच होती या मुलांत.

त्या दिवशीं मात्र राग आल्याकारणानें मी इतक्या बारकाईनें विचार करायच्या

मनस्थितींतच नव्हतें. आंद्रिसला, मीं अन्याय केला असें वाटत होतें. त्याच्या लाथांनीं माझी कूस दुखायला लागली होती. आंद्रिसनें माझ्या हाताचा कडकडून चावा घेवल्यानें हात पण दुखत होता. पण एवढ्याही मनःस्थितींत याला असा झटका एकाएकीं कां यावा याबद्दल माझें मन विचार करीत होतें. आम्हीं वापरीत असलेले अवर्षण, धोका, इ. शब्द त्याला कळत नसावे हें माझ्या लक्षांत येऊन चुकलें. पण तो अशा रीतीनें लाथा झाडीत असतां, चावत असतां, त्याला ते शब्द समजावून सांगण्यांतही कांहीं अर्थ नव्हता.

"अमेरिका मला नको,—आवडत नसे. मी माझ्या लटाव्हियाला जातों. आत्तां जातों. माझ्या देशाकडे जाणाऱ्या बोटींत बसव." फिरून तोडक्या मोडक्या इंग्रजींत आंद्रिस ओरडूं लागला.

"ठीक आहे. जायचें ना तुला लटाव्हियाला. जा तर. जा सरळ या रस्त्यानें. मग डावीकडे वळ, व जा बराचसा." मीं पण उत्तर दिलें.

अश्रूंच्या ओघळांनीं माखलेला चेहरा तसाच घेऊन आंद्रिस एक गिरकीसरसा पळत सुटला, आणि सांगितल्याप्रमाणें युरोपच्या दिशेकडे वळला.

त्या वेळीं मला माझ्या लहान भावाची आठवण झाली. आम्ही लहान असतांना एकदां माझा लहान भाऊ असाच संतापला. "तुम्ही कुणी माझ्या दृष्टीसमोर सुद्धां नको. मी पळून जातों घरांतून" असें बडबडूं लागला. मीं शांतपणें त्याची पेटी भरली व त्याच्यापुढें नेऊन ठेवली नि म्हटलें, "जायचें आहे ना? जा. पोहोंचलास कीं एक पत्र पाठव आम्हांला, म्हणजे झालें." पण काय, माझ्या या करण्यानें साराच अवसानघात झाला तो बाहेर पडला पण गल्लीच्या टोकापर्यंत भटकून स्वारी रात्रींच्या जेवणाला फिरून हजर झाली.

आंद्रिसच्या बाबतींत तसेंच केलें तर तो परत येईल अशी माझी कल्पना होती. लहान मुलें रागाचा झटका येऊन अशीं बेफाम झालीं कीं, त्यांना कोंडून ठेवणें शुद्ध वेडेपणाचें आहे असें मला वाटतें.

असें कोंडलें कीं मूल जास्तच भडकतें. लाथा मारून, ओरडून, आक्रस्ताळी-पणा करून मोठ्या माणसांना उच्छाद आणण्यासाठीं त्याला विलक्षण चेव चढतो. मग काय हवें तसें तें वागूं लागतें.

म्हणून आंद्रिसला कोंडून वगैरे ठेवायच्या भानगडींत न पडतां, रस्त्यावर जरा पळूं दिला कीं जाईल त्याचा सारा चेव, या भावनेनें मीं त्याला खुश्शाल बाहेर जाऊं दिला.

पण आमचें घर आंद्रिसला अजून आपलेंसें वाटत नव्हतें. त्यामुळें तो लवकर परत आला नाहीं. उन्हं टळलीं, संध्याकाळ झाली, जेवायची पण वेळ झाली, तरी आंद्रिसचा कुठें पत्ता दिसेना.

ट्रोचा, इन्चा दोघीही मोटर काढून त्याला पाहायला गेल्या. डेव्हिडनें पण सायकल काढली व गल्लींतच कुठें बोळांतून इकडे तिकडे बसला नाहीं ना म्हणून पाहायला गेला.

अखेर आतां पोलिसांत वर्दी द्यावी कीं काय, असा विचार करीत मी पण टेलिफोनजवळ गेलें. इतक्यांत खोलींत हळूच उंदरासारखें कुणी चूं चूं केल्याचा आवाज कानीं आला म्हणून मी गेलें नि पाहूं लागलें. तों तोडक्या मोडक्या खुर्च्यांच्या खालीं आंद्रिसची स्वारी जमिनीवर ताठपणें गुपचूप पडलेली होती.

"मी इथेंच आहें सारा वेळ. तुला माहीत नाहीं?" त्यानें प्रश्न केला.

"एकूण स्वारी घरापासून दूर गेली नाहीं तर." मला जरा बरें बरें वाटलें.

तो अगदीं गुपचूपपणें आवाज न करतां निदान दोन तास तरी तसा पडून राहिला असावा.

"चल, चॉकोलेट केक केली आहे मीं. ये खायला" जणुं काय कांहीं घडलेंच नाहीं, अशा रोजच्या स्वरांत मीं त्याला बोलावलें.

धुळीनें आंग माखलेली अशी ती छोटी मूर्ति हळूच बाहेर येऊन स्वयंपाक-घराच्या खुर्चीवर बसली. एक वेळ मनांत आलें कीं, जा, जरा हातपाय धुवून ये, म्हणून सांगावें. पण मीं स्वतःला आवरलें, आणि केक व दूध त्याच्यापुढें ठेवलें.

"तूं कसं मला शोधून काढलंस?" फिरून तोडक्या मोडक्या इंग्रजींत त्यानें हळूच प्रश्न केला.

"अं, मला वाटलं तूं असतील तिथें आणि भुकेची वेळ झालेली तेव्हां आलें मी."

बराच वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. दुसराही केकचा तुकडा संपला. मग स्वारीची कळी जरा खुलली.

"आम्ही पानांत दडून रशियनांपासून लपून." फिरून तोडक्या मोडक्या इंग्रजींत त्यानें सांगितलें.

"आणखी पाहिजे दूध?" मीं विचारलें.

आंद्रिसनें आणखी चांगलें पेलाभर दूध घेतलें व तो सांगूं लागला. "मी

कितीतरी वेळ असा दडून बसतों. जरा हालचाल नाहीं कीं शिंक नाहीं. बोल्शेव्हिकांची फार भीति वाटते. त्यांच्या बंदुकांवर मोठमोठ्या सुऱ्या असतात. मी खेळत असें त्या माझ्या सोबत्यांपैकीं किती तरी बॉंबनें मेले. मीं पाहिलें त्यांना. आम्ही अगदीं गुपचूप पडून बसत असूं. नाहींतर सारे मरत."

एक मिनिट केकचा तुकडा संपवण्याकरतां थांबून तो फिरून बोलूं लागला, "एकदां आम्ही अंगणांत असे सारे कोबीची आमटी पीत बसलों होतों. झऽऽझऽट करीत विमान आलें. गोळ्या येऊं लागल्या. आणि काय 'टा' 'टा' सारीं मुलें खलास. मी मेलों नाहीं पण मला अधिक खाववेनाच. मी बाकाच्या खालीं ताठ पडून राह्यलों. देवाची जोरजोरानें प्रार्थना केली. इतकी कीं सारें अन्न बाहेरच पडलें. त्या दिवसापासून कोबीची आमटी जातच नाहीं मला."

या अनुभवांतून गेलेला आंद्रिस सामानाच्या कोठींत इतका वेळ पडून राहिला असल्यास कांहींच नवल नाहीं.

पुढेंही कधीं कधीं असा तो लपून राही. एके दिवशीं एक मोटरसायकल-वरचा पोलिस आमच्या रस्त्यानें गेला. त्याला पाहिल्याबरोबर आंद्रिस जो घाबरला तें कांहीं विचारूं नका. पॉप-पॉप असा मोटरसायकलचा बंदुकीसारखा स्फोट झाल्याबरोबर त्याला धडकीच भरली. शिपायाच्या गणवेषानें तर त्याची खात्रीच पटली. 'पोलित्झि' 'पोलित्झि' करीतच तो घरांत धावत आला. उंदीर एकाद्या फटींतून चटकन् दिसेनासा व्हावा तसा तो सटकन् तळघरांत दिसेनासा झाला. फारच विलक्षण होती त्याची वागणूक. एक क्षणापूर्वीं तो उभा होता तर दुसऱ्या क्षणीं जादूची फुंकर घातल्यासारखा दिसेनासा झाला.

ही भीति घालविलीच पाहिजे असा विचार करून मी दुसऱ्या दिवशीं आमच्या जवळच्या नाक्यावर शाळेचा रस्ता ओलांडणाऱ्या मुलांकडे पाहणाऱ्या पोलिसाकडे त्याला घेऊन गेलें. त्या भेटींत सारा वेळ आंद्रिस माझा हात अगदीं घट्ट पकडून उभा होता. किती थंड नि चिकट लागत होता त्याचा हात. मीं सांगितल्याबरोबर अतिशय सावधगिरीनें पण मोठ्या धीरानें तो ऑफिसरसमोर उभा राहिला. मात्र त्याचें अंग भीतीनें कांपत असल्याचें माझ्या लक्षांत येत होतें. त्यानें माझीं बोटें तर इतकीं घट्ट पकडून ठेवलीं होतीं कीं, अक्षरशः माझ्या हातांतील लग्नमुद्रिका बोटांत सलूं लागली. या भेटीचा इष्ट परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. थोड्याच दिवसांनीं रस्त्याच्या बाजूला ठेवलेल्या

मोटरसायकलवर स्वार होतांना मीं त्याला पाहिलें. काय विजयी मुद्रा दिसत होती त्याची !

'अमेरिकेंत पोलिसझी—मित्र' त्यानें मला समजावून सांगितलें. लवकरच त्याची गणवेषाची भीति पण पार उडाली. रस्त्यावरील रहदारी सांभाळणाऱ्या पोलिसाशीं तो हळूहळू वात्यपणाहि करूं लागला.

अशा रीतीनें, सावकाश कां होईना पण अमेरिकन बनायला त्याची सुरवात झाली.

एके दिवशीं दुपारीं आंद्रिस रागावून जो बाहेर गेला तो रात्रीं नऊ वाजले तरी घरींच आला नाहीं. चांगली रात्र झाल्यावर स्वारी हळूच पुढच्या दारानें आंत शिरली. बरं झालं मी त्याला रागावलें नाहीं. कारण हातांत एक लहानसें पुडकें घेऊन तो जो उत्सुकतेनें आला, तो माझ्या मांडीवर पुडकें टाकूनच थांबला. मी उघडून पाहतें तों एक लाल चकचकीत होपालांग कॅसीडीचें चित्र असलेलें छान पाकीट.

"मीं तुला देणगी ठेवला." त्यानें मला सांगितलें व हळूच विचारलें, "तुला आवडतो? तूं ठेवतेस?"

"हो. मला आवडलें बरें" असें म्हणून आमची आई अशा आम्हीं देणग्या दिल्या कीं त्यांचा मुका घेत असे त्याप्रमाणें त्या पाकिटाचें मीं चुंबन घेतलें. तिनें असें केलें कीं तिला तें आवडलें अशी आमची खात्री पटे व आमचें समाधान होई. मला पाकिटाचा मुका घेतांना पाहून आंद्रिसचें पण तसें समाधान झालें असावें. "तुला आवडतो? तूं मुका घेतो? तूं ठेवतो?" आनंदानें त्यानें मला विचारलें.

खरं म्हणजे त्याला खर्चाला म्हणून जे आम्ही पैसे देत असूं ते सारे त्यानें माझ्यावर खर्च केले होतें. मला त्याचें कौतुक वाटलें. मी म्हणालें कीं "हो, मला आवडलें आहे बरें पाकीट, म्हणूनच मीं त्याचा मुका घेतला. आणि मी ठेवणार पण आहे तें."

खरं म्हणजे त्याच्या मानसिक अवस्थेंत जो एक झपाट्यानें बदल होत चालला होता त्याची ही एक मजेदार खूण होती. तो चुकला कीं आपण चुकलों हें कबूल करायला त्याला आवडत नसे. मग अशा वेळीं लहानशी देणगी देऊन तो एक प्रकारें तडजोडच करी.

असल्या बारीक सारीक गोष्टी त्याला वाटल्यास विकत घेतां याव्या याकरतां

थोडेबहुत पैसे मी त्याला खर्चाला म्हणून देत असें. हेतु एवढाच होता कीं, पैसा नाहीं म्हणून अशा गोष्टी घ्यायला पैसे चोरायचा त्याला मोह होऊं नये. स्वतः-करतां वस्तु विकत घेण्यापेक्षां त्याचे सारे पैसे बहुशः असे दुसऱ्याकरतां कांहीं घेण्यांतच खर्च होत. नेहमीं माझ्याकरतां त्यानें कांहीं वस्तु आणली कीं माझ्यापुढें करून "आवडलो? ठेवशील तूं?" असें नेहमीं तो मला विचारायचा व त्यानंतर मी जर मुका घ्यायला विसरलें तर "तूं मुका घेतेस ना?" म्हणून लगेच मला हटकायचा.

एके दिवशीं फारच गंमत झाली. त्यानें मला आधीं कमालीचा त्रास दिला होता पण अखेर त्याला पश्चात्ताप झाला व मग हुंदक्यावर हुंदके सुरू झाले. "आतां तूं मला नाई ठेवतो यापुढें? मी फार वाईट. तूं देणार धाडून?" रडत रडत त्यानें मला प्रश्न केला.

मी त्याला पाठवणार नाहीं म्हणून समजावलें व अखेर सांगितलें, "आंद्रिस मला आवडतो. मी मुका घेतें त्याचा. व ठेवतें त्याला." देणगी स्वीकारतांना होणारी आमची भाषा निघाल्याबरोबर, त्या अश्रूंतून एकदम हास्याचें इंद्रधनुष्य उमटलें.

इतक्या दिवसांनंतर आंद्रिसला परत पाठविणें शक्यच नव्हतें. आतां तो आमच्या घरांतील एक असा झाला होता. तो गेला असता तर घर सुनें वाटलें असतें आम्हांला!

माझ्या मुलींचीं जशीं त्यानें लाडकीं नांवें ठेवलीं होतीं तसें मला मात्र त्यानें कांहीं नांव दिलें नव्हतें. तो एकीला ट्रोचा म्हणे, एकीला इन्चा म्हणे. पण मला मात्र मिसिसच म्हणत असे. आम्ही मात्र त्याला नेहमीं आंद्रिसच म्हणत असूं. पुढें एके दिवशीं त्यानें आम्हांला लटाव्हियांतील देखावा असलेलें एक कार्ड दाखविलें. त्यावर त्याला आंद्रितिन्स असें लिहिलें होतें. त्याचा अर्थ बहुधा छोटा, लाडका, आंद्रिस असा असावा असें आम्हांला वाटलें व तेव्हांपासून आम्ही त्याला आंद्रितिन्स म्हणायचें ठरवलें. त्याला मोठी गंमत वाटली या नांवाची व हासूंही आलें.

त्यानें मोठ्या आश्चर्यानेंच विचारलें, "असें कसें? तुम्हांला माझी भाषा येते?"

त्याचें आंद्रितिन्स हें नांव कांहीं काळ चाललें पण हळूहळू तिन्सचें शेपूट गळून नुसतें आंद्रि एवढेंच राहिलें. पुढेंपुढें तर आम्ही त्याला टिन्स, टिन्च किंवा टिन्ची अशीच हाक मारीत असूं. आमचीं हीं नांवें त्याला मोठीं गंमतीचीं वाटून

हंसू यावयाचें पण अशा टोपणनांवापाठीमागें दिसून येणारी आपुलकी त्याला कळत असे त्यामुळें त्याला त्या शब्दांची गंमत वाटली तरी नांव आवडे. एकूण आतां आंद्रिस आमच्या कुटुंबीय मंडळीपैकीं एक झाला होता यांत संशय नाहीं.

एवढें मात्र खरें कीं आमच्यांत तो जरी मिसळून गेला असला तरी कधीं कधीं तो कारण नसतांच उदास होई. किंवा विनाकारण भडकून जाई. जर्मनीला जायच्या तो गोष्टी करूं लागला कीं समजावें कीं स्वारीचें कांहीं बिघडलेलें आहे. खरं म्हणजे महायुद्धाच्या प्रचंड खाईत तों जर्मनींत होता. तिथलें त्याचें आयुष्य किती कष्टाचें होतें! पण अशा वेळीं तो तें सारें विसरून जाई आणि त्याचें मन फक्त गोड आनंदस्मृतींनींच तेवढें भरून येई.

"जर्मनी किती छान. अमेरिका नसे छान." त्याचें मन व्याकुळ होऊन बोलूं लागे. "जर्मनींत कुंपणाकुंपणावर गुलाबाचीं फुलें असतात आणि रस्त्यावर झाडें तरी किती? सारा रस्ता पानांच्या छतानें नुसता झाकलेला." तो आम्हांला सांगूं लागे.

"मोठा झालास कीं...तुला अमेरिकन नागरिक व्हायला नाहीं आवडायचें?" असं आम्ही कधीं कधीं त्याला विचारीत असूं. पण प्रत्येक वेळीं त्याचें एकच उत्तर ठरलेलें असे. "नाय नाय मुळींच नाय. मी मोठा झालों कीं माझ्या लटाव्हियाला जाणार, बोलशेव्हिकांशीं लढणार, नी माझा देश स्वतंत्र करणार."

त्याच्या या उत्तरानें आम्हांला कधींच वाईट वाटलें नाहीं. उलट त्याच्या स्वदेशप्रेमाबद्दल आदर वाटे. आणि साहजिकच नव्हतें का तें? मायदेश पारतंत्र्याच्या शृंखलांनीं जखडलेला असतां केवळअ मेरिकेंत सुखानें राहायला मिळतें म्हणून स्वदेशाला विसरणें हें कोणत्याही देशाभिमानी लटाव्हियन माणसाला उचितच झालें नसतें.

तो जर्मनीच्या लटाव्हियाच्या अशा गोष्टी करूं लागला कीं, डेव्हिड आम्हांला नेहमीं सांगे, "या पोराला दुसरें तिसरें कांहीं झालेलें नाहीं. याला घरची आठवण येते म्हणून हा असें करतो." "बापरे, कुठेंच घर नसतांना अशी घराची आठवण होऊं लागली म्हणजे काय होतें हें मला विचारा. माणूस नुसता वेडा होत जातो. तसेंच होतें त्याला. त्याचा राग, खिन्नता या सगळ्यांच्या मुळाशीं ही घराची आठवण असे आणि ती त्याला वेडें करते."

पर्ल बक या लेखिकेनें कुठेंसें म्हटलें आहे कीं मुलाला वाढवितांना, शाळेंत

घालतांना तो तिथें सुखासमाधानानें रमूं शकतो कीं नाहीं हें पहिल्यांदा पाहा, मग सार्‍या गोष्टी आपोआप होतात. आंद्रिसच्या बाबतींत, लेखिकेचे हे बोल माझ्या मनांत पक्के ठसले होते. म्हणूनच अभ्यासाच्या बाबतींत त्याच्यावर कोणत्याहि तर्‍हेचें दडपण न आणण्याचें आम्हीं ठरविलें. त्याला बरें वाटावें व त्यानें सुखा-समाधानानें राहावें, एवढीच आमची सारी खाटपट असे.

एक गोष्ट मला मात्र नक्की वाटत असे ती ही कीं, हा मुलगा कुठल्या परक्या परदेशांतून आलेला, त्याला घर ना दार, अशा वेळीं त्याला इतकी घराची आठवण होते याचा खरा अर्थ म्हणजे त्याला पोटांत अवढण पडल्यासारखें होतें. त्याच्या वयाची असतां, मी व्हर्जिनियामधून आलें, तेव्हां मला सुद्धां तसंच होत नसे का? लोणी लावलेलीं बिस्किटें, तळलेला हॅम, मक्याचा पाव, अगदीं शेतावर तळलेली कोंबडी, घरीं केलेलें ताक आणि मटार यांची सारखी मला आठवण व्हायची व हे पदार्थ मिळाले नाहींत कीं अन्नावरची वासना उडून खातांना चिडल्यासारखें होई.

आम्ही खात असलेले पांढरे पाव टिन्चीला बिलकुल आवडत नसत. "काय ग, अमेरिकेंत चांगला काळा पाव मिळतच नाहीं का?" तो मला नेहमीं विचारी. "छीः! काय हा पांढरा पाव! लगदाच्या लगदा नुसता! शीः!" तो नेहमीं म्हणायचा.

एक दिवस मीं मुद्दाम तसा पाव मिळवायचा प्रयत्न केला. अगदीं काळाकुट्ट व कापला कीं लाकडाच्या फळीसारखे कठीण तुकडे असा पाव एकदांचा मला मिळाला. त्या दिवशीं टिन्चीला बराच चीझ व तो पाव मीं खायला दिला. काय आनंद झालाय् त्याला! त्याला सगळ्या प्रकारचा चीझ आवडायचा. पण केळीं त्याला बिलकुल आवडत नसत. टोमॅटोंना तर काय भयंकर पदार्थ म्हणून तो पानांतहि पडून द्यावयाचा नाहीं. स्टीक—कोण महागाईचा पदार्थ—पण त्याला तो बिलकुल आवडत नसे. कधीं खायचा फारच आग्रह केला तर तोंडांत भराभर कोंबायचा व मग थुंकून टाकायचा. सार्‍या प्रकारची मासळी मात्र त्याला भारी आवडे. त्यामुळें किती तरी दिवस आम्हीं सर्वांनींसुद्धां नुसता मासळीवरच सपाटा चालविला होता.

"काय ग, तुम्ही कधीं बटाट्याची आमटी नाहीं का करीत?" एक दिवस त्याला आठवण होऊनच त्यानें विचारलें. लगेच मीं खूपसे कांदे वगैरे घालून बटाट्याची आमटी केली. ती पाहतांच टिन्ची नुसता नाचायला लागला. "वा!

मजा ! छान ! आइस्क्रीमपेक्षां सुद्धां किती चांगली लागते," असें म्हणून त्यानें नुसती आमटीच भुरकली त्या दिवशीं.

मी त्याच्याकडे पाहत होतें. डोळे मिटून एकेक घोट अगदीं मोठ्या खुषीनें चव घेत घेत तो घशाखालीं सोडीत होता. ती आमटी खात असतां बहुधा त्याच्या जीवनस्मृतींतील एक सुखसंवेदनाच जागी झाली असावी. यापुढें कधीं तो जरा कुरबुरून नाखूष होतो आहे असें माझ्या ध्यानांत आलें कीं, मी ही आमटी करीं. ती पाहतांच स्वारी लागलीच खुषींत येई. पण मजा ही कीं कोणत्याहि तऱ्हेची कँडी (टॉफी) त्याला कधींच आवडत नसे. खायच्या 'गम'ला 'गाईचा कडबा' म्हणून तो कधीं ढुंकूनसुद्धां पाहत नसे तिकडे.

मला वाटतें, युद्धकैद्यांच्या छावण्यांतून राहत असल्यानें त्याला साखर कधीं मिळालीच नसावी. त्यामुळें एक मात्र झालें होतें. अर्धपोटीं असला तरी त्याचे दांत छानच होते. कुठें एक किडका दांत नाहीं कीं फट नाहीं. सगळे कसे सारखे, नीट बसविल्यासारखे. पण दांत घासायची मात्र त्याला बिलकुल संवय नव्हती. दूध प्यायची सुद्धां त्याला बिलकुल संवय नव्हती. त्याला दुधापेक्षां कॉफीच आवडे. संत्रीं मात्र त्याला खूप आवडत. त्यामुळें दुधाची संवय लागेपर्यंत कांहीं दिवस आम्ही संत्र्याचा रसच त्याला देत होतों. आमचे पोर्कचे चॉप्स मात्र त्याला चांगलेच आवडूं लागले.

आमचे बरेचसे पदार्थ त्याला अगदींच नवीन होते. आणि नवीन पदार्थ म्हटला कीं टिन्चीला फारसा चालत नसे. शेवटीं, पानावर वाढलेलें सगळें 'एकदां तरी चाखून पाह्यचं हं' असा आम्हीं खेळच सुरू केला जेवतांना. अर्थात् सगळ्यांबरोबर तोहि मोठ्या धीरानें ताटांतील नवा पदार्थ हळूच चाखून पाहूं लागला कीं आम्ही सारीं खुष होऊन टाळ्या पिटीत असूं. अशा रीतीनें हळू हळू टिन्ची पानावर वाढलेलें सारें खाऊं लागला. त्याला नेहमीं अवढण पडल्या-सारखें मला वाटे तें पण पार कुठल्याकुठें नाहींसें झालें. थोड्याच दिवसांत तो सारे अमेरिकन पदार्थ—स्टीक सुद्धा—मोठ्या आवडीनें खाऊं लागला.

अमेरिकन पदार्थांपैकीं त्याला पहिल्यांदा भारी आवडला असा पदार्थ म्हणजे आमच्या राष्ट्राचें वैशिष्ट्य म्हणून गणला जाणारा 'हॉट डॉग'. त्यानंतरची जागा स्ट्रॉबेरी आइस्क्रीमनें पटकावली. तें त्याला इतकें आवडूं लागलें कीं नांव उच्चारतांना सुद्धां तो मोठ्या आवडीनें र अगदीं घोळवून लांब ओढून उच्चारायचा.

त्यानंतरचा नंबर 'ब्लुबेरी पाम'ला देतां येईल. पण तिला पाम म्हणण्या-

ऐवजीं तो नेहमीं 'पाईप' च म्हणून म्हणायचा. बाकी 'ब्लुबेरी पाम' ची पाळी येईपर्यंत बहुतेक अमेरिकन पदार्थ त्याला आवडूं लागले होते. 'डिलिऽऽऽशस छाऽऽऽऽन' असें म्हणून त्यांचा स्वाद चाखायला तो शिकला होता. "वाः झकास ! कधीं खाल्लाच नव्हता इतका स्वादिष्ट पदार्थ !" असें तो जर्मन पद्धतीनें इंग्रजी वाक्यरचना करून सांगायचा तेव्हां मोठी मजा वाटे.

नव्या जागीं माणसाला पहिल्यांदा अन्नाचें अवढण पडतें व त्यामुळें तो बेचैन होतो, हा माझा तर्क खरा ठरून आंद्रिस अमेरिकन पदार्थ आवडीनें खायला लागल्याबरोबर त्याचा रुसवा-फुगवा, रागाचे झटके, सारें गेलें असें मला सांगतां आलें असतें तर किती बरें झालें असतें. पण तसें झालें नाहीं. आमच्याकडे आंद्रिस मे मध्यें राहायला आला. तेव्हांपासून त्या साऱ्या उन्हाळाभर अधून-मधून वारंवार त्याच्या अंगांत येतच होतें.

त्यानें अंगणांत विस्तव पेटविल्यामुळें मी रागावलें व त्यानंतर जें त्याच्या अंगांत आलें तें अगदीं कमालीचें अशी त्या वेळीं आमची समजूत झाली होती. पण लवकरच कळून आलें कीं तो एक लहानसा, नुसता नमुना होता. दिवसानु-दिवस असें अंगांत आलें कीं, त्याचा आक्रस्ताळीपणा, आरडाओरड इतकीं वाढत चालली कीं एक दिवस तर त्यानें विक्रमच करून दाखवला म्हटलें तरी चालेल. संध्याकाळीं साडेपांचपासून जी स्वारीची सुरुवात झाली ती मध्यरात्रीपर्यंत. सारा वेळ त्यानें इतका धिंगाणा घातला कीं, ओरडून ओरडून त्याचा आवाज नुसता पिंजून गेला.

तो घराच्या बाहेर तर धावत गेलाच, पण साऱ्या गल्लीभर कांहीं वेळ नुसता ओरडत खालीं-वर फेऱ्या मारीत होता. त्याच्या मागें धावून त्याला पकडून आणायचें म्हटलें तर किती कठीण होतें तें काम ! जरा जवळ गेलें कीं आडवा-तिडवा नागमोडी पळत सुटून कुठें झुडुपांमागें दडायचा तो त्या वाढत्या अंधारांत दिसायचा सुद्धां नाहीं.

त्या दिवशीं, त्याचें बिनसण्याचें कारण तसें पाहिलें तर अगदींच क्षुल्लक होतें. पण एवढें खरें कीं, त्याला अन्याय झाला अशी जर त्याची भावना झाली असली तरी त्यांतहि अगदीं चूक होती असें नाहीं.

खरं म्हणजे टिन्ची पाव आणीत असे; पण तो थकला होता म्हणून म्हणा किंवा त्याला भूक लागली होती म्हणून म्हणा, पहिल्यापासूनच तो जरा नाखूष होता. तेव्हां आम्हीं म्हटलें, कशाला उगीच? डेव्हीलाच पाठवा ना. असें म्हणून डेव्हीला

बाजारांतून पाव आणायला मीं सांगितलें. त्या गडबडींत डेव्ही जो टिन्चीच्या सायकलवर टांग मारून गेला, तो गेलाच.

वास्तविक सायकल घ्यायची असल्यास, तो नेहमीं टिन्चीला आधीं विचारी. टिन्चीनें पण त्याला आजपर्यंत कधीं नाहीं म्हटलें नव्हतें. पण त्या दिवशीं गडबडींत तो विचारायचें विसरला नि टिन्चीला न सांगतांच त्यानें त्याची सायकल घेतली. झालं. त्यामुळें बिनसून स्वारी घुश्शांत आली. "कां माझी सायकल न विचारतां घेतली?" असें म्हणून किंचाळतच तो डेव्हीच्या मागें धावला. पण डेव्हीनें सायकल जी भरधाव सोडली होती त्यांत त्याला ऐकूं सुद्धां आलें नाहीं त्याचें ओरडणें. थोड्याच वेळांत डेव्हिड पाव घेऊन पण आला; पण आतां टिन्ची पावाला शिवेच ना. किती वेळ तरी तो बाहेरच झुडपांझुडपांतून ओरडत, भटकत राहिला. सारे शेजारी काय झालें, म्हणून पाह्यला लागले. पण टिन्चीचा ओरडा कांहीं केल्या थांबेना. अखेर मीं त्याच्याकडे लक्षच द्यायचें नाहीं, असें ठरवलें. मात्र झोपेची वेळ झाली तरी झोपलें नाहीं. किती दिवस गरम कपड्यांकडे लक्ष द्यायला मला वेळच झाला नव्हता. जून उलटला तरी टिन्चीच्या साऱ्या भानगडींनीं मीं कांहीं त्यांच्याकडे पाहिलें नव्हतें. म्हणून कसरीनें खाऊं नये म्हणून औषधी शिडकाव मारायच्या हेतूनें मीं सारे कपडे काढले. मीं माझें काम चालविलें नि त्याच्याकडे लक्ष दिलें नाहीं, हें पाहून टिन्ची मात्र फारच रागावला. किती तरी वेळ मी काम करीत होतें त्या ठिकाणीं, खिडकीशीं, मांजरासारखा तो सारखा दारावर ओरबाडीत होता.

मी लक्ष देत नाहीं असें पाहून, अखेर माझें लक्ष वेधण्याकरतां स्वारीनें एकाएकीं दारांतून आंत उडी मारली, मीं शिडकाव करीत असलेली पिचकारी पालथी केली, नि फिरून बाहेर उडी मारून, धाडकन दरवाजा लोटून घेतला.

इतकें झालें तरीहि मी कांहीं लक्ष न देतां काम करीतच राहिलें. मग टिन्ची कुठला गप्प बसायला! कुणीकडून तरी त्याला माझें लक्ष वेधायचें होतें. मी पिचकारीचे फवारे सोडीत होतें तरी माझ्यापुढें येऊन सारखा तो मागेंपुढें नाचूं लागला.

"थांबव पाहूं तुझा नाच!" अखेर मी चिडूनच ओरडलें. पण नाच थांबवायच्या ऐवजीं, तो मुसंडी मारीतच माझ्याकडे येऊं लागला. तेव्हां मात्र मीं हातांतील पिचकारी उगारली.

ती पिचकारी त्यानें टाळली पण खालचा डब्याचा कोपरा मात्र त्याच्या डोक्याला पाठीमागें लागला नि भळभळा रक्त वाहूं लागलें. झालें, फिरून

किंचाळत, त्यानें बाहेर अंधारांत धूमच ठोकली. मला काय करावें तें सुचेना. इतक्यांत, साधारण मध्यरात्रीच्या सुमारास, आमच्या शेजारीणबाईचा मला फोन आला कीं, मी माझ्या मुलाला पाठवून त्याच्याकरवीं आंद्रिसला टेलिव्हिजन पाहायला बोलावून घेतें. तो आला नि आंत बसला कीं तुम्ही या नि त्याला घेऊन जा.

मी पाहत होतें. आम्हां सर्वांना धुडकारून जणुं काय डिवचण्याकरतांच म्हणून रस्त्याच्या मध्यावर उभा राहून मोठ्यामोठ्यानें कर्कशपणें किंचाळ्या ठोकीत तो उभा होता. इतक्यांत शेजारच्या टॉमीनें त्याला टेलिव्हिजन पाहायला बोलावलें. पण एवढ्याहि धुस्शांत तो माझें सांगणें विसरला नव्हता. तो चटकन् गेला नाहीं. "बाईला नको तर मी नाहीं येत." असें म्हणून. त्यानें टेलिव्हिजन पाहायचें नाकारलें. टॉमीच्या घरीं जाऊन सारखा टेलिव्हिजन पाहायला मी त्याला परवानगी देत नसें ही गोष्ट खरी होती. त्यानें किती वेळां जायचें आणि कोणतें कार्यक्रम पाहावयाचे तेंसुद्धां मी ठरवून देत असें. मला वाटलें, एवढें आतां याच्या अंगांत वारें शिरलें असतांना हा कुठला ऐकायला? पण नाहीं, तसें कांहीं झालें नाहीं. एवढ्या रागाच्या भरांत, मध्यरात्रीं रस्त्यावर उभा असतांना, 'बाईची ना नसेल तर येतों' असें त्यानें टॉमीला उत्तर दिलें, व माझी ना नाहीं हें कळल्यावरच तो त्यांच्या घरांत टेलिव्हिजन पाहायला गेला. थोड्याच वेळानें ठरल्याप्रमाणें मीं त्याला पकडून आणायला गेलें.

काय दिसत होतं त्याचं ध्यान. डोळे रडून रडून मुठीसारखे सुजलेले. तोंड, मान, कपडे यांवर डोक्याला खोंच पडल्यामुळें जागोजाग रक्ताचे डाग पडलेले. तरी तेवढ्यांतहि तो कांहीं सुधेपणीं घरीं आला नाहीं. मीं त्याला घरीं आणला तरी सारखा लाथा झाडीत ओरडत होता. त्या दिवशीं घरांत तर कुणी नव्हतें. म्हणून अखेर मीं टॉमीच्या वडलांना त्याला वर न्यायला मला मदत करण्याबद्दल विनंती केली. पण त्यांनीं चक्क कांहीं करायचें नाकारलें. अखेर मला एकटीलाच त्याला तसाच वर नेऊन स्वच्छ करून निजवावा लागला.

पुढें टॉमीच्या वडलांनीं मला एक दिवस सांगितलें कीं, "तुम्हांला त्या स्थितींत नाहीं म्हणायचें माझ्या इतकें जिवावर आलें होतें कीं विचारू नका; पण त्या पोराचा मला असा राग आला होता कीं त्या वेळीं माझा नुसता एकदां त्याला हात लागला असता तर गर्दनच मोडून पडली असती त्याची. इतका उच्छाद मांडला होता कारट्यानें. तुम्ही कसं त्याला वागवून घेतां कोण जाणे!"

फिरून असेंच जेव्हां टिन्चीच्या अंगांत आलें तेव्हां माझा डॉक्टर झालेला मुलगा शनिवार-आदितवारच्या सुट्टीला घरीं आला होता. त्या दिवशीं आदितवार असल्यानें सकाळची न्याहरी जरा उशिरां व्हायची होती. पण टिन्ची उठल्यापासून सारखा भूक भूक करूं लागला.

'लहान आहे, लागली असेल भूक' म्हणून मीं त्याला सांगितलें कीं, "ये, जरा टेबल न्याहरीकरतां नीट मांडायचं आहे, तें करायला मला मदत कर. तें झालं कीं कोणी उठलं नाहीं तरी मी तुला न्याहरीला देईन."

"अं ऽऽऽ अं—मी नाहीं बसायचा आधीं. मी नाहीं टेबल मांडायचा. बायकांचं काम आहे तें..." झाली त्याची भुणभुण सुरू.

टेबल लावायला सांगण्यांत त्याचा मीं अपमान केला असेंच त्याला वाटलें, त्यामुळें चिडून नाहींच नाहीं करायचा अशी त्याची आरडाओरड सुरू झाली.

त्या दिवशीं आमच्या घरीं मंडळी यायची होती. त्यांच्या देखत याचा तमाशा नको म्हणून मीं अखेर त्याला निराळेंच बसवायचें ठरविलें. थोडक्यांत त्याच्या खोलींत त्याला मीं कोंडलेंच म्हणा ना! खरं म्हणाल तर असं कोंडणं मला सुद्धां आवडत नाहीं. पण त्या दिवशीं पाहुणे येणार असल्यानें दुसरा इलाजच नव्हता.

त्या वेळीं सकाळचे साडेआठ वाजले होते. पण तेव्हांपासून बारापर्यंत त्यानें जो काय तमाशा केला तो औरच. खोलींतल्या भिंतीवर जोरजोरानें डोकें आपटीत, सारखा तो किंचाळत होता. अखेर ऐकवेना तो आवाज आम्हांला!

माझ्या मुलानें एक झोपेची गोळी घेतली नि तो त्याला द्यायला गेला.

त्याला पाहतांच टिन्चीला अधिकच चेव चढला. "जा, तुम्ही व्हा चालते!" म्हणून तो जोरजोरानें अधिकच किंचाळू लागला.

"बघ ही गोळी घेतलीस कीं बरें वाटेल तुला."

पण गोळी घ्यायच्या ऐवजीं तो त्याच्या डोळ्यावर थुंकलाच.

"बघ गोळी घेतली नाहींस तर तुला बरें वाटायला मला औषध टोचावें लागेल बरें." माझ्या मुलानें प्रथम समजुतीनें त्याला सांगून पाहिलें. अखेर टिन्चीला कळायच्या आंतच त्याचा दंड पकडून इंजक्शन दिलें सुद्धां. त्यानंतर कुठें टिन्चीची आरडाओरड थांबून तो झोपीं गेला. किती शांत नि हायसें वाटलें तो झोपीं गेल्यावर!

टिन्चीच्या अंगांत भूत येऊन तो असा ओरडूं लागला कीं भर रस्त्यांत

मोटारीचा भोंगा सुरू होऊन तो बंद करतां येऊं नये तसें मला व्हायचें. टिन्चीचा एकदां भोंगा सुरू झाला कीं डॉक्टरशिवाय मुळीं बंदच करतां येत नसे.

अशा वेळीं तो एकदां शांत होऊन निजला तरी कांहीं वेळ आम्हांला एकदम धसका बसून हा फिरून ओरडत नाहीं ना म्हणून आम्ही किती तरी वेळां कानोसा घेत असूं.

त्याचा हा असा प्रकार पाहून सहानुभूति वाटत असलेले एक शेजारी एक वेळ मला म्हणाले सुद्धां, "बाई, तुम्ही एवढें करतां आहां, पण झाल्या गेल्या परिस्थितीनें या पोराच्या सगळ्या नर्व्हज फार चाल झालेल्या मोटारच्या टायर-सारख्या झिजून अगदीं बेकाम झाल्या आहेत. तुम्हांला वाटतें त्या नीट वळणावर येऊन काम देतील म्हणून!"

आतांपर्यंत एक गोष्ट आम्हांला कळून चुकली होती कीं, आपल्याला जरा अन्याय झाला असें वाटलें कीं टिन्चीला मोठा घुस्सा येत असे. आणि त्यामुळेंच त्याच्या अंगांत यावयाचें. अंगांत आल्यावर तो कसा वागेल याचा नेम सांगतां येत नसे.

त्याचप्रमाणें जरासा जरी त्याच्यावर कोणीं अधिकार गाजवायचा प्रयत्न केला किंवा हुकमत दाखवली कीं त्याचें मन बंड करून उठलेंच म्हणून खुशाल समजावें. जणुं असें कोणाचें वर्चस्व सहन करायचें नाहीं असें ठरवूनच तो वागत असावा. या सगळ्यामुळें 'जा तोंड धू, केस सार' अशा साध्या साध्या गोष्टीसुद्धां त्याला सांगायची मोठी पंचाईत होई. अशा तऱ्हेच्या आज्ञा म्हणजे आपल्या व्यक्तिस्वातंत्र्यावर घातलेला एक घाला असेंच त्याला वाटत होतें कीं काय न कळे! पण एवढें खरें कीं असे कधीं कुणीं त्याला कांहीं हुकूम केले कीं तो बिलकुल ऐकत नसे.

तो असा अगदीं बेताल झाला कीं त्याला आवरण्याकरतां म्हणून सहज देतां येईल अशा तऱ्हेचें एक इंजेक्शन माझ्या मुलानें अगदीं तयारच करून ठेवलें होतें. पण तें वापरायची ज्या दिवशीं पाळी आली, त्या वेळीं मीं सुई घालायच्या आंतच त्यानें त्यावर असा जोरानें हात मारला कीं सुई सरळ त्याच्या हातांत घुसली. त्यानें चिडून ती वाकवली व जोरानें हातांतून काढली आणि खालीं फेकून त्या इंजेक्शनच्या पिचकारीवर यथेच्छ नाचून काचेचें नुसतें पीठ केलें बुटाखालीं. अखेरीला त्यादिवशीं गांवांतला एक डॉक्टर बोलावला तेव्हां कुठें सारें शांत झालें.

दुसऱ्या एका वेळेला त्याच्या असेंच अंगांत आलें, तेव्हां तर बुधवार. डॉक्टरांचा सुट्टीचा वार असल्यानें एकहि डॉक्टर मिळेना. दुसऱ्या कोणाला बोलवावें हें

मला कळेना. तेव्हां त्याला तशा अवतारांतच बांधून आम्हीं गाडींत घातला व हॉस्पिटलमध्यें नेला. वास्तविक अशा रीतीनें मुलांना बांधलें कीं तीं अधिकच बिथरतात हें मला कळत होतें. पण दुसरा इलाजच नसल्यानें त्याला बांधून नेण्याखेरीज गत्यंतर नव्हतें.

त्या दिवशीं दवाखान्यांतसुद्धां हायपोचें इंजेक्शन द्यायला एक नर्स व दोन माणसें यांनीं दाबून धरला तेव्हां कुठें इंजेक्शन देतां आलें.

सगळे डॉक्टर त्याच्याशीं फारच गोडीगुलाबीनें वागत व मला म्हणत, "बाई, जरा धीर धरा थोडे दिवस, तो इथें रुळला कीं गाडें आपोआप वळणावर येईल."

यानंतर टिन्चीचें गाडें कांहीं दिवस नीट सुरळीत चाललें. पण फिरून एके दिवशीं काम घसरलें. त्या दिवशीं त्यानें आपल्या खोलींत प्रत्येक गोष्टीच्या चिंध्याचिंध्या करून टाकल्या. डेस्क, कपाट, बुककेस यांतून सारें भराभर काढून तो खुशाल जमिनीवर फेकीत होता सारें. सारें संपलें तेव्हां कचऱ्याची टोपली त्यानें त्यावर पालथी केली. अखेर कांहीं दिसेना म्हणून भिंतींवरचीं चित्रें काढून भराभर फेकायला त्यानें सुरुवात केली. शेवटीं तर सर्व सामानावर खालीं-वर उड्या मारून नाचून तो चुराडा करूं लागला.

डेव्हिड बिचारा त्याची समजूत घालायचा प्रयत्न करीत होता. पण व्यर्थ! मुलींनीं त्याच्याकडे लक्षच द्यायचें नाहीं असें ठरविलें. आणि मी तर इतकी थकलें होतें कीं मला कांहीं करायचें त्राणच नव्हतें. सुदैवानें जिमी जॉन त्या दिवशीं कॉलेजांतून घरीं आला होता. आणि तो जरा कडकच होता. त्यानें अखेर डॉक्टर येईपर्यंत टिन्चीला असा दाबून ठेवला कीं यंव. अखेर डॉक्टर आले नि सारें ठीक झालें. त्या चार महिन्यांत जवळजवळ पांच वेळां डॉक्टरांना बोलावून त्याला इंजेक्शन देण्याची पाळी त्यानें आणली.

या सगळ्या गडबडींत एका गोष्टीबद्दल मात्र आम्ही अत्यंत काळजी घेत होतों. ती ही कीं, त्याला शिक्षा म्हणून इंजेक्शन देत नसून बरें वाटावें म्हणून आम्ही डॉक्टराकडून टोचतों अशी त्याची समजूत व्हावी. "तूं असं वेड्यासारखं करतोस तो कांहीं वाईट म्हणून नाहीं, तर तुला कांहीं तरी होतं, मग तूं असं करतोस आणि त्याकरतांच डॉक्टरचं औषध टोचलं कीं तुला बरं वाटतं!" अशी आम्हीं त्याची समजूत करून दिली होती. त्यामुळें टोंचून घ्यायची त्याला कधीं भीति वाटली नाहीं. त्याचमुळें पुढें कॅम्पला जायच्या आधीं ॲन्टिटिटॅनस, टायफॉईड यांचीं इंजेक्शनें जेव्हां त्याला दिलीं तेव्हां तो कधींच भ्यायला नाहीं.

टिन्चीचे असे रागाचे झटके आवरून त्याला नीट समजून सांगायला इन्चाचा मला भारी उपयोग झाला. "आमच्या घरांत दोन मुलं आहेत हं. एक आहे आंद्रिस व एक आहे कार्लिस." कार्लिस हें नांव, आंद्रिस ज्या त्याच्या मुलांच्या निरनिराळ्या गोष्टी सांगत असे, त्यांतूनच तिनें घेतलें होतें. "आंद्रिस चांगला आहे. पण कार्लिस भुत्या आहे. वाईट आहे. टिन्ची, सांग पाहूं कार्लिसला, म्हणावं चालता हो आमच्या घरून. आमच्या घरीं नको राहूंस." असें म्हणून ती त्याला गमतीगमतीनें चिडवायची.

"छे, मी कांहीं असा खुळा नाहीं. बघ कुठें आहे कार्लिस? आंद्रिसच आहे."

"वा:, आंद्रिस असला तर चांगला. आम्हांला तो भारी आवडतो. पण कार्लिस? शीः शीः वाईट, नको तो."

अशा वेळीं किंचित् ईर्षेनें, जरा थट्टेनें, तो पण तिला सांगे, "पाहा पाहूं, एकच आंद्रिस आहे, आतां दुसरा कुठें आहे बघ."

अशा रीतीनें दोन मुलें व्हायची कल्पना त्याला आवडत असे. पण तो जरा घुश्शांत येऊं पाहतो आहे असें वाटलें कीं इन्चा मात्र लगेच म्हणायची, "आला रे बाबा तो भुत्या कार्लिस. कार्ले! नीघ बघूं इथून! जातोस कीं नाहीं! कां सतावतोस आमच्या टिन्चीला?"

असें तिनें म्हटलें कीं केव्हां केव्हां स्वारी हसून एकदम खुषींत यायची. मग लगेच इन्चा टाळ्या पिटून म्हणे, "गेला रे बाबा भुत्या; जा रे बाबा बाहेर." असें म्हणून ती दार उघडून मोठ्यानें सांगायची, "हें बघ कार्ले, एकदां सांगितलें आहे कीं या घरीं येत जाऊं नको म्हणून. नीट लक्षांत ठेव बघूं तें. नाहीं तर असा चोप देऊं!" असें तिनें म्हटलें कीं अंगांतला भुत्या निघून आंद्रिस हळू-हळू हसूं लागे.

## ३. ‘रागाचे झटके नि अंगांत येणें वाढतच चाललें.’

उन्हाळ्याचे दिवस जात होते. दिवसेंदिवस आंद्रिसचा सहवास आम्हांल अधिकाधिक प्रिय होऊं लागला होता. किती मजेदार पोरगा होता तो! पण याच अवधींत कार्लिसच्या भेटी पण वारंवार वाढूं लागल्या.

एक दिवस आंद्रिस इतका रागावला कीं ट्रोचाच्या डोक्यावर त्यानें तिचा कॅमेराच फेंकला. तो सरळ भिंतीवर आपटून त्याचे तुकडे तुकडे झाले. बरं झालं, तिनें डोकं बाजूला केलं म्हणून, नाहीं तर सरळ डोक्यांतच बसला असता कॅमेरा. मला त्याचा भारी राग आला. कारण एक तर तो कॅमेरा ट्रोचाचा होता आणि दुसरें म्हणजे चांगला भारीपैकीं कॅमेरा होता तो. पण ट्रोचा मात्र हसतच होती.

“काय भराभर तुकडे झाले ग त्या कॅमेऱ्याचे? कधीं पाहिले होतेस असे?” ट्रोचानें मला हसतच विचारलें.

आंद्रिसशीं वागतांना ट्रोचा सगळ्या गोष्टी सहन करून मोठ्या शांतपणें घेई. ती कधीं रागावत नसे. उलट मला मात्र त्याचा वारंवार राग येई.

रागाच्या भरांत चिडून तो लाथा मारूं लागला, चावला कीं ती नुसते खांदे उडवून हसे आणि म्हणे, “जाऊं दे ग. काय लक्षांत घ्यायचें त्या पोराचें! किती झालें तरी निराश्रित पोरगा तो. मायजमिनींतून उपटून आणलेल्या रोपट्या-सारखा! खरं सांगूं का, तेंच त्याचें दुखणें आहे.”

तो तिला चावला कीं मला काळजी वाटायची. पण ती मात्र हसतच राह्यची. ती म्हणायची, “आई, अग हा नुसता चावत नाहीं, लचकाच तोडतो.”

अंगांत कार्लिसचा संचार झाला कीं टिन्ची असा वागूं लागे. पण जेव्हां हा संचार नसे तेव्हां किती समंजसपणें वागत असे तो. एकदां मुलांची अशीच दंगामस्ती चालली असतां आंद्रिसला चांगलेंच लागलें, पण त्यानें एवढीसुद्धां तक्रार केली नाहीं. “लागलं तर लागलं—त्यांत कांहीं कुणाचा दोष नव्हता. काळजी नको करूं.” उलट मलाच त्यानें समजावलें.

दुसऱ्या एका वेळीं आम्ही असेच समुद्रकिनाऱ्यावर गेलों असतां मुलें पोहायला आंत शिरलीं. त्या गडबडींत डेव्हिडचा धक्का लागून टिन्चीचें घड्याळ

पाण्यांत पडलें. प्रत्येकानें बुडी मारून तें शोधायचा प्रयत्न केला. पण घड्याळ कांहीं मिळालें नाहीं, गेलें तें गेलेंच. पण इतकें झालें तरी डेव्हिडवर टिन्ची रागावला नाहीं कीं त्याला बोललासुद्धां नाहीं. उलट "काय करायचें? धक्का लागला नि पडलें त्याला तो काय करणार?" असेच त्यानें उद्गार काढले.

पण एकदां का कार्लिसचा संचार झाला कीं हा समंजसपणा पार कुठल्या कुठें पळ काढी. त्याच उन्हाळ्यांत एक दिवस रात्रीं, आम्ही आमच्या समुद्रकांठच्या झोपडींत गेलों असतांना त्याच्या अंगांत असाच कार्लिसचा संचार झाला आणि त्यानें जो धिंगाणा मांडला तो कांहीं विचारूं नका.

त्या दिवशीं जेवण झाल्यावर आम्हीं सर्वांनीं, मीं एक लहानसें शिडाचें गलबत घेतलें होतें तें पाहायला नदीवर जावें असें ठरलें. त्या दिवशीं वारा फार गार सुटला होता. म्हणून मीं त्याला म्हटलें, "जा पाहूं पळत वर, नि गरम घालून ये. म्हणजे कुडकुडायचा नाहींस."

पण त्या दिवशीं कुणाचें ऐकायच्या मनःस्थितींत तो नव्हता हें कसं कळायचं? खेंकसत उत्तर आलें,

"नाहीं जा घालीत गरम."

त्या रात्रीं अखेर गलबत पाहायला तर तो आला नाहींच, पण मलाहि जातां आलें नाहीं. तो गरमहि घालीना, नदीवरहि येईना, नुसता घरांत बसून भोकांड पसरून ओरडत मात्र राहिला.

त्याच्या त्या किंचाळण्यानें शेजाऱ्यांना तर त्रास झालाच. पण त्याचाहि घसा पार पिंजून गेला. आम्हांलाहि किती शरमिंद्यासारखें झालें. सरतेशेवटीं एका मित्रानें तर पोलिस जसे गुन्हेगारांना करतात त्याप्रमाणें रबराच्या होज-पाइपनें त्याला तुम्ही चांगला सीधा कां नाहीं करीत? त्यानें कांहीं फारशी दुखापत होत नाहीं, असें थोडेंसें थट्टेनें, थोडेंसें खरोखर मदत करण्याच्या हेतूनें एक उपाय म्हणून सुचविलें.

मीं तो उपाय कधीं करून पाहिला नाहीं ही गोष्ट खरी, पण त्याशिवाय सारे उपाय करून आम्ही थकलों होतों. प्रार्थनासुद्धां आम्हीं करून पाहिली होती.

ट्रोचानें व मीं कसाबसा निजायचा पायजमा त्याला घातला आणि बिछान्यावर ठेवला. पण गाय जशी वांसराकरतां सारखी हंबरडा फोडीत राहते तसा सारखा त्याचा हंबरडा चालू होता. शिवाय तो आपलें डोकें खोलीच्या भिंतीवर इतक्या जोरानें आपटी व रडे कीं तो सारा बंगला नुसता हादरून जाई. एकदां तर त्यानें आपलें डोकें इतक्या जोरानें आपटलें कीं, चांगलें रक्त येऊन बिछान्यावर, उशीवर,

पायजम्यावर, सगळीकडे रक्ताचे डाग पडले. ते डाग पाहतांच स्वारी अधिकच चेकाळली. स्वतःचा पायजमा, पलंगपोस, उशीचा अभ्रा, भराभर टरकावून त्यानें चिंध्या चिंध्या केल्या. सारा ढीग खालीं जमिनीवर फेकून त्यावर यथेच्छ नाचत, 'मी नाहीं निजणार रक्तावर' असें जर्मन वाक्यरचनेनें इंग्रजींत किंचाळत तो नुसता थयथयाट करीत सुटला.

माझ्याहि सहनशीलपणाला कांहीं मर्यादा होती. अखेर मी चटकन् माझ्या मुलींना म्हणालें, "मला कळतें आहे तुम्हांला किती त्रास होतो तो. आतां एक शब्द बोलायची गरज नाहीं. घर नुसतें डोक्यावर घेतो सारा दिवस. तें कांहीं नाहीं, उद्यां या कारट्याला मी पोहोंचता करतें. बस झालें आतां!" पण इन्चाला त्याची कींव आली. "आई, नको ग असं करूं तूं. नको पाठवून देऊं त्याला. आपण नाहीं सांभाळला, तर कोण सांभाळणार आहे त्याला? वेड का लागलंय् कुणाला त्याला ठेवून घ्यायला! आपण आजवर सांभाळला, तसाच पुढें कांहीं दिवस सांभाळूं. बघ, हळूहळू सीधा होईल तो."

"हो आई, खरंच नको पाठवूं. एकवार आणखी संधि दे त्याला. भूत अंगांत आलं नसलें म्हणजे एरवीं तसा तो कांहीं वाईट नाहीं." ट्रोचाचा पण आग्रह पडला. अखेर त्याला मीं पाठवून दिला नाहीं.

एक दिवस लहान मुलांच्या वागणुकीवरचें एक पुस्तक मीं मुद्दाम विकत आणलें नि वाचूं लागलें. वागवायला अत्यंत जड अशा निरनिराळ्या मुलांच्या केसेसचे उतारे त्यांत दिले होते. 'या मुलाच्या अंगांत येऊन तो त्रास देई,' 'त्या मुलाच्या अंगांत येऊन तो असा वागे,' इत्यादि सारे उतारे मीं पाहिले. जास्तींत जास्ती पंचवीस मिनिटांपेक्षां एकहि मूल त्रागा करीत राहिल्याचें त्यांत उदाहरण नव्हतें. ग्रंथकाराला उद्देशून मीं मनांत म्हटलें, "भल्या माणसा, तूं अजून कांहींच पाहिलें नाहींस. उद्यां जर अशा मुलांची एखादी स्पर्धा लावली तर आमचा गडी दुसऱ्या वाटेल तेवढ्या गड्यांना मारून किती तरी पटीनें आघाडी मारील." कारण टिन्ची एकदां का अंगांत संचार होऊन ओरडूं लागला कीं कांहीं मिनिटें नव्हे तर तासचे तास किंचाळत राही.

मला आठवतें आहे, एकदां तर नऊ तास त्यानें असा थयथयाट चालवला होता. आमच्या शेजारच्या एका बाईनें—तिला काय याची कल्पना—दुपारचा भोंगा झाला तशी त्याला विचारलें,

"आंद्रिस, आइस्क्रीम खायला येतोस का?"

"मला नको आइस्क्रीऽऽऽम!" घुश्शांतच स्वारीनें उत्तर दिलें.

आम्हांला कळत होतें कीं त्याच्याशीं अधिक बोलण्यांत अर्थ नाहीं. पण तिला कुठलें कळायला? ती बिचारी मोठ्या सहानुभूतीनें त्याची समजूत काढूं लागली.

"वाः आंद्रिस, तुला तर 'कोन' आवडतो ना? सगळ्या मुलांना आइस्क्रीम आवडतेंच मुळीं. सांग बघूं तुला काय पाहिजे—चाकोलेट कीं स्ट्रॉबेरी?"

खरं म्हणजे त्याला स्ट्रॉबेरी आईस्क्रीम भारी आवडे. पण या वेळीं भूत शिरलें होतें ना अंगांत! बहुधा त्या भुतानेंच किंचाळत उत्तर केलें, 'नाहीं.' कांहीं त्याला विचारलें तरी त्याचें आपलें एकच उत्तर—'नको.' मला वाटतें कदाचित् एकादे वेळीं त्याच्या मनांत 'हो' उत्तर द्यायचेंसुद्धां आलें असेल, पण त्यामुळेंच कीं काय तो दुप्पट जोरानें 'नको' म्हणून ओरडायचा. अखेर पुराच संचार झाला त्याच्या अंगांत.

तसं पाहिलं तर या ठिकाणीं अन्यायहि कांहीं झाला नव्हता किंवा त्याला उगीच कोणीं छेडलेलें पण नव्हतें. पण कां कोणास ठाऊक, त्याचा नकारच येत राहिला. मग न जाणों, आइस्क्रीम खाण्याचें आमंत्रण हें थोडेंसें हुकमतीच्या स्वरूपाचें त्याला वाटलें म्हणून तो चिडला असल्यास नकळे. कांहीं असो, त्याची नकारघंटा किंचाळूं लागली व तशीच ती किती तरी वेळ किंचाळत राहिली एवढें खरें.

दुपारपासून रात्रीं साडेनवापर्यंत तो सारखा किंचाळत होता. इतका कीं अखेर त्याचा घसा फुटला. नंतर स्वारी आमच्या घराच्या खालीं सरपटत जाऊन दडून राहिली. आमची समुद्रकिनाऱ्यावरची झोपडी खालीं कांहीं ठोकळे ठेवून त्यावर बांधली होती. तो त्याच्याखालीं लपलेला आहे असें लक्षांत आल्यावर ट्रोचानें हळूच पोटावर सरपटत सरपटत जाऊन त्याला एकदांचा बाहेर काढला. त्याच्या पुढें खायचें ठेवलें, पण तो बोट लावीना. अखेर तसाच कांहीं स्वच्छ न करतां त्याला आम्हीं बिछान्यावर ठेवला आणि स्वारी गरम ब्लँकेट घालायच्या आंतच झोपून गेली.

"तो असा बेभान होऊन ओरडूं लागला कीं खुशाल त्याच्या तोंडावर पाण्याचा चांगला एक हबका कां नाहीं मारीत?" कितीकांनीं तरी मला उपदेश केला. पण खरें सांगायचें तर तसा उपाय करून पाहायला आम्ही भीतच होतों. नजाणों, त्याच्या त्या मनाच्या अवस्थेंत त्याला एकदम धक्का बसला नि फिट आली तर काय करायचें? केवळ ह्याच विचारानें आम्ही तो उपाय अंमलांत आणीत नव्हतों.

अर्थात् या साऱ्या अवधींत आम्हीं टिन्चीला एका मानसशास्त्रज्ञ बाईला दाखवून आणलें होतें. तिला पण आमची भीति बरोबर वाटली. पण 'मुलांना वळण लावण्यासाठीं सल्ला देणाऱ्या' एका सल्लागार माणसानें मात्र मला सांगितलें कीं, "असा उपाय करून पाहायला बिलकुल हरकत नाहीं. मात्र त्याच्या अंगांत येतें आहे असा संशय आल्याबरोबर तो करायची काळजी घ्यायला हवी."

त्याची परीक्षा पाहायची वेळ लवकरच आली. एका रात्रीं निजायची वेळ झाली होती. टिन्चीचें चावणें, ओरडणें सुरू होऊन आम्हांला कार्लिसचीं पावलें दिसूं लागलीं. सगळ्या गोष्टी त्यानें मोडून तोडून टाकूं नयेत किंवा बाहेर किंचाळ्या ठोकीत राहून शेजाऱ्यांना त्रास देऊं नये, म्हणून ट्रोचानें त्याला चांगलाच पकडून ठेवला होता. पण हळू हळू त्याचा आवाज चढूं लागला.

"आई, आतां करून बघ पाहूं तुझा तो पाण्याचा उपाय!" ट्रोचानें मला सूचना केली. आमची समुद्रावरची झोपडी असल्यानें पाण्यानें खराब होईल असें तेथें कांहीं नव्हतें. ताबडतोब मीं एक ग्लासभर पाणी घेऊन टिन्चीच्या तोंडावर फेकलें. पण पाहिलें तर तो भडकूं लागला. शेवटीं मीं धुवायची बादली घेतली आणि त्यांतलें दोन गॅलन पाणी खुशाल त्याच्या डोक्यावर पालथें केलें. आणखी एक बादली ओतली. मजा ही कीं तो शांत झाला. त्यानंतर तो किती वेळ कांहींतरी त्याच्या भाषेंत पुटपुटत—बहुधा तीन भाषेंत आम्हांला शिव्या देत—बिछान्यावर पडला होता.

"तुम्हांला कुठें माहीत आहे मी काय तुमच्याबद्दल माझ्या गुप्त भाषेंत बोलतोंय् तें!" शांत झाल्यावर तो आम्हांला कांहीं वेळ हिणवीत होता.

अर्थात् दोन बादल्या पाणी ओतल्यानें बिछाना ओला झाला. त्याचे, आमचे कपडे भिजले व अखेर जें काय निस्तरावें लागलें त्यामुळें हा उपाय वारंवार करून पाहण्याजोगा नाहीं एवढें मात्र मीं मनाशीं ठरवलें.

दुसऱ्या दिवशीं स्वारी उठली ती थोडीशी दुर्मुखलेलीच. पण खेळतां खेळतां त्यानें खेळांतल्या बंदुकीचा बरोबर नेम ट्रोचावर धरून "मी तुला ठार करतों" असें इतक्या खऱ्या आविर्भावानें म्हटलें कीं मी किंचित् दचकलेंच.

त्याच्या हातांतील बंदूक खेळांतली होती. त्यानें धोका कांहींच नव्हता. पण बाकीचा त्याचा सारा आविर्भाव इतका खरा होता कीं खरोखरीची बंदूक उद्यां याच्या हातांत मिळाली तर काय?—हा ट्रोचानें विचारलेला प्रश्न, मला पण अस्वस्थ करून सोडूं लागला.

"काय ग, हा सुरी दाखवीत असे त्याचें काय?" इन्वानें विचारलें.

कितीकजण तरी 'मला असा मुलगा घरांत ठेवतांच कां' म्हणून विचारीत तर दुसरे 'या मुलाला काय होतें आहे तें कळायच्या आंत आम्ही तुमच्यापासून दूर कुठें तरी त्याला नेऊन सोडतों' म्हणून मदत करायचें आश्वासन देत.

असो. इतकी चर्चा होत असूनहि आम्हीं त्याला ठेवला होता आणि त्याचें कारण एकच. आम्हांला खरोखरीच त्याचा लळा लागला होता. त्याच्या त्या वरच्या अस्वस्थ स्वरूपाखालीं कुठें तरी खोल, चांगलें, सत्त्वशील बीज त्या मुलामध्यें पडलेलें आहे अशी आमची मनोमन खात्री होती. त्याचा आकस्ताळीपणा, ओरडा या साऱ्या गोष्टी काळांतरानें नाहींशा होणाऱ्या आहेत अशी आम्हांला खात्री वाटे म्हणूनच या सूचनांचा विचारसुद्धां आमच्या मनांत शिवला नाहीं. त्याच्या सध्यांच्या चालू परिस्थितींतून टिकाव धरून आम्ही सहीसलामत बाहेर पडलों तर हळूहळू तो नीट वळणावर येईल, असें कां कुणास ठाऊक, आम्हांला सारखें वाटत असे.

एक दिवस मात्र माझ्यावर पडत असलेला ताण माझ्या मुलाला बघवेना. "आई, कांहीं कर पण या मुलाला पोहोंचवून दे. नाहीं तर या भलत्या ताणाखालीं तूंच खलास व्हायचीस." त्यानें हळूच मला उपदेश केला.

"फार ताण पडतो आहे. भलताच ताण."

"तुझ्या ब्लड-प्रेशरकडे तुला लक्ष दिलं पाहिजे."

"कुणास ठाऊक, एक दिवस बंदुकीनें हा खरोखर ठार करील."

"सुरीनें भोसकील."

"हा चावतो. माणसाचे दांतसुद्धां भारी विषारी असतात."

"डोकें फिरलेला मुलगा तो."

"तुला कांहीं त्याबाबत करतां येणार नाहीं."

"कां उगीच एका क्षुल्लक पोरट्याकरतां नाहक त्रास घेतेस?"

"तुला मूल संभाळायची एवढी हौसच असेल तर एकादें सुधें मूल घे कीं संभाळायला."

"जळ्ळे हे परकी लोक! कां आपण पोसायचं यांना? द्या खुशाल पाठवून जेथून आले तेथें."

त्या साऱ्या अवधींत रात्रंदिवस माझ्या कानांशीं ही गुणगुण चाललेली होती. पण मधून एकादे वेळीं एकाद्या सहानुभूतिपूर्ण नातलगाचा सहनशील शांत आवाज

मला धीर देई. "आई, ठीक होईल सारें. सध्यां बावरलेलें आहे तें पोर. जरा अवधि जाऊं दे. धीरानें घे." हा आवाज ऐकला कीं पहिली गुणगुण चालू असतां ह्या आशेचा नवा हुरूप हळूच आपली किलबिल सुरू करी.

"त्याला जरा अवधि द्यायला हवा."

"ताण ! कमालीचा ताण !"

"ब्लडप्रेशर !"

"त्याला जरा अवधि मिळूं दे. कांहीं काळ जाऊं दे."

"त्याचं डोकं फिरलंय्."

"तो केव्हां भोसकील याचा नेम नाहीं."

"त्याला कांहीं अवधि मिळायला हवा."

"तूं त्याच्या बाबतींत कांहींसुद्धां करूं शकणार नाहींस."

"खरं म्हणजे त्याच्याकरतां कांहीं करावें इतक्या किंमतीचा नाहींच तो."

"त्याला जरा अवधि मिळूं दे. कांहीं काळ जाऊं दे."

एवढें खरें कीं हा अवधि फारच लागणार होता. आम्हीं आणल्यापासून त्यानें थोडी प्रगति केली, पण किती मुंगीच्या पावलानें. त्यामुळें आधींच निराशावादी असलेल्या कांहीं लोकांना बोलायला चांगलीच संधि मिळत होती. "तो ना खास प्रगति करील ! चार पावलें पुढें टाकलीं तर आठ पावलें मागें आलाच म्हणून समजा !" असे उद्गार मी ऐकत असें.

एकंदरींत अवधि देऊनहि होणारी प्रगति फारच निराशाजनक होती. आम्हांला तो सुधारतो आहे असें वाटायला लागतें न लागतें तोंच स्वारीचा एखादे दिवशीं जो स्फोट होई त्यामुळें सारें मुसळ केरांत, अशी स्थिति होऊन जाई.

अखेर खूप विचार करून मला असें वाटूं लागलें कीं या पोराचा आजार इतर कुठें नसून भावनांत आहे आणि त्याला सुधारायचें असेल तर तशा रीतीची विशेष मानसिक काळजी घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

टिन्चीच्या वेलफेअर एजन्सीला मीं त्यासंबंधीं एक पत्र धाडून हें स्पष्ट पण केलें कीं, "एखाद्या आडदांड साध्या मुलाची काळजी मी सहज घेऊं शकेन. पण मानसशास्त्रीय दृष्ट्या विशेष प्रकारची काळजी घेणें मला तितकें जमणार नाहीं. कारण त्या बाबतींत मला कांहींच माहिती नाहीं. त्यामुळें, तो फार दांडगाई करूं लागला कीं आमच्या आवरण्याच्या प्रयत्नांत एकादे वेळीं वेडेंवाकडें होऊन त्या मुलाला दुखापत होण्याची मला भीति वाटते. इ."

तीं माणसें फारच चांगलीं होतीं. उलट डाकेनेंच त्यांचें पत्र आलें कीं, "आम्हांला, त्याला दुखापत होईल अशी भीति न वाटतां उलट तुम्हांलाच तो कांहीं दुखापत करील कीं काय अशी भीति वाटते." असें म्हणून त्यांनीं मानसिक अस्वास्थ्यावर इलाज करणाऱ्या मुलांच्या एका संस्थेंत त्याला दाखल करण्याची व्यवस्था पण केली व मला तसें कळविलेंहि. आंद्रिस जाणार हें निश्चित झालें. त्या कल्पनेनें आम्हांला मात्र अगदीं चैन पडेना. माझ्या डॉक्टर मुलालाच तें पसंत पडेना. तो मला म्हणाला, "आई, अशा संस्था तुला माहीत नाहीं कशा असतात तें. नेहमीं त्यांत रोग्यांची कमाल गर्दी आणि त्या मानानें लक्ष द्यायला माणसें कमी अशी परिस्थिति असते. टिंचीला तेथें ठेवला तर नुसतें सांभाळतील, देखरेख करतील एवढेंच. यापेक्षां आपल्या घरींच राहिला तर काय वाईट? मी तुला निश्चित सांगतों कीं एकदां का तो त्या संस्थेंत गेला कीं तो निकालांत निघाला म्हणूनच समज. तशा संस्थेपेक्षां घरीं कितीतरी पटीनें आपण त्याची काळजी घेऊन उपाययोजना करतों आहोंत. बघ, मला तरी वाटतें कीं, तूं कांहीं त्याला पाठवूं नयेस अशा संस्थेंत. त्यामुळें एक चांगला पोरगा वायां मात्र जाईल."

"पण मग माझा मानसिक ताण?" मीं मिस्किलपणें विचारलें.

"अंः! तूं निभावून घेशील. खरं सांगूं का, टिंची गेला तर करमायचें नाहीं तुला!" त्यानें हसत हसत उत्तर दिलें. एकंदरींत आम्हीं फिरून प्रयत्न करायचें ठरविलें.

या हकीकतीनंतर मीं फारच पद्धतशीर प्रयत्न सुरू केले. टिंचीच्या वागणुकीचा सरळ एक तक्ता तयार करावयाचें ठरविलें. त्यावर चांगल्या, वाईट दोन्ही वागणुकींचे सरळ ग्राफच काढले. त्यावरून कांहीं एक विशिष्ट चढउतार दिसून येतो कीं काय, हें आम्हांला पाहायचें होतें. अशा तक्त्यावरून निदान त्याला भूक लागली किंवा तो थकला कीं त्याचें बिघडतें अशी कांहींएक कल्पना आम्हांला येईल अशी आमची अपेक्षा होती. पण प्रत्यक्ष अनुभव निराळेंच बोलूं लागला. कित्येक वेळां चांगलें पोटभर जेवल्यावर सुद्धां त्याच्या अंगांत येई, तर कधीं रात्रीची चांगली झोप काढून उठल्यावर सकाळच्या प्रहरींच तोंड वाकडें होऊन त्याचा पारा चढूं लागे. पौर्णिमेच्या दिवशीं मानसिक रोगी जास्त बेफाम होतात अशी एक पुरातन समजूत आहे. त्याप्रमाणें चंद्राच्या सगळ्या कलांचा सुद्धां नीट ग्राफ ठेवून आम्हीं पाहिला. पण टिंचीवर कांहीं एक सुद्धां परिणाम न करतां चंद्र केवळ भरतीओहोटीच्या लाटांशीं खेळण्यांत दंग

होऊन राहतो असें आमच्या लक्षांत आलें.

कांहीं वेळेला रोजच त्याच्या अंगांत वारें भरे. तर कधीं एक आठवडा सहज निघून गेला तरी कांहीं होत नसे. एकंदरींत त्या तक्त्यांवरून आम्हांला त्याच्या वागणुकीविषयीं निश्चित असा कांहींच अंदाज बांधतां येईना. मात्र त्या तक्त्यावरून एक गोष्ट निश्चितपणें दिसूं लागली ती ही कीं त्याचे हे रागाचे झटके येण्याचें मान दिवसानुदिवस कमी होत चाललें. कधीं कधीं दोन आठवडेसुद्धां कांहीं वेडावाकडा प्रकार न घडतां जाऊं लागले. एकदां तर दोन आठवडे गेले तरी कांहीं झालें नाहीं. असें मनांत म्हणून आम्ही त्याला शाबासकी देतों आहोंत तों तो काळ तीन आठवडे लांबवून त्यानें आम्हांला चकितच करून सोडलें. एवढें खरें कीं आमच्या त्या तक्त्यावरून त्याचें हें वादळ केव्हां उठेल हें भविष्य कांहीं आम्हांला सांगतां येत नसे. पण हळूहळू असें वादळ उठलें तरी एकदोन गोष्टींमुळें तें बरेंच कह्यांत आणतां येतें एवढी गोष्ट मात्र अनुभवानें आमच्या लक्षांत येऊं लागली.

वास्तविक हा फरक म्हणजे केवढी मोठी प्रगति असें मानायला बिलकूल हरकत नव्हती. पण तो घडवून आणणाऱ्या गोष्टी किती क्षुल्लक होत्या! एक पांढरा ससा आणि एक बाहुला.

"मला एक पांढरा ससा दे ना!" म्हणून तो माझ्या पाठीस लागला होता. त्या सशाकरतां एक सुंदर पिंजरा पण त्यानें तयार केला. तें पाहिल्यावर अखेर आम्हीं त्याला एक ससा आणून दिला. आपल्या धेडगुजरी इंग्रजींत त्यानें त्याचें नांव लाडका 'बर्फाचा चेंडू' (बर्फगोलक) असें ठेवलें. त्याचें कुणाशींहि बनेनासें झालें कीं तासन् तास तो त्या सशाला कुरवाळीत त्याच्या 'गुपित' भाषेंत बोलत बसायचा.

बाहुल्याच्या बाबतींत पण त्याची अशीच स्थिति होती. तो बाहुला म्हणजे चांगला मोठा, यार्ड उंचीचा, एक खेळांतला शिपाई होता. त्याच्या अंगावर निळा व पिंवळा युनिफॉर्म होता. डोक्यावर उंच टोपी, तिला हनुवटीखालीं ओढून धरणारा पट्टा इ. इ. सारा पुरा पोषाख होता त्या शिपाई गड्याचा. शिपाई मिळाला होता आपला असाच. समुद्रकांठीं सुट्टींत राह्यला आल्यावर एकाद्या कार्निव्हलमध्यें कशावर तरी बरोबर नेम मारल्यानें कुणालातरी मिळालेला. एरवीं तो केराच्या टोपलींतच गेला असता. पण टिंचीमुळें वांचला. टेडीबेअरप्रमाणें चांगला गुबगुबीत असल्यानें त्याला अंगाखांद्यावर घेतां येत असे. टिंचीला तर तो

इतका आवडला कीं मुलासारखा तो त्याला सारखा बरोबर नाचवी. टिंची अकरा वर्षांचा असल्यानें तसें म्हटलें तर त्याचें बाहुल्याबरोबर खेळायचें वय नव्हतें. पण त्याला खिन्न वाटूं लागलें कीं तो त्याला घेऊन बसे. पुष्कळ वेळां आपल्याबरोबर त्याला पांघरुणांतसुद्धां घेऊन आपलीं सारीं दुःखें त्याच्या भाषेंत तो त्याला सांगे आणि अशा गोष्टी झाल्या की स्वारी निजतांना रागांतच झोपायला गेली असली तरी देखील खुषींत येऊन त्या बाहुल्याला मिठी मारून झोपून जाई.

मला वाटतें ह्या साऱ्या गोष्टींनीं त्याच्या कोंडलेल्या भावनांना एकप्रकारें वाट मिळे व तो शांत होई. याच कारणानें बाहुल्याशीं खेळण्याबद्दल आम्ही त्याला कधीं चिडवीत नसूं. उलट त्याला लागेल तेव्हां तो शिपाई जवळपास मिळावा अशा रीतीनें तो बाहुला बिछान्यावरच ठेवीत असूं. टिंची चिडून मारायच्या गोष्टी करूं लागला कीं त्याच्या हातांत खेळांतल्या बंदुकीऐवजीं हा शिपाई दिला कीं एकदम त्याचें गाडें ताळ्यावर येई. त्यामुळें तो बाहुला म्हणजे टिंचीचें सांत्वन करायला एक मोठा आधारच मिळाल्यासारखें आम्हांला झालें होतें. कांहीं कांहीं वेळां मात्र टिंचीचें हें आंतलें वादळ असें खळाळून उठे कीं कशानेंहि तें थांबविणें अशक्य होई. अशा अडचणींत असतां उन्हाळ्यांतल्या एका रात्रीं मला त्यावर फारच छान उपाय सांपडला. टिंचीची झोपायची वेळ झाली होती. त्याचे पाय इतके अस्वच्छ होते कीं "टिंची पाय धुवून मग नीज अं. बघ किती पांढऱ्या चादरी आहेत, डाग पडतील त्यावर" असें म्हणून त्याला पाय धुण्याचा ट्रोचानें आग्रह केला मात्र. झालें, तेवढ्यावरून स्वारीचें जें बिनसलें, तें एकदम वादळ सुरू. अखेर 'जा नीज तसाच' म्हणून तिनें हात टेकले. पण आतां तो कुठला ऐकायला? त्याच्या डोक्यांतला झंझावात असा एकदम थोडाच थांबणार! त्यामुळें तो धड निजेना कीं कांहींच करीना. सारखा जोरजोरानें हातपाय झाडून ट्रोचाच्या तोंडावर लाथा मारून तिला चावूं लागला. तें पाहून माझासुद्धां पारा चढला. मीं सरळ जवळची केरसुणी घेतली. आणि "बस्स झाला हा तमाशा. रोज उठून मेला तोच तो प्रकार. कंटाळा आला मला. थांबतोस, कीं ठोकूं चांगला!" असें रागानें ओरडून मीं केरसुणीचे चांगलेच धपाटे दिले त्याला.

बाकी गंमत ही कीं तो लगेच थांबला व निमुटपणें बिछान्यावर जाऊन पडला. इतर कोणत्याहि समजावणीच्या शब्दांपेक्षां हीच भाषा त्याच्या परिचयाची दिसली. पाण्याचे हबके मारून त्याला शांत करण्यापेक्षां केरसुणीचा उपाय अधिक प्रभावी व गुणकारी ठरला. मजाच झाली त्या दिवशीं. ट्रोचा तर माझा तो सारा

अवतार पाहून 'आ' करूनच माझ्याकडे पाहत राहिली. "कमाल आहे आई तुझी. ती केरसुणी आणि तूं, अगदीं चेटकीणच अवतरली होती इथें."

"कांहीं असो, दाखविलें कीं नाहीं चेटुक करून? पाहा कसा निजलाय तो." आणि खरोखरच तो शांत पडून आतां झोपीं जाऊं लागला होता.

शिक्षणतज्ज्ञ असें सांगतात कीं मुलांना आपलेपणा वाटण्याकरतां लाड करतों त्याचप्रमाणें कांहीं कांहीं वेळां चांगला कडक धाक पण दाखवावा लागतो. त्यामुळें त्यांना एक प्रकारचा आपलेपणा वाटून तीं खरीं निर्धास्त होतात. टिंचीच्या बाबत असेंच झालें असावें. केरसुणीच्या त्या धपाट्यानें त्याला आमच्या घराविषयीं खरी आपुलकीची भावना आली असावी. कांहीं असो. त्यानंतर तो एकदमच किती तरी सुधारल्यासारखा वाटला. पण एवढें खरें कीं, तो पुरा सुधारला अशी एवढ्यांतच कल्पना करून घेणें मात्र वाजवी झालें नसतें.

टिंचीच्या रागाच्या–आक्रस्ताळीपणाच्या–इतक्या गोष्टी मीं आतांपर्यंत सांगितल्या आहेत कीं, त्यामुळें आमची सारी उन्हाळ्याची सुटी अशीच झटापटींत गेली अशी कुणाची कल्पना झाल्यास ती मात्र फार चुकीची होईल. त्याचा कितीतरी वेळ मोठ्या मजेंत, प्रेमानें व सुखानें जात असे. त्या सुटींत तो पोहायला शिकला, बोट चालवायला शिकला. त्या रस्त्यावरराहणाऱ्या मुलांशीं तर त्याची फार दोस्ती झाली होती. त्यांच्यांतच तो खूप खेळे. लपंडाव, शिवाशिवी, इत्यादि धावाधावीचे खेळ हीं मुलें संध्याकाळचीं जेवणें झाल्यावर सुद्धां अगदीं अंधार पडेपर्यंत खेळत राहायचीं. त्यामुळें अखेर टिंची घरांत परत येई तो अगदीं थकलेला, झोंपेला आलेला असा. त्याचें मन मात्र किती उल्हसित असे!

एक दिवस तो असाच परत आला नी बिछान्यावर पडला. "पोरगा खेळतो खूप, अन्न केव्हांच जिरून जाऊन भूक लागली असेल" असें म्हणून मीं त्याच्याकरतां ग्लासभर दूध आणि भरपूर जॅम, लोणी लावून एक मोठा सॅन्डविच करून आणला. टिंचीला जॅम म्हणजे जीव कीं प्राण. म्हणून मी जॅमचा चांगला दाट थर दिला होता पावाच्या तुकड्यावर. खातां खातां, सगळे ओठ लडबडून उशीला लागायची पाळी येऊं नये म्हणून मीं तो मधोमध कापला आणि त्याच्यापुढें केला. त्यानें तो अर्धा सॅन्डविच आपल्या तळहातांत घेतला नी कितीतरी वेळ त्याच्याकडे त्या दिवशीं तो टक लावून पाहतच राहिला.

"तूं मला हें कां देतेस" अखेर त्यानें प्रश्न केला. "तूं खेळतोस ना खूप, तेव्हां भूक लागली असेल, निजायच्या पूर्वी कांहीं तरी तोंडांत घालायला तुला

आवडेल म्हणून आणलें मीं सारें." मीं उत्तर केलें.

तरीहि कांहीं वेळ तो पावाकडे बघतच राहून अखेर मला म्हणतो, "गंमतच म्हणायची. तूं मला सकाळची न्याहारी, दुपारचें जेवण दिलेंस, रात्रीं जेवलों तरी तूं आणखी खायला आणलेंसच. बघ, एक ग्लास दूध, जॅम, लोणी लावलेला पाव! कां एवढें सगळें मला देतेस? तुला माहीत आहे, जेव्हां लटाव्हियावर बॉंब पडले आणि आम्हांला जर्मनींत पाठविण्यांत आलें, तेव्हां साऱ्या दिवसभरांत आम्हांला एवढाच तुकडा मिळत असे!" असें म्हणून त्यानें अर्धाच तुकडा उचलला नी मला दाखवला,

"साऱ्या दिवसभरांत एवढाच तुकडा. तोच आमची न्याहारी, जेवण, रात्रीचें जेवण, सारें कांहीं. तेवढ्यावरच राहत असूं आम्ही. त्याला जॅम नाहीं, लोणी नाहीं, कांहीं नाहीं. अगदीं कोरडा, फक्त एवढा तुकडा मिळायचा आम्हांला. काय भूक लागायची म्हणून सांगूं. आम्हांला अगदीं रडूं यायचें."

"किनई आमच्यांत एक लहान अगदीं छोटी बेबी होती." असें म्हणून त्यानें त्या मुलीचा आकार मला हातानें करून दाखविला. "कित्ती लहान नी गोजिरवाणी मुलगी होती ती. तिच्या तोंडांत दांतसुद्धां आले नव्हते, कीं तिला बोलतां येत नसे. पण तिला सुद्धां ग एवढाच तुकडा मिळायचा. आम्ही तो पाण्यांत भिजवून तिला देत असूं. तरी सुद्धां तिला तो खातां येत नसे. बिचारी खायला नाहीं म्हणून सारखी रड रड रडायची. अखेर एक दिवस मेली ती बेबी. मला भारी आवडायची. ती मेली नी किती रडलों मी! अजून मीं डोळे मिटले कीं तिचा तो मेलेला चेहरा माझ्या डोळ्यांपुढें येतो नी भारी वाईट वाटून रडूं येतें."

त्या आठवणीसरशीं तेव्हां सुद्धां त्याच्या डोळ्यांतून खळकन उष्ण अश्रू टपकले. "त्या मुलीला नुसत्या पावावर नाहीं राहतां आलें! आम्हां सगळ्यांनाच इतक्या भुका लागायच्या कीं काय करावें तें कळत नसे. आतां तूं मला किती पाव देतेस! चार दिवस पुरला असता एवढा पाव आणि त्यावर लोणी! जॅम, शिवाय दूध. तरी बरें तीनचारदां खाल्लें आहें मीं पोटभर. किती प्रेमळ आहे अमेरिका आणि तूं पण भारी प्रेमळ आहेस."

तोडक्या मोडक्या इंग्रजींत कां होईना पण इतकें लांबलचक बोलतांना मीं आजवर त्याला कधींच ऐकलें नव्हतें, पण त्या दिवशीं एकापाठोपाठ भराभर शब्द त्याच्या तोंडून नुसते बाहेर पडत होते. अमेरिकेविषयीं चांगले उद्गार

असे पहिल्यानें त्या दिवशींच त्याच्या तोंडून निघाले.

या साऱ्या आठवणींनीं बिचाऱ्याचा आधींचा उल्हास मात्र पार कोठल्या कोठें मावळून गेला. झोप पण पळाली. मेलेल्या मुलांचे चेहरे समोर नाचूं लागतील या भीतीनें त्याचे डोळेच मिटेनात. त्या तारेंतच तो बोलत राहिला. "कधीं कधीं किनई लोक त्या मुलीला असें गाणें म्हणून निजवण्याचा प्रयत्न करीत." असें म्हणून लटाव्हियन भाषेंत तो एक अंगाई गीत म्हणूं लागला.

"तुला येतें का ग हें गाणें?"

"नाहीं. तें नाहीं येत, पण दुसरीं येतात. तूं जरा बिछान्यावर पडलास तर मी म्हणेन तुला अंगाई गाणें. मग पाहा कसा झोपशील तो." असें मीं म्हटल्याबरोबर आंथरुणांत घुसून त्यानें आपलें डोकें लगेच उशीवर ठेवलें व हात लांब करून माझा हात हातांत घेण्यासाटीं तो चाचपडूं लागला.

हात हातांत घेतल्यावर "आतां म्हण" असें सांगून त्यानें आपले डोळे मिटून घेतले. मीं अंगाई गीत सुरू केलें. एकीकडे त्याला हळूहळू थोपटूं लागलें. थोड्याच वेळांत टिंची निद्रेच्या आधीन झाला.

तसें पाहिलें तर टिंचीला आतां अकरावें सरून बारावें वर्ष चालू झालें होतें. तरीसुद्धां त्याला कित्येकदां 'अंगाई'ची लटक येई. वरील प्रसंगानंतर कितीतरी वेळां निजायची वेळ झाली कीं हळूच म्हणे, "तूं गाणें म्हणणार असशील ना आतां?" मला त्याचें मन कळे. मीं हो म्हणून त्याला थोपटलें कीं लगेच तो झोपीं जाई.

एका रात्रीं फिरून त्याच्या अंगांत येणार अशीं सारीं चिन्हें दिसूं लागलीं. तावडतोब केरसुणीचा प्रसाद देऊन मीं त्याला लगेच वठणीवरहि आणलें.

पलंग करकरूं लागला. बराच वेळ हुंदके देत देतच स्वारी अंथरुणावर पडली. पलंगाचा आवाज ऐकल्यावर मी तशीच त्याच्या खोलींत गेलें आणि नीट चोहों-बाजूंनीं मच्छरदाणी लावून त्याला नीट पांघरुणांत निजवलें. तो जागा असून केवळ त्यानें तोंडावरून पांघरूण घेतलें आहे हें मला कळत होतें. अखेर मीं त्याला म्हटलें, "टिंची, तुला मी मारतें पण तें कांहीं वेड्यासारखें विनाकारण मारीत नाहीं एवढें तरी कळतें ना."

"हो" हळूंच पांघरुणाखालून उत्तर आलें.

"बेटा, तुला मारायचें म्हणून नाहीं मी मारीत कधीं. तसा तूं मला किती आवडतोस."

"हो."

"खरं सांगू का, तुझ्या अंगांत जें कधीं कधीं भूत शिरतें त्याला मारतें मी. एरवीं किती गोड मुलगा आहेस तूं! पण एकादी कीड शिरली म्हणजे सारें सफरचंद खराब होतें, तसें होतें तुझें, अंगांत आलें कीं. म्हणूनच मी मारतें आणि अगदीं बाहेर घालवून देतें त्या भुताला!"

"कळतं ग मला, कांहीं हरकत नाहीं तूं मारलंस तरी."

आमचें इतकें बोलणें झाल्यावर माझ्यानें राहवेना. मी त्याच्या बिछान्यावर बसलें. हळूच तोंडावरचें पांघरूण काढलें. किती छान, सुरेख केस होते त्याचे. त्याच्या तोंडावरून हात फिरवून मी त्याचे केस मागें सारलें, त्याचा चटकन् एक मुका घेतला आणि त्याला 'गुडनाइट' केलें. त्यानें हळूच पांघरुणांतून आपला छोटा हात बाहेर काढून माझा हात हातांत घेतला. मी तसेंच थोपटीत त्याच्याजवळ बसून राहिलें. थोड्याच वेळानें तो झोपीं गेला: माझीं बोटें तशींच त्याच्या छोट्या हातांत धरलेलीं व अश्रु ओघळल्यानें ओलावलेल्या पापण्या मिटून, पण सुखानें!

आपल्याला ही बाई कां मारते, हें त्याला सुद्धां आतां पटलें होतें. म्हणूनच अशा वेळीं मीं मारलें तरी त्याला तो तयार होता.

टिंची एवढ्या तेवढ्या गोष्टीला सहज घाबरायचा. विशेषतः रात्रीच्या वेळीं तर फारच त्याला भीति वाटे.

रात्रींच्या वेळीं आकाशांत गडगडून विजा चमकूं लागल्या कीं त्याची अगदीं गाळण उडे. 'बॉंबर्स' 'बॉंबर्स' ओरडत तो धावत धावतच माझ्या खोलींत येई. 'बेटा, हीं बॉंबफेकी विमानें नव्हत. हें आभाळ गडगडतें आहे' असें मीं त्याला किती सांगितलें तरी त्याची ती भीति जात नसे. 'तूं देवाला सांग ना असली गडबड थांबवायला' म्हणून तो मला आग्रह करी.

अखेर 'देव कांहीं एकट्यादुकट्याकरतां अशी हवा बदलूं शकत नाहीं' हें मीं त्याला नीट समजावून सांगितलें. शिवाय अशा गडगडाटाचा किती उपयोग असतो, त्यानें हवा कशी चांगली होते, पाऊस कसा पडतो, त्यानें शेतांत धान्य पिकायला कशी मदत होते इ. साऱ्या गोष्टी मीं त्याला समजावून सांगितल्या नी शेवटीं अशा वेळीं बाहेर गडगडतांना बघायची सुद्धां किती मजा असते. हें मी त्याच्या मनावर ठसवूं लागलें. हळूहळू गोंजारून गोंजारून मी त्याला खिडकीच्या बाहेर बघून आकाश गडगडूं लागलें म्हणजे किती सुंदर दिसतें तें पाहायला तयार

केलें. "हें बघ, तूं पांच अंक मोजायला सुरवात कर पाहूं आणि मग पाहा तूं पांच अंक मोजायच्या आधींच गडगडणें आणि विजा किती तरी मैल दूर पळतील!" त्याला असें मोजून पाहून गडगडणें दूर पळवायच्या खेळाची मोठी मौज वाटली. त्यानें धिटाईनें विजांकडे पाहून मोजायला सुरवात केली. तों काय? गडगडणें किती तरी दूर गेलें.

कांहीं दिवसांनीं त्याची ही भीति खूपच कमी झाली. रात्रीं कधीं गडगडलें कीं मी त्याच्या खोलींत जाऊन खिडकी बंद करायची. अशा वेळीं अर्धवट झोपेंतच पण मोठ्या धीटपणें मला सांगायचा, "मी कांहीं भीत नाहीं. पण तुझ्या आणि माझ्या खोलींतला दरवाजा मात्र उघडा ठेव म्हणजे मला जरा हवा मिळेल."

अशा रीतीनें टिंचीची गडगडण्याची भीति जरी गेली असली तरी बॉंबिंगची दहशत मात्र अजून तशीच तग धरून होती. याचा अनुभव मला मोठ्या विचित्रपणें आला. एक दिवस मला कांहीं कामानिमित्त न्यूयॉर्कला जायचें होतें. घरांत कुणी नव्हतें. शिवाय फार वेळ त्याला एकट्याला सोडून जातां येईल इतकी सुधारणा पण त्याच्यांत झाली नव्हती, म्हणूनच त्याला घेऊन मीं न्यूयॉर्कला जायचें ठरविलें. माझें सारें काम होईपर्यंत बिचाऱ्याला तसाच वेळ काढावा लागला. तेव्हां मनांत मीं म्हटलें, 'चला आलोंच आहोंत तसें आणखी पुढें जाऊन, याला खगोलगृह (प्लॅनेटरिअम) तरी दाखवूं, मजा वाटेल,' असें म्हणून आम्ही तिकडे गेलों. खगोलगृहाच्या विस्तीर्ण प्रांगणांत कितीतरी झाडेंझुडपें आहेत. आम्ही तिकडे जायच्या रस्त्याला लागलों. इतक्यांत मला वाटतें, 'ला गार्डिया' विमानतळावरून एक विमान उडून आमच्या डोक्यावर घरघर करूं लागलें. त्याचा तो आवाज ऐकल्याबरोबर टिंचीचे भान सुटून तो एकदम "बॉंबर, बॉंबर, खालीं पड," म्हणून ओरडूं लागला व चटकन् रस्त्याच्याच बाजूला असलेल्या एका झुडुपांत शिरून तो सरळ पोटावर पडून राहिला.

"अमेरिकेंत बॉंबर्स नाहींत म्हणून आम्ही इकडे आलों आणि इथें पण आतां बॉंबर आले. बापरे! इकडे, तिकडे, जगांत सगळीकडेच बॉंबर आले तर आतां जायचें तरी कुठें?" असें म्हणून तो ओरडूं लागला.

मी खालीं वाकून त्याला समजावण्याचा कित्ती प्रयत्न केला पण उलट मलाच तो 'खालीं पड, पाहतेस काय? बॉंबर आले आहेत.' असें हुकमी स्वरांत सांगूं लागला. मी त्याचें ऐकत नाहीं असें पाहिल्याबरोबर बिलकूल वेळ न घालवतां चटकन् त्यानें माझे पाय धरले आणि असा हिसका दिला कीं मी सरळ आडवीच

झालें. त्यानें लगेच मला तशीच ढकलत ढकलत एका झुडपाखालीं आणली व बजावलें कीं, "बॉंबर आलें आहे, तेव्हां अशीच पालथी पडून राहा. मात्र तुझें डोकें वर उचलून, तोंड खूप जोरानें पसरून उघडें ठेव." त्या दिवशीं आमची ही झटापट पाहून सेंट्रल पार्कच्या बाजूनें जाणारे लोक चकित होऊन कांहीं काळ थबकून पाहतच राहिले.

पण टिंचीला वाटलेली भीति इतकी खरी होती कीं, त्यापुढें इलाजच नव्हता. युद्धांतील अनुभवानें मुळापासून हादरून निघालेलें मन ताबडतोब ताळ्यावर कसें येणार? किती तरी काळ तें थरथरत राहून मनुष्याला अगदीं अस्वस्थ करून सोडतें. वास्तविक या साऱ्या यातनांतून जात असतांना मनुष्य वेडेंच व्हायचें. पण टिंची मात्र या साऱ्या दिव्यांतून केवळ त्याच्या धर्मावरील श्रद्धेनें नीट बाहेर पडला.

टिंचीचें आतांपर्यंतचें आयुष्य म्हणजे एक उंदरा-मांजराचा खेळच होता. बिचारा हा लहानसा उंदीर, आपल्या श्रद्धेचें एक लहानसें बीळ करून साऱ्या संकटांत त्याचा आसरा घेऊन धुगधुगत असे.

टिंची आमच्याकडे आला त्या दिवशीं आपलें सामान सोडतांना त्यानें पहिल्यानें कांहीं बाहेर काढलें असेल तर जपून ठेवलेली एक लहानशी ओबड-धोबड रशियन तऱ्हेची देवाची प्रतिमा. मॅडोना आणि बाल-जीझस यांची एका लाकडांत कोरलेली प्रतिमा होती ती. टिंचीनें ती बाहेर काढली आणि दुसरें तिसरें कांहीं करण्यापूर्वी, आधीं ती प्रतिमा त्यानें आपल्या बिछान्याच्या डोक्याच्या बाजूला उशीवरून अगदीं सहज दिसेल अशा रीतीनें खिळा ठोकून टांगली. आम्हीं अद्यापहि ती तशीच तिथें अजून राहूं दिली आहे. टिंची या मूर्ती पुढें उभा राहून रोज रात्रीं आपल्या भाषेंत प्रार्थना म्हणे. त्याच्या एकंदर हकीकतीवरून तो लुथेरिअन अनाथाश्रमांत वाढला असावा, असें स्पष्ट दिसून येत होतें. पण निरनिराळ्या छावण्यांच्या अनुभवांतून जातां, जातां जुन्या पंथाचा—विशेषतः पौर्वात्य पद्धतीच्या चर्चमधील आचारतंत्राचा—बराचसा पगडा त्याच्यावर बसल्याचें दिसून येई.

कित्येक वेळां त्याला बायबलमधील गोष्टी सांगाव्या व थोडेंसें धार्मिक शिक्षण द्यावें, असें माझ्या मनांत येई. पण भाषेची मोठीच अडचण आमच्यापुढें असल्यानें, अशा तात्त्विक गोष्टी मी त्याला नीट समजावून सांगूं शकेन असा मला भरंवसा येईना. पण खरें सांगायचें तर त्याला मीं दिलें असतें, त्यापेक्षां किती

तरी पटीनें चांगलें धर्मशिक्षण मिळालेलें होतें.

रात्रीं निजतांना आंथरुणांत बसून माझ्या बायबलमधलीं चित्रें पाहायला त्याला फार आवडे. एक दिवस मीं त्याला म्हटलें, "तुला सांगूं का या साऱ्या गोष्टी ?"

उत्तरादाखल त्यानेंच उलट आपल्या बिछान्यावर मला बसायला सांगितलें व म्हणाला, "मला येतात या साऱ्या गोष्टी. बघ मीच सांगतों तुला."

असें म्हणून स्वारी हळूहळू बायबलचीं पानें उलटूं लागली. एकेक चित्र आल्याबरोबर त्यानें लक्षपूर्वक त्या चित्राकडे पाहिलें व जुन्या करारांतील ती एक मोठी गोष्ट मला चांगल्या रीतीनें सांगितली. हळूहळू तो नव्या करारावर आला. "हं आतां जीझसची कथा येईल अं, मला भारी आवडते ती कथा" असें म्हणून त्यानें जीझसची सारी कथा सांगितली.

क्रुसावर चढवण्याच्या प्रसंगाआधीं मला हळूच म्हणतो, "आतां बघ भारी वाईट प्रसंग येणार आहे. पण घाबरूं नकोस. त्यांतून उठून तो फिरून दिसतो." असें म्हणून त्यानें जीझसला क्रुसावर दिल्याची सारी कथा मला सांगितली.

युद्धाच्या छावणींतून आलेल्या मुलाला इतकी सुसंगतवार धार्मिक कथांची माहिती असेल, अशी मला तरी कल्पना नव्हती. पण युद्धछावण्यांतून इकडून तिकडे बदलत असतां कांहीं लटाव्हियन शिक्षकांनीं 'मुलांची छावणी' म्हणून सगळ्यांना कसंबसं निदान एकत्र ठेवण्यांत यश मिळवलें होतें. त्याचाच हा परिणाम असावा.

हीं मुलें महिनेच्या महिने कुठेंतरी डांबून ठेवण्यांत येत. त्यामुळें तीं अगदीं कंटाळून जात. आपली अमेरिकेंत जायची व्यवस्था कधीं होणार तें त्यांना कळत नसल्यानें, एकदां ती व्यवस्था होवो व इथून सुटका होवो अशी त्यांची सारखी प्रार्थना चाललेली असे. टिंची अमेरिकेंत आला त्यावेळीं त्याची अशीच एक प्रार्थना फलद्रूप झाली असावी.

"आम्ही किनई कित्ती दिवस वाट पाहिली. पण कांहींच होईना. छावणींत डांबून राहिल्यानें तर आम्हांला भारी कंटाळा आला. सारीं मुलें कंटाळून अगदीं वेड्यासारखीं झालीं. अखेर तर रडूंच येऊं लागलें आम्हांला. एक दिवस मीं देवाला प्रार्थना केली. मीं म्हटलें, देवा, मला एवढ्या मोठ्यानें रडतां येऊं दे कीं कुणीतरी माझ्याकडे पाहील व म्हणेल 'ह्या पाठवून याला'. तेथून सुटायचा तो एकच मार्ग होता. म्हणूनच मीं देवाची प्रार्थना करून एवढ्या मोठ्यानें

किंचाळायला सुरवात केली कीं, त्या आवाजानें अखेर एकाचें लक्ष माझ्याकडे गेलें व त्यानें मला बसमध्यें बसविलें. हें सगळं प्रार्थनेमुळं झालं बरं. मी रडलों ना खूप तेव्हां जीझसला माझी दया आली. आणि इथें आलों."

आंद्रिसनें यापूर्वी अमेरिकेला यायचा एक मोठाच प्रयत्न केला होता. जर्मनींत असतांना सारीं मुलें किती काळ तरी छावणींतच डांबून होतीं. रोज अमेरिकेला जायला मिळणार अशा बातम्या उठत होत्या. पण जायची नक्की वेळ मात्र कधींच येत नव्हती. अखेरीला आंद्रिस व त्याच्याबरोबरच्या कांहीं मुलांनीं समुद्र किंवा विमान यापेक्षां एक जवळचा मार्ग शोधला. त्यांनीं सरळ जमीन खणून पृथ्वीच्या पोटांतील मार्गानेंच खालीं न्यूयॉर्कमध्यें उतरायचें ठरविलें. इतका कंटाळा आला होता त्यांना वाट पाहायचा. भूपृष्ठावर जर्मनीच्या बरोबर खालीं न्यूयार्क येतें, ही कल्पना त्याच्या डोक्यांत इतकी ठसली होती कीं, अमेरिकेंत आल्यावर आपण तसेच खालीं जर्मनींत तर जाणार नाहीं ना, ही भीति त्याला अस्वस्थ करून सोडूं लागली.

तो रस्त्यानें चालतांना कधीं बाजूच्या रस्त्यानें चालत नसे. कारण, खालीं जर्मन लोक राहतात अशी त्याची पक्की भावना होती. या भीतीनेंच रस्त्यानें चालतांना तो कितीतरी दिवस अत्यंत जपून चाले. शक्य तोंवर गवतावरून, तेंसुद्धां अत्यंत जपून, तो जात असे. बाजूच्या रस्त्यावरून जायची पाळी आलीच तर तो हळूहळू, भीत भीत, चवड्यावर चालूं लागे.

अर्थात् लवकरच त्याची ही भीति गेली व मनाला वाटेल तसा तो भटकूं लागला. अशा रीतीनें मनमुराद भटकून गांव शोधून काढणें ही त्याच्या आयुष्यांतली अगदीं पहिलीच वेळ होती. त्यांत त्याला खूप मजा वाटूं लागली. गांवांत जाऊन तेथलीं दुकानें पाहणें त्याला फारच आवडे.

शाळेला जायचें तरी घराबाहेर पडायचें, चर्चला जायचें तरी तेंच. कधीं कधीं तर जेवायला सुद्धां बाहेर जायचें ह्या गोष्टीची त्याला मोठी मौज वाटे.

"लटाव्हियांत आम्हांला कधींच बाहेर जावें लागत नसे. एका खोलींत आम्ही जेवत असूं, एका खोलींत निजत असूं. शाळासुद्धां तिथेंच एका खोलींत होती. चर्चसुद्धां तिथेंच. खेळायचें झालें, तरी आंतल्याआंत, एका खोलींत, यामुळें या गोष्टींकरतां आम्हांला कधीं बाहेर जावें लागत नसे. पण अमेरिकेंत पाहावें तर एवढ्यातेवढ्याकरतां सारखें बाहेर जावें लागतें! गंमत सगळी.'

अशा रीतीनें केरसुणी व धार्मिक शिक्षण या दोन्ही उपायांनीं मिळून टिंचीच्या

अंगांतले संचार पुष्कळच कमी झाले. त्यामुळें उन्हाळ्यांतले समुद्रकिनाऱ्यावरचे त्याचे दिवस फारच मजेंत गेले. पण शेवटीं, 'लेबर डे' च्या जरा आधीं, त्याच्या अंगांत जो एकदम संचार झाला तो अगदीं भयंकर आग्या वेताळाचा होता असें म्हटलें तरी चालेल.

त्या दिवसानंतर त्याच्या अंगांत कधींच आलें नाहीं हें खरें, पण तें आम्हांला आधीं थोडेंच कळणार होतें!

त्या दिवशीं, आतां लवकरच जायचें, म्हणून सारीं समुद्रावर पोहायला गेलीं होतीं. मी मात्र काम असल्यानें घरींच राहिलें. एकाएकीं टेलिफोन वाजूं लागून ट्रोचाचा आवाज ऐकूं येऊं लागला.

"आई ग, मी समुद्रकिनाऱ्यावरील एका हॉटेलांतून बोलतें आहें. टिंचीच्या आज कमालीचें भयंकर अंगांत आलें आहे. मीं त्याला आतांच जिमी जॉन-बरोबर मोटरसायकलच्या साइडकारमध्यें घालून पाठवला आहे. पण धडपणें ते सरळ तिथें पोहोंचतील कीं नाहीं, याची सुद्धां शंका वाटते. इथून त्याला पाठवला तेव्हां आग लागल्यासारखा टिंची सारखा रस्ताभर कोकलत होता आणि मोटरींतून जें हातीं लागेल तें बाहेर फेकीत होता. अखेर तर त्यानें साइडकारची सीट सुद्धां काढून बाहेर फेकलेली मीं पाहिली. तेथें पोहोंचेपर्यंत आणखी काय काय निघतें, कोणास ठाऊक! चाकें नीट सुरक्षित राहिलीं म्हणजे पुरे. माझ्या अंगावर नुसता पोहायचाच पोषाक असल्यानें सारे हातपाय उघडेच होते. खांद्यापासून मनगटापर्यंत टिंची माझ्या साऱ्या हाताला असा वाघासारखा चावला आहे म्हणून सांगूं, कीं तो हात सुजून सारखा दुखतोय. जिमी आणि डेव्हनें त्याला ओढून काढला म्हणून बरें, नाहीं तर आज कांहीं माझी धडगत नव्हती. कुणास ठाऊक उद्यां काय होतें तें. नाहीं तर साऱ्या अंगांत विष भिनून मी कुत्र्यासारखी हातापायावर चालूं लागून भुंकायला सुरवात केली नाहीं म्हणजे पुरे. कळलं, अशी मजा झालीय सारी. बाकी श्रीयुत टिंच आसपास असल्यावर असें कांहीं झालें नाहीं तरच नवल!"

"पण एवढें अंगांत यायला त्याला कारण तरी काय झालें?"

"त्याला किनई रबराची ती रॅफ्ट घेऊन पाण्यांत जायचें होतें. पण आज समुद्र इतका खवळलेला आहे कीं त्याला पाठविणें योग्य नसतें झालें. शिवाय त्याला अजून पोहतां तरी कुठें चांगलं येतंय? तेव्हां मीं त्याला नको म्हटलें. 'लाटा फार खवळल्या आहेत, आंत जाण्यांत धोका आहे' असें मीं त्याला समजावूनहि

सांगितलें पण तो कांहीं केल्या ऐकेचना. 'तूं कोण मला नाहीं म्हणणार' असें म्हणून त्यानें रॅफ्ट घेतली आणि पाण्यांत पळायला लागला, तशीं मीं धावत जाऊन त्याला धरला. झालें, एवढेंच निमित्त. त्यानें माझा हात चावायला जी सुरवात केली ती विचारूं नकोस."

"जाऊं द्यायचें होतेंस खुश्शाल त्याला. एकदां बुडी खाल्ली असती कीं मग कळलें असतें सारें."

"पण आई, आत्तां समुद्र इतका खवळला आहे कीं, तो आंत गेला असता तर त्याला नीट बाहेर काढतां आलें असतें कीं नसतें, हें मला सांगतां येत नाहीं. तुला माहीत आहे ना, त्या खडकावर वादळीं लाटा आपटूं लागल्या कीं किती धोक्याची ती बाजू होते ती. म्हणून तर टिंचीला मला नको म्हणून सांगावें लागलें. पण असें कांहीं सांगितलें कीं तो कसा चिडतो तें तुला माहीत आहे ना, तसंच झालं."

इतक्यांत मला मोटर सायकलचा आवाज ऐकूं आला.

"एकूण चाकें धड राहून दोघे पोहोंचले तर. बरं, मी तुला मग भेटतें" असें म्हणून फोन बंद केला.

समोरच्या अंगणांतच मला मुलें भेटलीं. लगेच मी टिंचीला म्हणालें, "काय रे बाबा, तुझें काय म्हणणें आहे? ट्रोचानें तर आपली बाजू मला फोनवर सांगितली."

"ती किनई मला पाण्यांत जाऊंच देईना" घरांत जातां जातां टिंचीनें मला सांगितलें.

"मग बरोबर नव्हतें का तें? अरे, समुद्र खवळलेला आहे ना? आंत गेलास नी बुडालास तर? आम्हांला कसं बरं आवडेल तें? सांग पाहूं?"

"हो, समुद्र खवळला असला तरी मला कांहीं तो भारी नव्हता." जरा फुशारकीनें टिंची बोलूं लागला.

"अरे पण ट्रोचा किती पट्टीची पोहोणारी आहे, तिला समुद्र खवळलेला वाटला म्हणजे किती खवळला असला पाहिजे?"

"हो, ट्रोचापेक्षां मी कितीतरी बलवान् आहें!" बेगुमानपणें टिंचीनें बोलायला सुरवात केली.

"मग काय तूं ॲटलँटिक सागरापेक्षां बलवान् आहेस का?"

"हो. हो. मी महासागरापेक्षां सुद्धां बलवान् आहें."

"बापरे! मग तूं माझ्यापेक्षांहि बलवान् असशील."

"हो आहेच मुळीं मी तुझ्यापेक्षां बलवान्" त्याची बेगुमानीची भाषा चालूच राहिली.

मी लहान असतां माझ्या वडील भावानें मला जुजुत्सूचे थोडे हात शिकवले होते. आयुष्यांत कांहीं कांहीं वेळां ते धडे माझ्या चांगलेच कामीं आले. त्यांतलाच तो एक दिवस होता. टिंचीनें बेगुमानपणें मला हेटाळणीच्या स्वरांत उत्तर दिलें मात्र, मीं त्याला जुजुत्सूचा असा ठोसा दिला कीं, तो सरळ खालीं खांद्यावर पडून भिंतीवर जाऊन आदळला व परत आला.

या सगळया क्रिया इतक्या झटकन् घडल्या कीं, टिंची दिपून गेल्यासारखी डोळ्यांची उघडझाप करीत किंचित्काल माझ्याकडे पाहतच राहिला. मग हळूच मला विचारतो, "काय ग, कसं करतेस तूं हें?"

"तें तर माझें गुपित आहे. मग काय अजून तूं माझ्यापेक्षां बलिष्ठ आहेस असें वाटतें आहे का?"

टिंची उठला व सावकाश त्यानें कबूल केलें कीं, "कबूल, मी तुझ्यापेक्षां कांहीं बलिष्ठ नाहीं, पण समुद्रापेक्षां मात्र खास आहें."

"चला तें पण एकदां बघून टाकूं या" मीं उत्तर केलें. "चल आत्तांच्या आत्तां आपण समुद्रावर परत जाऊं आणि तुझी परीक्षाच पाहूं कीं. परीक्षेंत तूं समुद्रापेक्षां बलवान् ठरलास तर ट्रोचा आपली चूक कबूल करील. पण जर का तूं हरलास, तर मात्र आपली चूक झाली असें ट्रोचापाशीं तुला कबूल करावें लागेल व तिला चावल्याबद्दल तिची माफी मागावी लागेल."

"अंहं, मी नाहीं तिची माफी मागणार!" त्याची भुणभुण चालूच होती, पण 'तें मागाहून पाहूं', असें म्हणून मीं त्याला गाडींत बसायला सांगितलें व सक्त ताकीद केली कीं "गाडींतून जर कांहीं बाहेर फेकलेंस तर सरळ तुलाच उचलून मी बाहेर फेकीन." अशा रीतीनें निमूटपणें टिंचीची स्वारी फिरून किनाऱ्यावर आली. आम्हीं लाटांकडे पाहिलें. समुद्र भारी खवळलेला दिसत होता.

"मी नाहीं जा जाणार—समुद्र खवळला आहे आतां."

"पण तुला जायचें होतें ना. मग जा कीं आतां."

"मी नाहीं जात."

"आतां नाहीं म्हणून कसें चालेल?" असें म्हणून मी सरळ त्याची मानगुट पकडून त्याला हातावर धरला. पायांतले जोडे काढून फेकले व सरळ कपड्यांनिशीं पाण्यांत घुसलें. वादळी लाटा नुसत्या धाडधाड धडका मारीत होत्या. तो घाबरून

ओरडूं लागला. मला वाटतें बहकलेल्या मनःस्थितींत त्याला पाण्याचा हबका मारून ताळ्यावर आणण्याचा जो उपाय आम्हांला सुचविण्यांत आला होता त्याचा फार मोठ्या प्रमाणावर त्या दिवशीं प्रयोग झाला. लाटा क्षुब्ध होऊन गर्जना करीत नुसत्या उसळत होत्या. म्हणून मी फार दूर न जातां तेवढ्यांतच घुसळल्यासारखी फेरी घातली. बंडखोर टिंची आतां धापा टाकूं लागला. त्याला तसाच ओढीत मीं घुमवला. कांहीं कमीजास्त झालें तर जवळ असावें या धास्तीनें डेव्हिड आमच्या बरोबर पोहत होता. पण ट्रोचा मात्र कांठावर बसून सारी मजा पाहत हसत होती. अखेरीला त्या खळाळणाऱ्या, क्षुब्ध लाटांच्या फेसाळलेल्या पाण्यामधून ओढून कांढून खडकाच्या पाठीमागल्या बाजूला पाणी बरेंच शांत होतें तेथें त्याला मीं आणलें व मग म्हटलें, "जा तुला पोहायचं आहे ना? पोह जा. तूं बळकट आहेस ना? मग जा कीं आतां? जा. मी आतां जातें किनाऱ्यावर, नी बसतें तुला पाहत."

एवढें मीं म्हटलें मात्र, लगेच 'तूं जाऊं नकोस' म्हणून तो किंचाळू लागला. 'ए! काढ ना मला' असें म्हणून तो भराभर पाणी कापीत येऊं लागला. इकडे 'मला काढ' म्हणून ओरडणें चालूच होतें.

"मी नाहीं तुला काढीत."

"तूं समुद्रापेक्षां बलवान् आहेस ना, मग ये तर बाहेर स्वतः. मला पाह्यचें आहे तूं कसा पोहतोस तें."

कसाबसा पाण्यावर डोकें व तोंड धरून तो तरंगत राहिला. डेव्हिड व मी जवळच पोहत त्याच्यावर पूर्ण लक्ष ठेवून होतों.

"आतां मरतों, मी मरतों," टिंची फिरून किंचाळूं लागला.

"हो नाहीं पोहतां आलें तर खास मरशीलच. ट्रोचा तरी दुसरें काय सांगत होती? तूं बुडूं नयेस म्हणूनच तर तिनें तुला नको म्हटलें. पण तूं कुठला ऐकायला!"

"पण त्यावेळीं मला कळलें नव्हतें. आतां कळतंय कीं मी बुडेन म्हणून."

"कांहीं बुडणार नाहींस. जा पोह तसाच. कदाचित् तूं खालीं जाणारहि नाहींस!"

"छे ग, मी समुद्रापेक्षां बलवान् नाहीं. मला काढ. काढ ना! इतकी भीति वाटते आहे! ए लवकर लवकर काढ, अगदीं लवकर!"

मीं त्याची हनुवटी लाटांवर उचलून धरली व विचारलें,

"मी तुला काढतें पण मग ट्रोचाजवळ आपली चूक कबूल करायला पाहिजे तुला. तिचें बरोबर होतें व तूं चुकलास असें तिला सांगत असलास तर काढतें."

"हो, सांगेन मी."

"तिच्याशीं असा वेड्यासारखा वागलास, तिला चावलास याबद्दल माफी मागशील का?"

"हो."

"हें पाहा, नको म्हणतांना तिला फक्त तुला पाण्यापासून वाचवायचें होतें, हें आपल्याला आतां समजलें असें तिच्यापाशीं कबूल करशील का?"

"करीन."

"ठीक तर मग, ये बाहेर."

असें म्हणून एक हात खालीं घालून मीं त्याला बाहेर आणला. कांहीं मदत लागली तर असावें, म्हणून बिचारा डेव्हिड आमच्याबरोबर पोहत होता.

माझें वय झाल्यामुळें अकरा वर्षांचा अवखळ मुलगा मला सांभाळतां येणार नाहीं असें मला सांगणाऱ्या वेलफेअर ऑफिसरांनीं त्या दिवशीं मला पाहिलें असतें तर त्याला कळलें असतें, मी काय करूं शकतें ती.

आम्ही किनाऱ्यावर आलों. ट्रोचा धांवतच आमच्याकडे आली. ताबडतोब टिंचीनें तिच्याजवळ जाऊन तिला म्हटलें, "तूं बरोबर सांगत होतीस. मी तुझें ऐकलें नाहीं, चुकलों. समुद्राच्या लाटा खवळल्या असल्याकारणानें खरोखरीच मला भारी होत्या. मला पोहतां आलें नाहीं. मी कांहीं समुद्रापेक्षां बलवान् नाहीं. मी तुझ्याशीं वाईट वागलों याबद्दल मला वाईट वाटतें." हें सारें भाषण अर्थात् त्याच्या इंग्रजींत झालें हें सांगणें नकोच. त्यानंतर त्यानें तिचा चावे घेतलेला हात हातांत घेऊन त्याचा मुका घेतला व झाल्या चुकीची नीट दुरुस्ती केली. आपली चुकी कबूल करून त्याबद्दल माफी मागण्याची ही त्याची पहिलीच वेळ होती. पण ती त्यानें व्यवस्थित पार पाडली. त्या दिवशीं मात्र सुधारणा करण्याच्या कामांत आम्हीं एक पाऊल चांगलेंच पुढें टाकल्याचें मला समाधान झालें.

मुलांना कसें वळण लावावें, या बाबत साऱ्या प्रश्नांचीं उत्तरें मला माहीत आहेत, असें सांगण्याचें धाडस मी मुळींच करीत नाहीं. उलट जसजसें वय वाढतें आहे तसतसा असे कांहीं रेखीव, ठाशीव नियम आपण बांधूं शकतों यावरचाहि माझा विश्वास ढळत चालला आहे. तथापि इतक्या अनुभवांनंतर एक गोष्ट मात्र मला निश्चितपणें सांगतां येते, ती ही कीं, मुलांना वळण लावायचें असेल किंवा समजून सांगायचें असेल तर जेव्हां तीं चुकतात, तेव्हांच ताबडतोब सांगितलेलें चांगलें. त्या वेळीं गप्प बसून मग कांहीं दिवसांनीं ती गोष्ट उकरून काढून त्या वेळीं

तो कसा चुकला हें सांगण्यांत कांहींच अर्थ नसतो. लोखंड तापलेलें असतां घण मारले तर वाकतें, नंतर नाहीं. मुलांचें तद्वतच आहे. म्हणूनच या प्रसंगीं कपडे वगैरेसुद्धां बदलण्यांत वेळ न घालवतां त्या भरांत मीं साऱ्या गोष्टी करून टाकल्या आणि टिंचीवर तरी त्याचा योग्य परिणाम झाला. ट्रोचाची क्षमा मागितल्यावर टिंची माझ्याकडे वळला. ओल्या कपड्यांनिशीं पाघळत मी तशीच उभी होतें. तें पाहून मला तो म्हणतो, "माझ्याकरतां तुला भिजावें लागलें ना? पण आज मी मात्र एक धडा शिकलों."

टिंचीची हीच मजा होती. केव्हां केव्हां, तो अशी विलक्षण समजूत दाखवीत असे, त्यामुळें कितीहि त्रास पडला तरी त्याच्या सगळ्या गोष्टी नीट शांतपणें सहन करून घ्यायला बरें वाटे. इतकेंच नव्हे, त्यामुळेंच त्याला शिकवण्याची मोठी मौज येई. इथें एक गोष्ट मात्र कबूल करणें भाग आहे ती ही कीं, त्याला शिकवण्याची माझी तऱ्हा कांहीं वेळां अगदींच ओबडधोबड व दांडगी असे.

असो. समुद्रावर घडलेल्या घटनेला आम्हांला इथेंच कांहीं विराम देतां आला नाहीं. कारण लगेचच टिंचीनें मी 'फिरून कधीं पोहायला जाणार नाहीं' अशा अर्थाची घोषणा केली. अर्थातच एखाद्या गोष्टीविषयीं धास्ती घेऊन अढी राहूं देण्याची कल्पना मला बिलकूल पसंत नव्हती म्हणून मी त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करूं लागलें.

"हें पाहा टिंची, एकादें विमान खालीं कोसळलें कीं त्या विमान चालविणाऱ्याला भिऊन चालत नाहीं. बरा झाला कीं लगेच फिरून विमान उडवावें लागतें. तसें नाहीं केलें तर त्याची भीति कधीं निघतच नाहीं. घोड्यावरून स्वार खालीं पडला कीं, उठून त्याला फिरून बसावें लागतें. सायकल चालवितांना मुलगा पडला तर सायकलला रामराम ठोकून चालत नाहीं. फिरून बसायचें धाडस केलें म्हणजेच त्याला भीति न वाटतां सायकल येते. तसेंच पोहण्याचें आहे. तूं फिरून पोहायला गेला नाहींस तर नेहमींच धास्ती वाटून तुला कधीं चांगलें पोहतां येणार नाहीं. तेव्हां तूं अशी धास्ती घेऊन चालायचें नाहीं, तुला परत पोहायला गेलेंच पाहिजे."

"मी नाहीं जा जाणार कधीं," टिंचीनें फिरून एकवार घोषणा केली.

"हें पाहा टिंची, असें करून कसें बरें चालेल? आज तुला समुद्राची एवढी दहशत मला घालावी लागली, हें खरोखर बरें नाहीं झालें. पण इलाजच नव्हता. समुद्र खवळला कीं त्यांत पोहण्यांत अर्थ नसतो. कितीतरी लोक अशा वेळीं नाहक प्राण गमावून बसतात. म्हणूनच आम्हीं तुला नको म्हणून सांगितलें. पण

तूं ऐकेनास असें पाहिल्यावर नाइलाजानें, समुद्र खवळला कीं त्याचें किती भयानक स्वरूप असतें, त्यांत मरायची किती भीति असते हें मला प्रत्यक्ष अनुभवानें तुला समजावून द्यावें लागलें. अशा वेळीं, फक्त मूर्खच माणसें धाडस करूं शकतात. पण तूं मूर्ख नाहींस. समुद्रांत पोहावें केव्हां आणि केव्हां पोहूं नये हें तुला आतां सहज कळलें. आज समुद्र खवळला होता, तेव्हां पोहायचें नाहीं. उद्यां समुद्र कदाचित् शांतहि होईल. त्या वेळेला पोहायला कांहींच हरकत नाहीं. ही गोष्ट तुला कळली, म्हणजे झालें. मग भीति नाहीं.”

“पण इतके लोक बघत असतां मी नाहीं पोहणार.”

“हरकत नाहीं.” आम्हीं कबूल केलें.

दुसरे दिवशीं संध्याकाळीं पोहणारे लोक जायच्या सुमारास आम्ही समुद्रावर गेलों व सारींच पोहायला पाण्यांत शिरलों. पहिल्या प्रथम, टिंची आंत शिरायला जरा कांकू करीत होता. पण त्या दिवशीं समुद्र फारच शांत होता. शिवाय आम्ही चेंडू घेऊन पाण्यांतले निरनिराळे खेळ सुरू केल्यानें एकदां आंत शिरल्यावर, सगळीं आपलींच माणसें असल्यानें, तो खेळांत चांगलाच रमला. पोहून परत आल्यावर ‘आज समुद्र कृपाळु होता नाहीं?’ असें म्हणून त्यानें आपल्या तोडक्या मोडक्या इंग्रजींत समुद्राला धन्यवाद दिले. नंतर मला म्हणतो, “तूं काय म्हणत होतीस तें आतां मला कळलें. समुद्र वेड्यासारखा खवळला कीं त्याच्याशीं मस्ती करण्यांत कांहींच अर्थ नाहीं, हें खरें आहे. मला आतां कळलें.”

“पण मीं तुला आधींच सांगितलें होतें, तेव्हां कां नाहीं तुला कळलें?” ट्रोचानें विचारलें.

“ऊंः मी Dumkof (मूर्ख) होतों” त्यानें हसून उत्तर दिलें.

समुद्रानें टिंचीला चांगलेंच बरें केलें म्हणायला कांहींच हरकत नाहीं. कारण त्या दिवसानंतर टिंचीच्या फिरून कधींच अंगांत आलें नाहीं. अर्थात् याचा अर्थ त्याला राग येत नसे असा नाहीं; पण पूर्वीसारखें झंझावाती वादळ मात्र कधीं निर्माण झालें नाहीं. शिवाय त्या दिवशीं समुद्रांत भयंकर घाबरल्यामुळें एरवीं त्याच्या वागणुकींत जो कित्येक वेळां अकारण घाबरटपणा दिसे, तो अजिबात नाहींसा झाला. ह्या हकीकतीनंतर एका वर्षभरानें त्यानें बालवीरांचें प्राणसंरक्षक चिन्ह मिळवलें, एवढेंच नव्हे तर ‘लोकांचे जीव वांचवणारा’ (Lifeguard) होण्यास आवश्यक लागणारे सारे गुण पण त्यानें मिळवले.

यानंतर लवकरच एकदां सहज मी त्याच्याकडे पाहत असतां एक गोष्ट माझ्या लक्षांत आली. त्यामुळें तर मी चकितच झालें.

एके दिवशीं सुट्टी सरतां सरतां, आम्ही सगळींजण किनाऱ्यावर दुपारच्या प्रहरींचें ऊन खात पडलों होतों. टिंची बाजूला अगदीं पाण्याच्या कडेला उभा राहून समुद्राकडे पाहत होता.

त्याच्या अंगावर नुसती पोहायच्या वेळची चड्डी होती. त्याचा गौर वर्ण उन्हानें झालेल्या तांबूस सुवर्णमय कांतीनें छानच दिसत होता. त्याचे आधींच फिक्कट रंगाचे केस तर उन्हानें पुरे धवलवर्ण झाले होते. पण सगळ्यांत आश्चर्याची गोष्ट ही कीं, सरळ बांबूसारखा ताठ उभा होता तो. खांदे मागें, डोकें सरळ, उंच, हनुवटी वर, अगदीं एकाद्या सैनिकासारखा तो उभा होता. पूर्वींचें तें पोंक, लोंबलेले हात, सारें कुठेंच दिसत नव्हतें.

माझ्याप्रमाणें ट्रोचाच्या पण हा फरक लक्षांत आला असावा. कारण हा बदल लक्षांत येऊन माझें लक्ष वेधतें आहे न वेधतें आहे तोंच ट्रोचा मला म्हणते, “आई, टिंची बघ कसा तीरासारखा सरळ ताठ उभा आहे तो. आतां तो पोंक वगैरे बिलकुल काढीत नाहीं.’

त्याचा चेहरा पण किती उल्हसित व मोकळा दिसत होता. मला वाटतें त्याच्या भावनांची गुंतागुंत नाहींशी होऊन त्या सरळ झाल्याबरोबर त्याचें शरीर पण एकदम सरळलें.

मला तर असें वाटूं लागतें, ‘तूं वांकूं नको’, ‘नीट उभा राहा’ असें आपण मुलांना सांगतों, पण त्यापेक्षां, मनानें तीं सरळलीं कीं आपोआपच तीं सरळ ताठपणें चालूं लागतात.

ॲटलांटिक महासागरानें टिंचीच्या अंगांत येणें बंद केलें, पण त्याची चावण्याची संवय सुटायला मात्र कांहीं दिवस जावे लागले. मोठ्या अनपेक्षितपणें एकदां हीहि त्याची संवय सुटली. त्याचें सारें श्रेय मात्र त्याच्या 'लाडक्या बर्फगोलका'लाच द्यावें लागेल.

हें सशाचें पिलू लहान होतें तोंवर ठीक होतें. पण जसजसें तें वयांत येऊं लागलें तसें त्याचें पूर्वीचें नाजुक, गोजिरवाणें, थरथरणारें स्वरूप पालटून, मादी-शिवाय राहिल्यानें, त्यानें चांगलेंच विक्राळ स्वरूप धारण केलें. तें स्वरूप पाहतांच, त्याला लाडका म्हणणेंसुद्धां शोभलें नसतें.

सारा वेळ, ज्याला त्याला तो चावूं लागला. त्याला खायला घालायला गेलें तरी पटकन् तो हाताला डसे. टिंचीनें त्याला उचलून घेतलें कीं लगेच तो त्याला चावे तरी, नाहींतर खेंचरासारख्या अगदीं जोरांत लाथा मारायला सुरवात करी. त्याला हात लावायचा म्हणजे आतांशा धास्तीच वाटे. एक दिवस तो टिंचीला असा कडकडून चावला कीं, बोटें झाडीत रक्त चोखीतच टिंची उड्या टाकीत आंत आला.

"बर्फगोलक मला चावला" विव्हळतच त्यानें मला सांगितलें. वास्तविक यापूर्वी कितीकदां तरी तो ससा टिंचीला चावला होता; पण आज त्यानें आपले दांत अगदीं खोल रुतवले होते. टिंची माझ्याकडे सशाविरुद्ध जोराची तक्रार करीत असतां "कांहीं मुलें सशासारखीं कशीं चावतात" याची आम्हांला आठवण झाल्याशिवाय राहिली नाहीं. पण त्यावेळीं तरी आम्ही त्याबद्दल एक चकार शब्द तोंडांतून न काढतां गप्प बसलों.

किती वेळां तरी लोक मला म्हणत कीं, 'ह्या मुलाला जर अशी चावायची खोड असेल, तर तो चावला कीं सरळ उलटून तुम्हीच कां नाहीं त्याला चावत?' असें करणें, मलाच काय, आमच्यापैकीं कोणालाच शक्य झालें नसतें. लहान मुलाच्या कोंवळ्या मासांत दांत रुतवायचे ही कल्पनाच मुळीं असह्य होते. पण सशाला हा विचार नव्हता. तो टिंचीलाहि चावे. मलाहि चावे. मला

वाटतें त्याला मला चावण्यांत मोठी मजाच वाटत असावी. कारण तो खायला घातलें तरी चावे, वेळेवर खायला नाहीं दिलें तरी चावे. त्यामुळेंच मला त्याचा भारी राग येऊं लागला. कुणाला उलटून चावायची कल्पना माझ्या मनांत कधीं आली असेल तर टिंचीला तर नाहीं, पण त्याच्या सशाला मात्र मी चावलें असतें. पण जाऊं द्या. उगीच कल्पना कशाला करा? जे काय थोडे दांत राहिले होते, ते अशा केसाळ प्राण्याला चावायच्या कामीं खास आले नसते.

अखेर एक दिवशीं टिंचीला तो पुष्कळदांच चावला. त्याच दिवशीं मला पण दोनदां चावला. माझ्या गुडघ्याला चावून माझी नायलानची मोजे-जोडी त्यानें बेकाम करून टाकली. हें पाहून टिंचीसुद्धां रागावला.

"तें कांहीं नाहीं. मला नको हा ससा. मी देऊनच टाकतों कसा." टिंचीनें ठरविलें व एक दिवस सशाची स्वारी मोठ्या खुषीनें शेतांत गेली. आतां तिथें तो बहुधा एका मोठ्या कुटुंबाचा बाप होऊन बसला असेल. चावण्याची खोड आनुवंशिक आहे कीं नाहीं, हें माहीत नाहीं, पण एवढें खरें कीं, त्या खोडीपायीं मिसेस मॅक्ग्रेगरनीं त्याला चिरून त्याचा पानगा करण्याऐवजीं त्याला जिवंत सोडून बाप होऊं दिलें, यामुळें आम्हांला मात्र समाधान वाटलें.

त्या सशामुळें टिंचीवर मात्र एक परिणाम निश्चितपणें घडून आला. त्यानंतर, चावायची खोड टिंचीनें अजिबात सोडली.

स्वतःमध्यें होत चाललेली ही सुधारणा टिंचीच्यासुद्धां लक्षांत येत असे. पुष्कळ वेळां तो हसून म्हणे, "अलिकडे तो वाईट कार्लिस मला किती तरी दिवसांत भेटला नाहीं. गेला कीं काय कोण जाणे! मला वाटतें तो जर्मनीला परत गेला असावा."

असे दिवस जातां जातां अखेर उन्हाळा संपला. हिवाळ्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. समुद्राच्या कांठाशीं, लाटांत न सांपडतां, किनाऱ्यावरच्या ओल्या वाळूंत आपलें भक्ष्य शोधण्यासाठीं येणाऱ्या सॅन्डपायपर पक्ष्यांचे थवे दिसूं लागले. हे पक्षी साधारणतः सुट्टी संपून शाळा उघडायच्या सुमारास दिसूं लागतात. त्यामुळें हे दिसूं लागले कीं दरवर्षी मुलें "आतां सुट्टी संपली, हे आले शाळकरी पक्षी" असें मोठ्या निरुत्साहानें बोलूं लागत. कातिडिडस दिसूं लागले कीं समजावें आतां सहा आठवड्यांनीं बर्फ पडणार. मग रातकिडे पण घराच्या सांधीकोपऱ्यांत शिरून आपली तार छेडूं लागतात. रातकिड्यांच्या ह्या आवाजाचा टिंचीला फार राग येई. "बापरे, किती रातकिडे! मी कधीं एवढे रातकिडे पाहिले नाहींत.

लेकाचे साऱ्या रात्रभर किर्रकिर्र करून झोपूं पण देत नाहींत."

असो. अशा रीतीनें हिवाळा सुरू झाला. शाळा उघडली. एकंदरींत विचार करतां, मी शिकवीत असें त्या खाजगी शाळेपेक्षां, आमच्याच त्या रस्त्याला एक सार्वजनिक शाळा होती त्या शाळेमध्यें टिंचीला घालणें बरें, असें आम्हीं ठरविलें. घरापासून ती शाळा जवळ पण होती. अशा रीतीनें गेल्या वर्षीच्या साऱ्या अस्वस्थ करून सोडणाऱ्या आठवणींवर पडदा टाकून टिंचीच्या आयुष्याची फिरून नवी सुरवात झाली. त्याची शाळा बदलायचें आणखी पण एक कारण होतें. मी ज्या शाळेंत शिकवीत होतें ती खाजगी शाळा आमच्या गांवाच्या चांगलीच बाहेर होती. तेथें येणारीं मुलें भोंवतालच्या टापूंतलीं, पण निरनिराळ्या गांवांतून अशीं येत व शाळा संपली कीं परत जात. त्यामुळें संध्याकाळीं खेळायला शाळेंतलीं अशीं कोणीच मुलें नसत. पण या नव्या शाळेंत मुलें त्याच रस्त्यावर राहत असल्यानें शाळे-नंतरहि तीं एकत्र जमून खेळूं शकत. मुलाला कोणत्याहि परकी ठिकाणाविषयीं आपलेपणा उत्पन्न होऊन तो तेथलाच आहे अशी भावना उत्पन्न करायची असेल तर अशा शाळासोबत्यांची फारच गरज असते.

याशिवाय टिंचीला मी आतां माझ्या घरींच सांभाळायला आणल्याकारणानें, मी ज्या शाळेंत शिकवीत होतें तेथेंच त्यानें यावें व सारा वेळ माझ्या भोंवतीं गांठ बांधल्यासारखें राहावें, हें माझ्या मनाला प्रशस्त वाटेना. अशा वेळीं शाळेंतील नातें व घरचें नातें यांत गल्लत होण्याचा संभव असतो. तें तितकेंसें बरेंहि नव्हे. या विचारानें मीं त्याला मुद्दाम या दुसऱ्या शाळेंत घातला. या ठिकाणीं मात्र एक चांगलीच अडचण माझ्यापुढें उत्पन्न झाली. मी शाळेंत जात असल्यानें दुपारीं घराला कुलूपच लागे. अशा वेळीं मधल्यावेळच्या सुट्टींत खायला यायचें तर घरीं कोणी नाहीं, या कारणानें घरीं यायची तो टाळाटाळ करण्याचा बराच संभव होता. तसें होणें तितकेंसें इष्ट नव्हतें. घरीं न येतां राहायचें म्हटलें कीं तो शाळे-भोवतालचीं दुकानें पाहत, इकडे तिकडे भटकला असता आणि मग काय करता, हें कांहीं इतक्यांतच सांगतां येत नव्हतें. तेव्हां मधल्यावेळीं खायला त्यानें घरीं यावें, हें तर मीं निश्चित ठरविलेंच.

पण घरीं कोणी नाहीं अशा परिस्थितींत मुलाजवळ किल्ली देऊन त्यावरच सारा भार टाकायची कल्पना मला विशेषशी पसंत नव्हती. अशा फिकिरींत मी असतां माझ्या एका मैत्रिणीनें माझा हा प्रश्न चांगलाच सोडवला. मी नसतांना तिनें घरीं राहायचें कबूल केलें. मी शाळेंतून आलें कीं, रोज मला ती सांगे, " तुझा छोटा

स्टॅलिन मला इतकासुद्धां त्रास देत नाहीं फारच चांगला वागतो. आमचें दोघांचें इतकें छान जमतें कीं विचारूं नकोस."

अशी सोय झाली तरी नशिबाची जास्त परीक्षा पाहायची माझी इच्छा नव्हती. म्हणूनच, मी रोज न जातां, आठवड्यांतून तीन दिवस शाळेंत जायचें ठरविलें. त्यामुळें 'घरीं कोणी आहे का' असें म्हणून मधल्या सुट्टींत टिंची धावत आला कीं, मी घरांत असल्यानें मला बरें वाटे.

टिंचीसुद्धां कांहीं कमी नव्हता. मी बाहेर गेलें असलें कीं, टिंची घराची नीट काळजी घेई. त्यामुळें आमची व्यवस्था छानच जमली. लवकरच टिंचीचा वाढदिवस साजरा झाला. त्या दिवशीं केकवर बारा मेणबत्त्या पाजळत होत्या. त्याला आतां बारावें सरून तेरावें वर्ष लागलें होतें. वाचनाच्या दृष्टीनें मात्र तो तिसरेंच रीडर वाचूं शके. म्हणूनच आम्हीं त्याला पांचव्या वर्गांत घातला. असें घालायला दुहेरी कारणें होतीं. एक तर त्या वर्गाचा अभ्यास जरासा पुढें असला तरी त्याला जड गेला नसता व दुसरें म्हणजे त्याच्या वयाच्या मानानें आपण लहान वर्गांत आहोंत असें त्याला या वर्गांत वाटण्याचा संभव नव्हता.

टिंची तिसरें रीडर वाचीत असे या म्हणण्याचा अर्थ असा नव्हे कीं, शाळेच्या अभ्यास-पुस्तकांचेंच त्यावर कोणीं कडक बंधन घातलें होतें. उलट त्याला त्याच्या शक्त्यनुसार कोणत्याहि विषयाचीं पुस्तकें वाचायची परवानगी होती. वर्गावारी लावलेलीं रीडरेंच त्यानें वाचलीं पाहिजेत असें त्याच्यावर कडक बंधन नव्हतेंच. पण त्याच्या वाचनाच्या प्रगतीची नीट कल्पना द्यायची म्हटलें तर तो तिसरें रीडर वाचीत असे असें म्हटलें कीं प्रगतीचें सर्वसाधारण एक मापन ऐकणारांच्या डोळ्यांपुढें उभें राहतें. एवढ्याच करतां मीं तो तिसरें रीडर वाचीत असे, असें म्हटलें. बाकी या पुस्तकाबरोबरच तो इतर दुसरींहि पुस्तकें वाचून काढी.

या पांचव्या वर्गांत टिंचीला एक फारच चांगली शिक्षिका मिळाली होती. तिला त्याच्या साऱ्या अडचणी कळत असल्यानें तिला त्याच्याविषयीं सहानुभूति वाटे. मात्र त्यामुळें विरघळून न जातां, वागवतांना, गंभीरपणें एक प्रकारच्या ठाम निश्चयानें ती त्याला वागवी. मला तर वाटलें कीं, टिंचीचें मन बहुधां आतां तिच्याचकडे वळेल. कारण मी शिक्षिका म्हणून तो माझ्याकडे आला असतांनाच माझ्याविषयीं त्याच्या मनांत आपलेपणा उत्पन्न झाला होता. पण माझी ही समजूत चुकीची ठरली. माझ्यावरील टिंचीची निष्ठा अढळ राहिली. एवढेंच नव्हे, मीं केरसुणीनें मारलें, कांहीं केलें तरी अखेरपर्यंत तो माझा 'बंदा गुलाम'

म्हणून म्हणतात तसा होऊन राहिला.

त्या हिवाळ्यांत पांचव्या वर्गानें पहिली कोणती गोष्ट केली असेल तर ती म्हणजे एक 'नमुनेदार डेअरी' पाहायला जायचें ठरविलें.

दूध कसें येतें याची माहिती मुलांना व्हावी, त्याचप्रमाणें नाना रोगजंतूंची भीति राहूं नये म्हणून तें शुद्ध कसें करतात, त्याची निगा कशी राखतात हें सारें मुलांना समजून त्यांच्या ज्ञानांत भर पडावी, हा एक त्या भेटीचा उद्देश होता. चोहोंकडे पाहिल्यावर वाटाड्यानें माहिती सांगून दुग्धवाडीच्या यंत्रागारांतून मुलांना नीट बाहेर आणलें. त्यांना एका रांगेनें उभें करून त्यांची मोजदाद सुरू झाली. पाहतात तों एक कमी. सारीं काळजींत पडली. गाईंच्या गोठ्यापासून तों बुचें लावण्याच्या यंत्रागारापर्यंत सगळीकडे शोधाशोध सुरू झाली, पण टिंची कांहीं कुठें दिसेना. अखेर साऱ्या दुधाची प्रत एक ठरावी म्हणून जेथें सर्व दूध एकत्र करण्यांत येत असे त्या खोलीजवळून एक जण चालला असतां टिंचीचा विदूषकी चेहरा एका भोंकामागून सगळ्यांकडे पाहून हसतो आहे हें त्याच्या लक्षांत आलें. यंत्रागारांतील ती खोली म्हणजे खरोखरी एक स्टेनलेस स्टीलचा मोठा पिंजरा असून त्यांत गरम वाफ सोडून दूध शुद्ध केलें जाई. गरम वाफ हें काय प्रकरण आहे हें मला नीटसें माहीत नाहीं पण एकंदरींत तें कांहींसें जबर-दस्त काम होतें हें खरें. त्यावेळीं त्यांत दूध नव्हतें. पण वाफ सोडून तो पिंजरा अगदीं नुकताच 'निर्जंतुक' करण्यांत आला होता. अशा वेळीं आपल्या चिखलांत भरलेल्या बुटांनिशीं व घाणेरड्या कपड्यांनिशीं टिंची सरपटत हळूच आंत शिरला व एका भोंकांतून शोध करणाऱ्या मुलांकडे पाहत, हसत, वेडीवाकडीं तोंडें करीत, उभा राहिला.

त्याला बाहेर काढण्यांत आल्यावर 'मला तें काम कसें चालतें हें पाहायचें होतें' असें त्यानें सांगितलें.

ह्या लहानशा सहलीनें त्याच्या अनुभवांत चांगलीच भर पडली याविषयीं बिलकुल शंका नाहीं.

एकंदरींत टिंचीच्या या नव्या शाळेची सुरवात तर फारच छान, उत्साहाची झाली. 'आम्ही शाळेंत गोष्टी लिहितों' एक दिवस घरीं आल्याबरोबर त्यानें मला सांगितलें.

"पण तुला आली का लिहितां ?"

"खात्रीनेंच."

"बाई ! असें लिहलेंस तरी काय?"

"म्हणजे काय? आम्हीं सुट्टींत काय केलें, तें आम्हांला लिहावयाचें होतें."

"मग तूं काय लिहिलेंस?"

"लिहिलें आहे तर" असें म्हणून चड्डीच्या मागच्या खिशांतून त्यानें एक कागद बाहेर काढला.

**ह्या उन्हाळयांत पोहनें अन् वालबाल खेळ अन् हारसशऊज मी सिकलों.**

"वाच पाहूं मोठ्यानें."

ठीक. "ह्या उन्हाळयांत पोहणें आणि व्हालीबाल खेळ आणि हार्सशूज मी शिकलों" असें मोठ्यानें त्यानें वाचून दाखविलें.

आपण फारच छान लिहलें आहे अशी त्याची कल्पना होती त्यामुळें मोठ्या अभिमानानें त्यानें आम्हांला विचारलें, "तुम्हांला वाटतं का मी चांगला लिवतों."

"वा फारच छान" म्हणून आम्हीं टाळ्या पिटल्या.

कित्येक वेळेला मला बाहेर जायचें असलें, कीं त्याला मी लहानशी चिठ्ठी लिहून ठेवीत असें. त्याला अशा चिठ्ठयांची भारी गंमत वाटे. त्यानें त्या अजून एका लहानशा पेटींत जपून ठेवल्या आहेत. माझें पाहून त्यालाहि स्फूर्ति होऊन तोहि मला मिळेल अशा चिठ्ठ्या ठेवूं लागला. मला ह्या चिठ्ठयांची भारीच मौज वाटली. अद्यापपावेतों मीं त्या जपून ठेवल्या आहेत. नमुन्यादाखल पुढील चिठ्ठी पाहण्याजोगी आहे. "सैकलच्या दुरसतीचे पयसे दिलयाबदल आबहारी आहे." सायकलच्या दुरुस्तीचे पैसे दिल्याबद्दल आभारी आहें हा त्या वाक्याचा अर्थ न सांगतांसुद्धां समजतां येण्याजोगा आहे.

टिंचीला शाळा बदलल्याबद्दल कांहीं वाटलेंसें बिलकुल दिसून आलें नाहीं. पहिल्यानें कांहीं दिवस तो आनंदानें शाळेंत जाऊं लागला कीं, मी निरोप द्यायला दारांत उभी राहत असें. तो जायला लागला कीं, लगेच माझ्यासमोर थांबे. टांचेला टांच जुळवून सैनिकी थाटांत उभा राही; नंतर कमरेंत खूप वाकून माझ्या हाताचा मुका घेई व मला 'गुड बाय' करी. 'मी गेल्यावर नीट मजेंत राहा बरं का' असें सांगायला तो कधींच विसरत नसे.

वास्तविक मुलें अशीं जाऊं लागलीं, कीं अमेरिकन आया आपल्या मुलांचा मुका घेतात. पण निरोप देतांना जो एकंदर त्याचा रुबाब असे, त्यामुळें मला त्याचा मुका घेण्याचें कधींच धाडस झालें नाहीं. तसें करण्यानें त्या रुबाबाला कमीपणा येईल असें मला वाटे. टिंचीच्या मनांत असलें कीं, त्याच्या एकंदर रीती-भाती,

वागण्याचे शिष्टाचार फारच छान, अगदीं रुबाबदार, असत. चांगला असला कीं, तो त्या तशा राखायचा प्रयत्न पण करी. एक दिवस आम्ही एकदां एक प्रेमकथेचा सिनेमा पाहत होतों. त्यांतील नायकानें नायिकेचा हात वर उचलून चुंबन घेतल्याबरोबर टिंची एकदम म्हणतो, "पाहा, त्या माणसाला एकाद्या 'लेडी'च्या हाताचा मुका कसा घ्यायचा हेंसुद्धां माहीत नाहीं. अरे मूर्खा, असा हात वर काय उचलतोस ? खालीं वाक आणि हात जिथें असेल तिथें वाकून मुका घे." त्याच्या अशा रुबाबदार रीतीभातींनीं कित्येक वेळां मी 'प्रिझनर ऑफ झेंडा' या कथेंतील एकादी व्यक्ति आहे कीं काय असें मला वाटूं लागे. त्याच्या वागण्यांत रीतीभातींत रुबाब आहे, असें आम्हांलाच वाटे असें नाहीं. एकदां तर एकीनें मला विचारलें सुद्धां कीं, 'हा एवढा राजबिंडा मुलगा तुमच्याकडे कुठून आला?' मी अर्धवट थट्टेनें, अर्धवट निर्वासित कैद्यांची कहाणी सांगायचा कंटाळा आला म्हणून, उत्तर केलें, "कां तुम्हांला माहीत नाहीं का हा कोण आहे तो? अहो, रोमेनॉफ वंशांतला शिल्लक राहिलेला तो एकटाच वंशज आहे. पण हें मी तुम्हांला म्हणून सांगतें आहे. तें इतर कुणाला सांगूं नका." ह्यानंतर लवकरच एकाच्या तोंडून दुसऱ्याच्या, अशा वाढत वाढत, बातम्या कशा पसरतात याचा मला एक मजेदार नमुना पाहायला मिळाला. मी असें बोलल्याला एक आठवडा-सुद्धां लोटला नसेल. एक दिवस रस्त्यांत थांबवून मला एकीनें विचारलें, "काय हो, रशियांतील राजसिंहासनाचा वारस तुमच्याकडे आहे, असें मीं ऐकलें, तें खरं कां? खरंच का तो तुमच्याकडे आहे? बाई, मग एक दिवस कम्युनिस्ट तुम्हांला चांगले घेरायचे कीं! तुम्हांला भीति कशी नाहीं वाटत?"

आमचा रोमेनॉफ आतां सार्वजनिक शाळेंत खूपच आनंदानें स्थिरावला होता. एक दिवस मात्र त्याच्या रुबाबाला कमीपणा आणणारा एक प्रसंग शाळेंत घडला आणि लगेच त्या दिवसापासून फिरून त्याचें बिनसलें.

टिंचीबद्दल सहानुभूति वाटणाऱ्या दुसऱ्या एका वर्गावरच्या शिक्षकिणीनें एक दिवस आपली एक लटाव्हिअन मैत्रीण वर्गांत आणली. तिची अशी कल्पना होती कीं, लटाव्हिअन भाषेंत बोलणारें दुसरें कोणी भेटलें कीं त्याला मजा वाटेल. तिनें त्या मैत्रिणीला वर्गांत आणलें व मुलांसमोर त्याला तिच्याशीं बोलायची वर्ग-शिक्षिकेजवळ परवानगी मागितली. वर्गासमोर असें बोलायला लावण्यांत तिचा हेतु एवढाच होता कीं लटाव्हिअन भाषा कशी बोलतात, हें मुलांनीं ऐकावें. त्यांनाहि गंमत वाटेल. खरें म्हणजे त्यांत वावगें असें कांहींच नव्हतें. पण एवढें

खरें कीं, त्याचा परिणाम मात्र अगदीं अनपेक्षित झाला.

आपली भाषा आतां ऐकायला मिळणार, म्हणून टिंचीला जितका आनंद झाला, तितकाच आतां वर्गासमोर चांगलें मिरवायला पण मिळणार म्हणून त्या पोरमनाला झाला असावा. टिंची मोठ्या ऐटीनें उभा राहिला. पहिल्याप्रथम, त्यानें चांगलें खालीं लवून, तिला अभिवादन केलें.

नंतर एक भलताच प्रसंग ओढवला.

त्या बाईनीं बोलायला सुरवात केली. पण टिंचीला कांहींच कळेना. तो काय बोलतो, हें तिला पण समजेना. गोंधळून ती त्याच्याकडे पाहूं लागली. टिंची अगदीं भगभर बोलत होता, पण तिला एक अक्षरहि कळेना. दोघांनीं फिरून प्रयत्न करून पाहिला. पण पुन्हा तोच प्रकार. अखेरीला तर, त्या बाईनीं साऱ्या वर्गासमोर इंग्रजींत सांगितलें कीं "या मुलाला लटाव्हिअन येत नाहीं." यामुळें टिंची गडगडला. आपल्याला रशियन, लटाव्हिअन व जर्मन भाषा येतात असें तो नेहमीं मुलांना सांगत असे आणि त्याच्या मतानें तरी तें अगदीं खरें होतें. किंबहुना, पांचव्या वर्गाच्या कांहीं विषयांत तो मुलांबरोबरीनें नसला, तरी तीन भाषा येतात, एवढ्यामुळेंच, मुलें त्याला बरेंच मानीत असत. आज त्याच्या त्या प्रतिष्ठेला चांगलाच धक्का बसला. त्या मूर्ख बाईला लटाव्हिअन येत नव्हतें, असें म्हणायची सोय त्या बाईनीं ठेवली नाहीं. "मी याच्याशीं लटाव्हिअन, रशियन, जर्मन या तिन्ही भाषांतून बोललें पण याला कोणतीच भाषा येत नाहीं. तो कोणती तरी बोली बोलतो, ती मला कळत नाहीं. पण ती या तिन्ही भाषांपैकीं नाहीं." असें तिनें सर्वांदेखत इंग्रजींत सांगितलें.

सगळ्या वर्गासमोर हा प्रकार झाल्यानें टिंचीचा नूर उतरून तो फारच खजील झाला. त्याला रडूं आवरेना. रडतच तो त्या बाईला उद्देशून ओरडला, "मला माझी भाषा चांगली येते. तुम्हांलाच कांहीं कळत नाहीं. असें म्हणून रडत रडतच त्यानें घराकडे धाव ठोकली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं स्वारी उठली, तीच मुळीं घुश्शांत.

शाळेंत गेल्यावर त्याच्या वर्गशिक्षिकेनें त्याला रोजचा कांहीं तरी धडा करायला सांगितला. त्याबरोबर "करत नाहीं जा" टिंचीनें बेगुमानपणें उत्तर दिलें. सारा वर्ग भयचकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागला.

"तुला केलें पाहिजे. नाहींतर–" असें म्हणून वर्गशिक्षिका त्याला सांगूं लागली, तोंच एकदम भडकून टिंची उत्तरला, "नाहीं तर काय—? कंटाळलोंय तुम्हांला मी."

दुपारच्या आंतच "मुलाला घेऊन जा" म्हणून शाळेंतून चिठ्ठी आली. मी शाळेंत गेलें नी पाहतें तों कपाळाला कमालीच्या आंठ्या घालून, पोंक काढून, टिंची बसलेला. मला पाहतांच, त्याच्च तारेंत तो माझ्याशीं बोलूं लागला, "अस्सं! आतां तूं पण आलीस! काय माझं डोकं उडवणार आहेस? मग उडव तर. केरसुणी घे नी हवं तर बडव सुद्धां. मला कांहीं एक परवा नाहीं. मी कंटाळलोय तुम्हांला, एकदां सुटलों, म्हणजे झालं."

मी त्या बडबडीकडे कांहीं लक्ष न देतांच, त्याला घरीं नेला. मात्र तिथें गेल्यावर मी त्याला चकित करून सोडणारी एक गोष्ट केली. अनपेक्षितपणा पुष्कळ वेळां चांगलाच परिणामकारी ठरतो. मी घरीं गेल्यावर त्याच्या अपेक्षेप्रमाणें त्याचें डोकें उडविलें नाहीं कीं केरसुणीनें बडविलेंहि नाहीं. उलट मीं त्याचा एक मुका घेऊन एक दाट जॅम लावलेला सॅन्डविच्च आणि दुधाचा ग्लास त्याला दिला व त्याचा आवडता शिपाईहि हातांत दिला.

माझ्या या करण्यानें तो अगदींच विरघळून गेला.

"कां कुणास ठाऊक माझ्या असें अंगांत येतें तें" तो मुसमुसूं लागला.

"टिंची" मीं त्याचें नाक पुसून त्याला म्हटलें, "मला कळतें तुला काय झालें आहे तें. काल त्या बाईनें साऱ्या वर्गासमोर तुला रडायला लावलें ना, म्हणून असें झालें. साऱ्या मुलांमुलींसमोर रडायचें म्हणजे कुणाला आवडेल?—मला तरी नाहीं आवडायचें. म्हणूनच आज तूं असा वागलास. तुझ्या मनांत त्या सर्वांना दाखवायचें होतें कीं, काल रडलों असलों तरी मी कांहीं रडूबाई नाहीं."

"तुला एक गोष्ट सांगूं का, तूं 'रडूबाई' नाहींस आणि वर्गांत कोणत्याच मुलाला तूं तसा आहेस असें वाटतहि नाहीं. या मुलांपैकीं लटाव्हियांत जाणार आहे तरी कोण तुझी भाषा वाचायला? आणि बोलायला तरी कोण शिकणार आहे? त्या बाईला तरी ती भाषा कुठें येत होती? तूं बोलायला लागलास तशी कशी गप्प होती? हें बघ, तूं अगदीं वाईट वाटून नको घेऊं. वर्गांतल्या साऱ्या मुलांना तूं कित्ती आवडतोस. एवढ्या अमेरिकेसारख्या दूर देशांत येऊन तूं शाळेंत जातो आहेस, याबद्दल किती तरी वाटतें मुलांना!" अशा रीतीनें मीं त्याची समजूत काढायचा प्रयत्न केला खरा, पण त्याची खरी समजूत पटली नसावी. या प्रकरणानंतर त्याची वागणूक बदलली व त्याच्या इंग्रजीच्या प्रगतीला चांगलाच खो बसला.

यानंतर कितीतरी वेळां तो इंग्रजींत म्हणून बोले, पण तो काय बोलतो, यांतील एक अक्षराक्षरहि आम्हांला कळत नसे.

याउप्पर, आमच्या गांवांत कुणींहि त्याला कुणाशीं लटाव्हिअन बोलायला म्हणून मोठ्या प्रेमानें बोलावलें तरी पाठवायचें नाहीं, असें मीं मनांत ठरविलें. कारण जेव्हां जेव्हां तो गेला तेव्हां तेव्हां मागल्याच प्रसंगाची पुनरावृत्ति झाली. तो काय म्हणे, हें त्यांना कळत नसे. ते काय म्हणतात, हें ह्याला कळत नसे. त्यामुळें बरें वाटायच्या ऐवजीं, एकदोन दिवस तो फारच खिन्न होई. या अनुभवांनीं व त्याच्या मनःस्थितीकडे पाहतां लटाव्हियनपेक्षां त्याला इंग्रजीच बरें म्हणून मी कोणाकडेहि पाठवीत नाहींशी झालें.

टिंचीजवळ कातड्याची एक छान फॅन्सी लांडी विजार होती. ती त्याला फार आवडे. जर्मनीमध्यें तो असतांना बहुधा त्याला ती मिळाली असावी. एवढें खरें कीं, त्याला ती फार आवडे. आपण त्यांत 'हैडी' (Heidi) गोष्टींतील आल्प्स पर्वतावर राहणाऱ्या पीटरप्रमाणें दिसतों, अशी त्याची समजूत होती. (पीटर हा एक धनगराचा मुलगा होता.)

अमेरिकेंत आल्यावर त्याची ही लांडी विजार कशी आणि कुणीं कुणाला दिली, हें कळलें नाहीं. पण एवढें खरें कीं ती गेली. आणि तें टिंचीला नेहमींच जाणवत राहिलें. तो नेहमीं म्हणे, "गेली कसली? चोरली कुणींतरी." ती वापरून वापरून फाटून गेली असेल, अशी नुसती कल्पनासुद्धां केलेली त्याला आवडत नसे. "अशा विजारी कधीं फाटतच नाहींत," तो जोराजोरानें मला सांगूं लागे.

पुढें एकदां मीं कातड्याची खरीखुरी बव्हेरियन पॅन्ट पाहिल्यावर मला त्याचें म्हणणें पटलें. खरोखरीच ती विजार फाटणें शक्य नव्हतें. सारा जन्म गेली असती ती. शिवाय अशा विजारी धुवायच्या मुळीं नसतातच. त्या धुणें म्हणजे बायकी समजलें जातें. त्या तशाच वापरायच्या. म्हणजे वापरून वापरून त्यांवर एक प्रकारें कांति चढते व त्या मऊ होतात.

त्या जर्मन लांड्या विजारीबद्दल टिंचीची आवड इतकी कायम राहिली होती कीं, त्यामुळें तो इतर अमेरिकन मुलांप्रमाणें लांब विजारी घालायला तो साफ कबूल नसे. अमेरिकेंत तर, बालवीरसुद्धां आतांशा लांब विजारी वापरूं लागल्यामुळें त्याच्या मापाच्या लांड्या विजारी मिळणें मोठें मुष्किल होई. मिळाल्या तरी त्या फार लहान असत. तरीसुद्धां टिंचीला त्याच्या त्या कातड्याच्या विजारीची आठवण झाली, किंवा जरा तो अस्वस्थ झाला, कीं तशीच आंखूड विजार घालून तो खुशाल शाळेंत जाई. या विजारी अर्थात् साध्या कापडाच्या असत. तरीसुद्धां त्या धुवायला घ्यायचें म्हटलें, तर तो आम्हांला हात लावूं देत नसे. 'धुवा तर

खरी, मी घालणार नाहीं कधीं' असें म्हणून निजल्यावर आम्हीं धुवायला घेऊं नये म्हणून तो ती घालूनच निजे. त्यामुळें विजारी भारी मळकट दिसूं लागल्या. ती मळकी आंखूड विजार घालून तो शाळेंत गेला कीं, तो परक्या देशांतला मुलगा म्हणून कुणीहि सहज ओळखावें, इतका तो निराळा दिसे. पण एवढें खरें कीं, त्याला तो तसाच पोषाक आवडे. त्यांतच त्याला एक प्रकारें सुरक्षित वाटे.

हळूहळू आमच्या मुलांच्या निळ्या जीनचा पोषाक त्याला आवडूं लागला. आपखुषीनें तो पोषाक कांहीं दिवस घालूं लागल्यावर, लांब पाटलोणी घालायला पण त्यानें होऊनच सुरवात केली. तरीसुद्धां त्याला त्याच्या कातड्याच्या लांड्या विजारीची मधून मधून आठवण होई व वाईट वाटे. वास्तविक, कातड्याच्या विजारीच्या या गोष्टीला चार वर्षे लोटलीं होतीं. तरीसुद्धां, कांहीं एक न सांगतां त्याची ती विजार कुणीं घेतली याबद्दलचा त्याचा राग गेला नव्हता. आठवण आली कीं लगेच तो तावातावानें बोलूं लागे. पहिले कांहीं दिवस तर तिची आठवण झाली रे झाली कीं तो भडकूनच जाई व त्या भरांत निदान त्या दिवसापुरतें तरी त्याचें इंग्रजी पार खलास होई.

कशानें कां होईना, टिंचीचें मन अस्वस्थ झालें, त्याच्या भावना दुखावल्या, कीं त्याचें इंग्रजी पार लटपटूं लागे. अशा वेळीं तो जें इंग्रजी बोले तें आम्हांला कळतहि नसे. त्यांतून ताळ्यावर येऊन नीट समजेलसें बोलूं लागायला, कांहीं दिवसच लोटावे लागत. भावनांनीं खळबळून तो असा अस्वस्थ झाला, विशेषतः युद्धकाळांतल्या आठवणींनीं तो खिन्न झाला, कीं तो तीन चड्डया चढवून बसे. किंबहुना तशा मनःस्थितीची ती एक खूणच होऊन बसली होती.

टिंची पहिल्यानें जेव्हां माझ्या शाळेंत आला त्यावेळीं त्याला ठेवलेल्या घरून आम्हांला असें कळविण्यांत आलें होतें कीं, "तो तीन शर्ट व तीन चड्डया घालून शाळेला येत असतो, त्यामुळें त्याला उकडण्याचा संभव आहे. पण तो काढूं देत नसल्यानें, इलाज नाहीं." निर्वासितांच्या छावणींत त्याला ही संवय लागली असावी. पण गंमत ही कीं, जेव्हां म्हणून अमेरिका त्याला नकोशी वाटे, तेव्हां लगेच ती संवय जोर करून उठे.

महायुद्ध चालूं असतां जळण नसल्यानें युरोपांत कडाक्याची थंडी असे तेव्हां हें ठीक होतें. पण अमेरिकेंत लढाई नसल्यानें खोल्या चांगल्याच ऊबदार केलेल्या असतात. आतां असे कपडे चढवून काय उपयोग? असें आम्हीं त्याला कितीकदां समजून सांगण्याचा प्रयत्न केला. पण व्यर्थ. तीन चड्डयांच्या बाबतींत

तर, एकाद्या कासवाला त्याचें कवच फेंकून द्यायला सांगण्याइतकाच आमच्या ह्या सांगण्याचा उपयोग होई. टिंची आमच्या घरांत जसजसा रुळूं लागला तशी त्यानें ती संवय आपोआप सोडून दिली. तरीहि एकादे वेळीं त्याला एकटें वाटूं लागलें कीं, तो फिरून त्या तितक्या चड्डया चढवून बसे.

त्याचें हें करणें बहुधा ट्रोचाच्या लक्षांत येई. तें पाहिलें कीं, "आज तीन चड्डया चढल्या आहेत, सावध राहा," असें म्हणून ती आम्हांला धोक्याची सूचना देत असे.

मनाच्या एका विशिष्टावस्थेंत तो हें इतकें आपोआप करी कीं, ट्रोचानें त्या चड्डयांचें नांव 'मनोमानदर्शक चड्डया' असेंच ठेवलें होतें. बाकीचा आक्रस्ताळी-पणा जाऊन केवळ चड्डया घालण्यावरच त्याच्या रागाचें भागूं लागल्यानें आम्हीं तिकडे फारसें लक्षहि दिलें नाहीं.

अशा मनःस्थितींत त्याला पुरेशा चड्डया सांपडल्या नाहींत तर तो लटाव्हिअन भाषेचा आश्रय घेई. इंग्रजी शिकण्याकरतां तो खूप मेहनत घेई हें खरें; तथापि त्याला मनापासून ती भाषा शिकायला नको असे. त्यामुळेंच मेहनत घ्यावी लागे. अजूनहि तो आपल्या 'शिपायाशीं' 'गुपित भाषेंत' बोले. नव्हे त्याला तसेंच बोलायला आवडे, कारण तें आम्हांला कळत नसे. कधीं कधीं, रागावला कीं तो अजिबात इंग्रजी बोलायचें सोडून देई. आपल्या खोलींत जाऊन दार लावून घेऊन, स्वतःशींच लटाव्हिअनमध्यें कांहींतरी बडबडत असे. अखेरीला आम्ही दार उघडलें कीं, स्वारी खेळांतली बंदूक घेऊन, जमिनीवर सरळ पालथें पडून, आपल्या भाषेंत कांहींतरी बडबडे. "मी तुम्हां सगळ्यांना बंदुकीनें ठार करणार आहे," असाच त्याचा आशय असला पाहिजे. एकाद्या लहान मुलानें असें केलें, तर तो खेळ म्हणून होईल. पण या निर्वासितांच्या बाबतींत मात्र हा खेळ नव्हता. एक जबरदस्त सुप्त इच्छा त्याच्यामागें वावरत होती.

अखेरीला तो नीट ताळ्यावर आला कीं त्याचें इंग्रजी परत येई. पण त्यामुळें त्याची इंग्रजींतील प्रगति इतकी थंडपणें होत राहिली कीं आतां त्याला इंग्रजी कितपत येतें आहे असें कोणीं विचारलें कीं ट्रोचा म्हणे, "त्याचें इंग्रजी नसलें तरी आमचें लटाव्हिअन मात्र बरेंच सुधारतें आहे."

यांतील थट्टा सोडली तर एवढें म्हणतां येईल कीं, त्याचें इंग्रजी सुधारूं लागलें होतें, यांत बिलकुल शंका नाहीं. विशेषतः तो आमच्यांत घरांत जसजसा मन-मोकळेपणानें वावरूं लागला व त्याला घराबद्दल आपलेपणा वाटूं लागला तसतशी

ही प्रगति जास्त लक्षांत येऊं लागली. कधीं कधीं तर, बोलतांना, एकदम पक्की, अमेरिकन बोलभाषा वापरून तो आम्हांला चकितच करून सोडी. एक दिवस त्याच्याबरोबर ट्रोचा 'एक जिग्साच्या तारेचें कोडें' उकलून बसवीत असतांना एक तुकडा तिनें अगदीं बरोबर नसला तरी जवळ जवळ बसला. लगेच तिची चूक सुधारीत, टिंची पक्क्या अमेरिकन बोलींत म्हणतो :

"Close but no cigarr"

आम्ही तर तें बोलणें ऐकून हसतच सुटलों आणि टाळ्या वाजवल्या. त्यामुळें त्यालाहि मूठभर मांस चढल्यासारखें झालें.

नवशिक्याला कोणत्याहि भाषेची खरी बोलभाषा शिकायची म्हणजे मोठें फसवें काम असतें. शिवाय तें जडहि जातें. टिंचीच्या बोलण्यांत असेंच होई. वेड्यावाकड्या स्वरूपांत ते वाक्प्रचार बाहेर पडत.

एक दिवस अशीच मजा झाली. आमचा चार्ली नांवाचा एक नातेवाईक मुलगा एक 'पश्चिमप्रदेशाचा चित्रपट' (a Western film) पाहायला गेला, त्याबद्दल टिंची सांगत होता. सांगतां सांगतां तो म्हणाला कीं "He got kicked out of the Movie."

चार्ली इतकें वाईट वागला कीं काय कीं त्याला थिएटरमधून काढायची पाळी यावी! हें ऐकून आम्हांला आश्चर्य तर वाटलेंच, पण बरेंहि वाटलें नाहीं. तो असा किती वाईट वागला असेल कीं ज्यामुळें थिएटरच्या माणसांनीं त्याला ओढून बाहेर काढला याची कल्पना करून आम्ही आपसांत बोलूं लागलों.

लागलीच टिंची म्हणतो, "तो नाहीं कांहीं वाईट वागला."

"पण तूं आतांच म्हणालास ना त्याला बाहेर काढून दिलें म्हणून?"

"काढून नाहीं दिलें "kicked out." टिंचीनें उत्तर केलें.

"वा. मग तर जास्तच शरमेची गोष्ट" ट्रोचा हसूं लागली. अखेर आम्हांला कळलें कीं चार्लीला लाथ मारून बाहेर काढण्यांत आलें असें त्याला सांगावयाचें नसून चार्लीला त्या पिक्चरची मोठी मजा वाटली (Charlie got a kick out of the Movie) असें सांगायचें होतें. 'kick' शब्दामुळें हा एवढा गोंधळ माजला.

आम्ही पोट धरधरून हसलों; पण परकी भाषेचा अडसर ओलांडून आमच्यापर्यंत यायचें म्हणजे टिंचीला किती त्रास पडतो, त्याचा किती गोंधळ उडतो, याची आम्हांला त्या दिवशीं पुरी कल्पना आली.

आमच्या विशिष्ट वाक्प्रचारांनीं त्याचा असाच गोंधळ उडे. एक दिवस शाळेंतून अगदीं निराश होत्साता तो घरीं आला व मला म्हणाला, "आज घरीं करायला दिलेला इंग्रजीचा अभ्यास कसा करायचा हें मला कळतच नाहीं. मी करीतच नाहीं म्हणून."

"काय करायचें आहे तुला?" मीं विचारलें.

"तेंच तर मला कळत नाहीं. कांहीं तरी करायचें आहे आणि तें सहा फूट असलें पाहिजे." असें बाईनीं सांगितलें आहे.

शेवटीं 'kick' प्रसंगांतल्या चार्लीला मीं फोन केला आणि मास्तरांनीं काय लिहावयाला सांगितलें आहे म्हणून विचारलें. "आम्हांला बाईनीं एक चांगली मोठी—'tall'—गोष्ट लिहून आणायला सांगितली आहे. आम्ही पॉल बनियनची गोष्ट वर्गांत वाचीत होतों ना, तशी उच्च असली पाहिजे ती गोष्ट." त्यानें मला सांगितलें.

मीं टिंचीला हें समजावून सांगितल्यावर तो उद्गारला, "अस्सं होय. मग पॉल बनियनसारखी गोष्ट ल्याह्यची असें कां नाहीं सांगितलें? त्या म्हणाल्या 'tall' गोष्ट लिहा. आतां सहा फूट उंचीचा माणूस असला म्हणजे 'टॉल' म्हणतात. मग गोष्ट 'टॉल' करायला तेवढीच पाहिजे. मला तर प्रश्नच पडला ही सहा-फुटी गोष्ट कशी ल्याह्यची. त्याला एवढा मोठा कागद कुठून आणायचा? कांहींच मुळीं कळेना मला."

हळूहळू तो बरेंच शुद्ध बोलूं लागला. जनावराच्या बाबतींत which वापरायचें हें त्याला कळूं लागलें. ती आणि तिचा, तिची, तिचें, इ. वापरतांना होणारी त्याची गल्लत मात्र बरेच दिवस राहिली. तो 'ती' व 'तिला' म्हणायच्या ऐवजीं नेहमीं 'तो' व 'त्याला' असेंच वापरायचा. आम्ही 'तो' सुधारून 'ती' केलें तरी फिरून कांहीं वेळानें 'तो' ची भाषा सुरू व्हायची. पण जरा कांहीं झालें कीं, तावडितोब तो बोलेनासा होत असल्यानें आम्ही पण वारंवार चुका दाखवून त्याला खजील करायचें टाळीत असूं. आमची ही युक्ति बरीच सफल झाली. त्याच्या मनांत कोणताहि खटका उत्पन्न न होतां त्याचें इंग्रजी हळूहळू सुधारूं लागलें. एक दिवस दुपारीं, धावतच स्वारी घरीं येऊन, बाई असें म्हणाल्या वगैरे सांगत स्त्रीलिंगाचा उपयोग बरोबर करून बोलूं लागली, "आतां मला नीट कळलें 'तो' नव्हे 'ती' 'ती' 'ती'. आतां कसं मी बोलतों इंग्रजी?" असें म्हणून त्यानें मोठ्या अभिमानानें माझ्याकडे पाहिलें. शाबासकीदाखल त्याची पाठ

ठोकूनच आम्हीं उत्तर दिलें.

'ती', 'तिला', 'तिचा' वगैरे शब्द स्त्रीलिंगी व्यक्तीसंबंधीं वापरायचें हें एकदां त्याच्या लक्षांत आल्यावर तो लक्षपूर्वक त्यांचा बिनचूक उपयोग करण्याचा प्रयत्न करूं लागला.

पण यासंबंधांत इंग्रजी भाषा त्याला कधीं कधीं दगा देई. त्यामुळें इंग्रजीऐवजीं नकळत फ्रेंच भाषेसारखा तो उपयोग करी.

एकदां तो सांगूं लागला, "एक शाळेंतला मुलगा आणि तिची आई. यांनीं त्याला..."

"कुणाची आई?"

"तिची आई."

"पण तूं मुलासंबंधीं सांगत होतास ना?"

"होच मुळीं. म्हणून तर तिची म्हणतों. कारण मी आईसंबंधीं बोलतों आहें. आई स्त्रीलिंगी ना म्हणून तिची म्हटलें."

"म्हणजे तुला मुलाची आई म्हणायचें का?"

"हो तिची आई."

"पण मुलगा पुल्लिंगी ना म्हणून त्याची आई म्हणायचें."

"पण आई 'ती' आहे ना—'तिला' 'त्याची' कसें लावायचें?"

मला कां तें सांगतां येईना. अखेर हरून मी थांबलें. मग टिंचीनें स्वतःच आंतरराष्ट्रीय तत्त्वावर आपलें व्याकरण सुधारलें.

"त्या मुलाला एक आई आहे. आणि ही आई असें म्हणते."

"बघ आतां कसें छान बरोबर सुधारलें." मोठ्या आनंदानें त्यानें मला सांगितलें.

मी अंथरुणें घालूं लागलें कीं टिंची मला नेहमीं मदत करायचा. स्वतःचा बिछाना तोच सकाळीं नीट करी व संध्याकाळीं घाली. चादरींचे कोपरे अगदीं हॉस्पिटलप्रमाणें बरोबर आंत घालायला तो कधींच चुकत नसे. एके दिवशीं शनिवारीं मीं त्याला म्हटलें:

"टिंची, तूं मला नेहमीं मदत करतोस म्हणून आज सकाळीं मी तुझा बिछाना नीट करीत होतें, नी पाहतें तों आंथरुणावर किती तरी खिळे. तुला कुठें ठेवायचे होते ते?"

"माझ्या नी आंथरुणांत खिळे? कसें काय बुवा."

"मला तरी काय ठाऊक ! तुझ्या हत्यारांच्या पेटींतून तर नाहीं पडले !"

त्याला कांहीं कळेना. एक खिळा हातांत उचलून घेऊन गोंधळूनच तो त्याच्याकडे पाहूं लागला.

"छे, हा तर माझ्या ओळखीचा नाहीं दिसत!"

"'ओळखीचा'! आज नवीन शब्द वापरलास तर!" आम्हीं शाबासकी दिली. त्याला फारच आनंद झाला.

"माझ्या ओळखीचा" फिरून त्यानें ओळख शब्द वापरला. "खरंच कुठून आले खिळे कोण जाणे."

आम्ही त्याला प्रत्येक नव्या शब्दाबद्दल शाबासकी देऊं लागलों. पण तें कांहीं त्याला फारसें पसंत पडलें नाहीं.

"मी इंग्रजी फार चांगला बोलत नाहीं" त्यानें उद्गार काढले.

खरं सांगायचं तर आमच्या इंग्रजीचा त्याच्यावर परिणाम होण्यापेक्षां आमच्याच इंग्रजीवर त्याच्या इंग्रजीचा परिणाम होऊं लागला होता.

ट्रोचाशीं बोलतांना आमचीं लहान नातेवाईक मुलें चटकन टिंचीसारखें बोलूं लागत. त्याचे ते चमत्कारिक वाक्प्रचार वापरीत. एक दिवस ट्रोचानें चार्लीला समुद्रकिनाऱ्यावर छत्री न्यायला सांगितलें असतां त्यानें सरळ टिंचीप्रमाणें इंग्रजीची जर्मन वाक्यरचना करून उत्तर दिलें.

अजूनहि टिंची आपल्या भाषेला धरून होता. पुष्कळ वेळां स्वतःच्या खोलींत जाऊन घट्ट दार बंद करून तो त्या भाषेंत बोलत बसे. दिवसेंदिवस तो जसजसा आमच्याशीं मनमोकळा वागूं लागला तसतशी आमची भाषा पण त्यानें घेतली. या मनमोकळेपणाबरोबर तो आपल्या खोलीचें दार दिवसां, रात्रीं, आतां सताड उघडें ठेवूं लागला. आम्हांला हा बदल पाहून फारच मजा वाटली.

यानंतर एक दिवस एक चमत्कारिक गोष्ट घडली. तिचा टिंचीच्या मनावर फारच परिणाम झाला.

जसजसे त्याला अधिकाधिक इंग्रजी शब्द येऊं लागले, तों तों लटाव्हिअन शब्द तो विसरूं लागला. आणि अखेर तर त्याला कांहींच आठवेना.

दुपारच्या जेवणाची वेळ होती. नेहमींप्रमाणें तो देवाची प्रार्थना करायला उठला. तो ही प्रार्थना नेहमीं लटाव्हिअनमध्यें म्हणे. पण त्या दिवशीं त्याला एक शब्दहि आठवेना.

"असें काय झालें मला?" अगदीं हिरमुसला होऊन तो बोलूं लागला. मी

स्वतःची भाषाच विसरलों कीं काय? डोकें तर नाहीं फिरलें माझें?" असें म्हणून विस्मित होऊन तो शब्द आठवूं लागला.

धीर देण्याकरितां, 'पोल्डस' 'पोल्डस' इ., मी नेहमीं ऐकत असलेल्या शब्दांची त्याला आठवण करून दिली.

"हें काय? तुला कशी माझी भाषा यायला लागली?"

"नाहीं रे, पण तूं नेहमीं म्हणतोस, तें ऐकतें ना. म्हणून आठवण करून दिली. आतां म्हण."

'पोल्डस पोल्डस' त्यानें म्हणायला सुरवात केली पण पुढें कांहीं केल्या शब्दच आठवेनात. तो अगदीं कावराबावरा झाला.

कोणतीहि नवी भाषा आत्मसात् होण्यापूर्वी जुनी विसरली जायची म्हणजे कठिणच होतें. धड ना ही भाषा, धड ना ती. एखाद्या मुक्या-बहिऱ्यासारखीच त्याची अवस्था झाली.

"मला नाहीं विचार करतां येत. शब्दच नाहींत मला." तो कळवळून रडूं लागला.

त्या दिवशीं आपण शब्दांचें माध्यम घेऊन कसा विचार करीत असतों, हें माझ्या लक्षांत आलें. त्याला कोणतेंच शब्द येत नसल्यानें त्याची अगदीं स्वतः हरवल्यासारखी स्थिति झाली होती. या नुसत्या कल्पनेनेंच तो बेचैन होऊन ओरडूं लागला.

स्वतःची भाषा हरपण्यासारखी दुसरी गोष्ट नाहीं. त्यामुळें, फिरून त्याच्या वागणुकीचें गाडें मूळ पदावर जातें कीं काय, अशी आम्हांला भीति वाटूं लागली. मानसिक वैफल्यामुळें आक्रस्ताळीपणा येत असेल, तर स्वतःची भाषा हरपून शब्दहीन होणें, यापेक्षां दुसरें अधिक वैफल्य तें कोणतें!

या त्याच्या मनःस्थितींत त्याला नेहमीं भेट देणाऱ्या त्या वेलफ़ेअर-वर्कर बाईची भेट फारच उपयुक्त ठरली. त्याला धीर आला.

"हात्तिच्या! त्यांत रे काय? सगळींच लटाव्हिअन मुलं आपली भाषा विसरूं लागलीं आहेत. त्यांतलाच तूं. दुसरी भाषा येण्यापूर्वी पहिली विसरल्यामुळें जरा जड जातं खरं. पण एवढं मात्र कबूल करायला हवं अं." ती आंद्रिसकडे पाहून धीर देण्याच्या दृष्टीनें म्हणाली, "त्याच्याबरोबर आलेल्या सर्व मुलांपेक्षां आंद्रिस कितीतरी छान इंग्रजी बोलतो." तिच्या त्या उद्गारांनीं टिंचीला बराच धीर आला व त्याचें मन अभिमानानें अगदीं फुलून गेलें. "सगळींच मुलें स्वतःची

भाषा विसरलीं आहेत. पण त्यांना कांहीं माझ्याइतपत नाहीं इंग्रजी येत. मी त्यांच्यापेक्षां कितीतरी चांगलें बोलतों." त्यानें प्रौढीनें सांगायला सुरवात केली.

नंतर त्या बाईनीं मला सांगितलें कीं, अनाथ पोरकीं म्हणून जीं मुलें आलीं तीं सगळींच आपली भाषा विसरत आहेत. मात्र जीं मुलें आपल्या कुटुंबाबरोबर आलीं, तीं घरीं लटाव्हिअन बोलतात, पण बाहेर इंग्रजी. तीं पटकन् इंग्रजी शिकलीं. अमेरिकन कुटुंबांतून सांभाळायला दिलेल्या अनाथ मुलांना मात्र लटाव्हिअन कुठेंच कानांवर पडेनासें झालें, त्यामुळें तीं लटाव्हिअन तर विसरलींच, पण इंग्रजी येण्याच्या बाबतींत मात्र तीं फार मागें पडल्यानें कांहीं काळ तरी मुक्या मनुष्यासारखी त्यांची स्थिति होत राहिली. अर्थात्, कालांतरानें तीं सुधारतील, तशी काळजी करण्याचें कांहींच कारण नाहीं. अशा रीतीनें धीर देऊन ती गेली.

एका वर्षानें एके दिवशीं हळूच तिनें मला सांगितलें कीं, इतरांच्या मानानें आंद्रिस इंग्रजींत खरोखर बराच मागें होता. पण जेव्हां पाहिजे तेव्हां त्याला धीर दिल्यानें आतां त्याचें महत्त्व उरलें नव्हतें. या दिवसानंतर त्याची चमत्कारिक वाक्यरचना, ती बसकी, जाडी, बोलण्याची पद्धत कायम राहिली तरी त्याचें त्याला कांहीं वाटेनासें होऊन तो खुशाल बडबड करी.

कां कोण जाणे, टिंचीला वाचायचा मोठा कंटाळा. त्याला इंग्रजी चांगलें बोलतां येत नसल्यानें वाचनांत त्याचें मन रमत नसे असें म्हणावें, तर तसेंहि म्हणतां येत नव्हतें. यापूर्वी तो जेव्हां माझ्या खासगी शाळेंत आला तेव्हां त्याला इंग्रजी कुठें येत होतें ! तरी त्या वेळीं सुद्धां नवीन शिकलेला शब्द वाचायला तो उत्सुक असे व वाचनाचा चांगलाच प्रयत्न करी. पण आतां स्वतः तर बिलकुल वाचीत नसेच, पण कुणी घरीं त्याला शिकवायला लागलें तर चक्क नाहीं म्हणून सांगून, 'घर, शिकायची जागा नव्हे' 'मुलें नाहीं घरीं करत अभ्यास' असें सांगून खुश्शाल मोकळा होई.

यामुळें इलाजच उरला नाहीं. त्याच्याविषयीं आपलेपणा वाटणाऱ्या एका शिक्षिकेनें शाळेंतल्या आपल्या मोकळ्या तासांत रोज याचा थोडथोडा अभ्यास करून घ्यायचें ठरविलें. तो मारून मुटकून अभ्यास करी. पण वाचायची वेळ आली कीं, प्रयत्नच करीत नसे. त्यामुळें शिकवूनहि वाचनांत त्याची प्रगति होईना.

टिंचीला आतां बारा वर्षें पुरीं झालीं होतीं. आणि त्याची त्याला सुद्धां तो शाळेंत फार मागें आहे याची जाणीव झाली होती. "पण काय करायचें ! मी मुळीं मूकस्तंभासारखाच आहे. प्रयत्न करूनसुद्धां उपयोगी नाहीं" असें तो उलट

आम्हांलाच सांगे.

त्याला वाचनाची आवड उत्पन्न व्हावी म्हणून कांहीं 'कॉमिक्स' विकत घ्यायला त्याला मी सांगत असें. पण अशीं पुस्तकें घेतलीं नी चित्र पाहिलें कीं, लगेच त्याला गोष्ट कळे. पुढें पुढें त्याला त्यांतहि गंमत वाटेनाशी झाली. 'फारच वेड्यासारखीं तीं पुस्तकें असतात' त्यानें एकदां आपलें मत सांगितलें. इतर मुलांचीं तसलीं पुस्तकें दिसलीं तर तो चित्रें पाहत असे, पण स्वतःचे पैसे खर्चून मात्र त्यानें कधींहि तीं विकत घेतलीं नाहींत.

यानंतर एक दिवस त्यानें नेहमींपेक्षां अगदीं निराळींच एक गोष्ट केल्याचें माझ्या लक्षांत आलें.

आमच्या वाण्याच्या दुकानांत, धान्य, कांदे, कॉलर्स, इ. साऱ्या मालाबरोबर तो कांहीं पुस्तकेंहि ठेवी. त्यांत एक अगदीं स्वस्त एन्सायक्लोपीडियाच्या प्रती पण त्यानें ठेवल्या होत्या. टिंचीनें आपल्या पैशांतून तीं पुस्तकें विकत घ्यायला सुरवात केली.

दर आठवड्याला त्याला हात-खर्चाला जो डॉलर मिळे त्यांतून एकोणऐंशीं सेंटचा एक नवा भाग दर सोमवारीं त्याच्या खोलींत दिसूं लागला.

एन्सायक्लोपीडिआचे एकंदर पंधरा भाग होते ते सर्व त्यानें वरीलप्रमाणें विकत घेतले.

"टिंची, तुला वाचतां येत नाहीं आणि प्रयत्न करायला सुद्धां तूं नाखूष असतोस, मग हीं पुस्तकें विकत तरी कशाला घेतलींस? काय करणार आहेस त्यांचें?" आम्हीं त्याला विचारलें.

"वाः, पुस्तकें जवळ असणें चांगलें असतें. कुणी सांगावें, एक दिवस हीं पुस्तकें मला वाचतांहि येतील. नाहीं म्हणून कशावरून?" त्यानें रुबाबांतच उत्तर दिलें.

दर आठवड्याला पुस्तक आणलें कीं मोठ्या आशेनें तो पानें चाळी व वाचतां येतें कीं नाहीं तें पाही.

"अंहं, अजून नाहीं." म्हणून त्याला पुस्तक मिटावें लागे. दुसऱ्या आठवड्याला फिरून तोच क्रम. फिरून तो पुस्तक उघडी, फिरून वाचायचा प्रयत्न करी, पण येत नाहीं म्हणून त्याला तें ठेवून द्यावें लागे.

एक असा सोन्याचा दिवस येईल कीं, त्या दिवशीं आपण हीं पुस्तकें उघडलीं कीं आपल्याला घडघड वाचतां येईल. अशी जणुं त्याची खात्रीच होती, म्हटलें

तरी चालेल. सोपीं-सोपीं लहान-लहान पुस्तकें, सुंदरशीं भरपूर चित्रें असलेलीं चौथीचीं पाठ्य पुस्तकें, त्याला बिलकुल आवडत नसत.

'काय लहान पोरांचीं पुस्तकें आहेत हीं!' तो किंचित अवहेलनेनेंच त्यांच्याकडे बोट दाखवी.

एक दिवस त्याची आशा सफल होणार असें वाटण्याजोगा खरोखरच एक प्रसंग घडला. एकदम पाहिलें कीं, विचार न करतां वाचतां यावें असें त्याला वाटे. आणि तसेंच झालें.

एका शनिवारीं, हिवाळ्यानें शेवटलीं पानें खुडून जाण्यापूर्वी एकदां त्यांची शोभा पाहावी म्हणून मोटरनें आम्ही बाहेर फिरायला गेलों. तेथल्या एकंदर वनश्रीचा टिंचीच्या मनावर चांगलाच परिणाम झाला. तो मोठ्या उत्साहानें इकडे तिकडे पाहत होता. इतक्यांत 'टर्र्रकी सँडविचेस साठ सेंटना' एका ठिकाणीं लावलेली पाटी त्याच्या दृष्टीस पडली व कांहीं एक विचार करावा न लागतां, त्यानें ती ताबडतोब वाचली.

वाचतांक्षणीं एक क्षण तो स्वतःच आश्चर्यचकित झाला. "ए, कांहीं विचार न करतां मी आत्तां वाचूं शकलों. पाटी पाहिली तो लगेच आपोआप माझ्या तोंडून शब्द बाहेर पडले. काय भीति वाटलीय मला."

चांगलें वाचतां येत नसल्यानें सगळ्याच अभ्यासांत त्याला एक प्रकारची अडचण येई. त्यानें तो फारच अडल्यासारखा झाला. बरें, घरीं आम्ही मदत करूं म्हटलें तर त्याला तो बिल्कुल तयार नव्हता. त्यामुळें वर्गांत तो चांगलाच मागें पडूं लागला. हा कमीपणा शक्य तों मारामाऱ्या, दांडगाई करून भरून काढण्याकडे त्याची प्रवृत्ति वाढूं लागली.

त्याचा परिणाम असा झाला कीं रोज तो कुणाबरोबर तरी लढे. वर्गांत, शाळेच्या हॉलमध्यें, जिमखान्यावर, रस्त्यांत, त्याची कुणाबरोबर मारामारी झाली नाहीं असा दिवस विरळा. रोज स्वारी घरीं येई ती मार खाऊन. या मारामारींत तो विजयी झाला असता तर कदाचित् काहीं काळानें त्यानें मारामारी करायचें सोडलें असतें. पण तें समाधान कधीं त्याला मिळतच नव्हतें. रोज घरीं येई व प्रामाणिकपणें मला आज किती मारामाऱ्या केल्या याचा हिशोब देई. "आज दोन मारामाऱ्या. नाकांतून रक्त आलें" असें तो सांगे.

'असें करणें बरें नव्हे' असें त्याला नीट समजावून सांगण्याचा मीं किती प्रयत्न केला, पण ज्याचें नांव तें. तो कांहींच ऐकेना. अखेर एक दिवस कंटाळून

त्याला मीं म्हटलें कीं, "रोज रोज तर तुझी लढत आहेच. मग एक दिवस जिंकलास तर काय होईल ? रोज काय मार खातोस, एकदां दे कीं चांगला."

खरं म्हणजे मी असं बोलायला नको होतें. कारण दुसऱ्याच दिवशीं 'आज बघ त्या पोराला ठारच करतों' असें म्हणून आपली जर्मन सुरी त्यानें शाळेंत जावयाच्या वेळीं बरोबर घेतली.

ती पाहतांच मी अगदीं घाबरूनच गेलें. कितीतरी प्रयासानंतर त्यानें ती सुरी घरीं ठेवली व त्या मुलाबरोबर लढणार नाहीं असें मला वचन दिलें, तेव्हां मला सुटका झाल्यासारखें वाटलें.

एकदां वचन दिलें कीं, तो तें कधीं मोडणार नाहीं एवढी मात्र टिंचीबद्दल मला पुरी खात्री होती. वचन द्यायचें म्हटलें कीं, शक्य तों टाळी. पण एकदां दिलें कीं, मग पाळण्याबद्दल शंकाच नको बाळगायला. असा त्याचा स्वभाव होता. त्यामुळें कबूल केल्याप्रमाणें तो त्या मुलाशीं लढला नाहीं. "पण आज दुसऱ्याच एका मुलाची नी माझी मारामारी झाली." शाळेंतून आल्याबरोबर अत्यंत प्रामाणिकपणें त्यानें मला सांगितलें. मी रागावलें व कां म्हणून प्रश्न केला.

"टिंची, पण आज तूं मारामारी सुरू करूं नकोस म्हणून मीं तुला बजावलें होतें ना?"

"अग पण मीं कुठें सुरू केली? एका मुलानें चिखलांतील पाण्यांत आपला पाय फसकन् घातला नी मुद्दाम माझ्या डोळ्यांत चिखल उडवला आणि वर म्हणतो चल, लढायचें आहे? तेव्हां मी काय करणार! मी लढलों. सांग माझा दोष आहे का?"

"अरे, पण असें रोज मारामारी करणें बरें नाहीं, असें मीं तुला सांगितलें होतें ना! तुम्हांला युद्ध नको असून शांति पाहिजे असेल तर आधीं क्रीडांगणांवरच्या मारामाऱ्या बंद केल्या पाहिजेत. तिथें नीट वागायला शिकायला पाहिजे."

"अं एवढंच ना. आतां आमचं कुठं भांडण राह्यलं आहे? नववींतल्या एका मोठ्या मुलानें आमची मारामारी झाल्यावर आम्हांला हस्तांदोलन करायला लावलं. संपलं आतां भांडण. बाकी इथें मोठी गंमतच आहे! आधीं लढायचें नी मग हस्तांदोलन करायचें. मीं नव्हतें असें पाह्यलें कुठें. पण आतां आम्हीं हस्तांदोलन केलंय. मित्र झालों आहों आम्ही."

त्यानंतर कांहीं दिवस तरी त्यानें मारामारी केली नाहीं. पण फिरून स्वारी मूळ पदावर आली. शिवाय वर्गांत तर दिवसेंदिवस तो फारच चमत्कारिक

रीतीनें वागूं लागला.

अखेर एक दिवस मीं त्याच्या बाईना सुचविलें कीं, रोजच्या रोज याच्या वर्गातील वागणुकीच्या अहवालाची चिठ्ठी तरी माझ्याकडे पाठवा. पाहूं, त्यानें कांहीं झालें तर. या चिठ्ठयांचा इष्ट तो परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. रोज चांगली चिठ्ठी आणण्यांत टिंचीला अभिमान वाटूं लागला. मलाहि पुढीलप्रमाणें चिठ्ठया मिळत राहिल्या.

"आज फारच चांगली."

"चांगली वागणूक होती आज."

"चांगला सहकार्यानें वागला."

त्याला चिठ्ठीवरील अवघड शब्द समजत नसत पण चांगला हा शब्द त्याला पक्का कळे आणि तो पाहिला कीं तो खूष होई.

असें होतां होतां, एक दिवस टिंची घरीं आला तो चिठ्ठीशिवाय. आज बहुधा वाईट निरोप असावा म्हणून त्यानें चिठ्ठी लपवून ठेवली, अशी मला शंका आली. मीं त्याला परोपरीनें सांगून पाहिलें. तरी जेव्हां तो चिठ्ठी देईना, तेव्हां मात्र मला राग आला. आणि चांगल्याच खड्या आवाजांत मीं त्याला सुनवायला सुरवात केली.

"शूः थांब कीं, किती बडबड! मला नाहीं आवडत. ही घे चिठ्ठी! झालें समाधान?" असें म्हणून त्याच्या विजारीच्या मागल्या खिशांतून चिठ्ठी काढून त्यानें माझ्यासमोर धरली.

"कुणास ठाऊक आज काय चिठ्ठींत लिहिलें आहे तें! बघ. मला तर आज केव्हांच 'ॲक्सिडन्ट' झाला नव्हता पण चिठ्ठींत ॲक्सिडंट लिहिलाय. मला वाटलं तुला उगीच वाईट वाटेल म्हणून नाहीं दिली मीं."

चिठ्ठी उघडून मीं त्यावर लिहिलेलें वाचलें. 'Execllent conduct today', असे शब्द त्यावर लिहिले होते. पण रोजचा Good हा शब्द न दिसल्यानें टिंचीचा घोटाळा झाला. एक्सेलंट हा शब्द टिंचीला ॲक्सिडंट असा वाटला. मीं त्याला चिठ्ठी समजून सांगितल्यावर त्याला किती आनंद झाला. पण तेव्हां पासून आमच्या घरांत मात्र एकादी अत्युत्तम गोष्ट घडली कीं सारी मंडळीं एक्सलंट म्हणायच्या ऐवजीं 'ॲक्सिडंट' म्हणूं लागली.

यानंतर घरीं, शाळेंत, सारीकडेच टिंचीच्या वागणुकींत पुष्कळच फरक पडला. आतां तो ट्रोचाला. पूर्वीसारखें 'तूं कोण मला सांगणार? मला वाटेल तसा मी वागेन!' म्हणून उलटून बोलेनासा झाला.

उलट नीट समजुतीनें ट्रोचालाच "तूं मला हात धू, केंस सार, बुटांना चकचकीत पालिश कर, असें सांगत सारखी माझ्या पाठीशीं लागू नको ग. तूं किनई अशी पाठीस लागलीस कीं मला रागवायला होतें नी मग मी तुझें ऐकत नाहीं. तेव्हां कृपा करून मला असें रागवायला लावूं नको ना." असें सांगू लागला.

अशा रीतीनें घरींसुद्धां त्यानें वागणुकीबद्दल 'ॲक्सिडंट रिपोर्ट' मिळवल्याचें जेव्हां मला घरीं परत आल्यावर कळलें, तेव्हां मीं त्याला चांगलीच शाबासकी दिली. पण ट्रोचानें "मला रागाकडे धाडलें नाहीं म्हणून चांगलें" असें म्हणून ट्रोचाला त्याचें श्रेय द्यायला तो विसरला नाहीं.

टिंची आतां फारच खुषींत असे. त्यामुळें त्याची वागणूक नेहमींच आतां 'ॲक्सिडंट' राहूं लागली. इतकेंच नव्हे आतांशें तो आपल्या बाईंना खूष करायला म्हणून वाचनावर पण जरा मेहनत घेऊं लागला. त्याच्या दृष्टीनें ही मेहनत 'निव्वळ बाईकरतां' म्हणून होती. कारण आपण कांहीं प्रयत्न न करतां एक दिवस घडाघड 'आपल्या तोंडून शब्द बाहेर पडतील' (पाहतांच वाचूं लागूं), अशी त्याची मनोमन खात्री होती.

हें सारें चालू असतां, आतांशा तो आणखीच एका गोष्टींत गर्क होता. आपले एन्सायक्लोपीडियाचे भाग ठेवतां यावे, म्हणून शाळेच्या लाकूड-कामाच्या विभागांत बराच वेळ घालवून त्यानें एक पुस्तकाचें कपाट तयार करायला घेतलें होतें. सबंध काम संपल्यावर त्यानें जेव्हां तें घरीं आणलें, तेव्हां तें त्याला पाहिजे त्यापेक्षां कितीतरी पट मोठें झालें असल्यानें त्याच्यापेक्षां मलाच तें उपयोगी पडेल असें आढळून आलें. आनंदानें तें आमच्या बैठकींत आम्हीं ठेवलें व अजूनहि तें तिथेंच आहे. त्याकडे पाहिलें कीं, आम्हांला कितीतरी अभिमान वाटतो. त्यांतल्या फळयावर आमचीं पुस्तकें व वर टिंचीचा हसायचा प्रयत्न करीत असलेला सोनेरी फ्रेम केलेला एक फोटो पण मीं ठेवला आहे.

टिंचीला आपलीं हत्यारें भारी आवडत. तीं घेऊन तो सदैव कांहीं तरी कामांत व्यग्र असे. तो जें करी तें इतकें काळजीपूर्वक व सुबक करी कीं, तयार झाल्यावर फारच छान दिसे. त्यामुळें इंचा कधीं कधीं मला म्हणेसुद्धां, "आई, नाहीं वाचायला शिकला तर नाहीं. हें असलें काम हा इतकें सुरेख करतो कीं, उद्यां एकादें दुकान काढलें तर आपल्या सर्वांना सहज पोसूं शकेल. मग कशाला हवी ती वाचनाची दगदग."

एन्सायक्लोपीडियाचे भाग विकत घेणें संपल्यावर टिंची आतां हत्यारें विकत

घेण्यासाठीं पैसे सांठवूं लागला.

हातोडा, करवत, स्क्रू-ड्रायव्हर, पटाशी, इत्यादिकांपैकीं प्रत्येक वेळीं तो जेव्हां एकादें हत्यार घेऊन येई, तेव्हां तो इतका खूष होई कीं, चांगलें घासून पुसून एकाद्या मौल्यवान् वस्तूप्रमाणें तें पेटींत नीट जपून ठेवी. आमच्या 'घरच्यांचीं' हत्यारें धूळ खात पडलीं होतीं, तीं त्यानें बाहेर काढून पुसलीं. मोठ्या प्रेमानें त्यांना तेल लावून त्यावरचा गंज काढून, घासून पुसून, आपल्या पेटींत ठेवून दिलीं.

"मी तुझ्या वडलांच्या हत्यारांची नीट काळजी घेईन." एक दिवस त्यानें मला सांगितलें. अजून 'पति' किंवा 'नवरा' हा शब्द त्याला गेला नव्हता.

ही सगळी हत्यारांची काळजी तो घेई, ती उगीच जमवून ठेवायचा एक नाद म्हणून नव्हे, तर त्यांचा तो व्यवस्थित उपयोग करी. घरांत जरा कांहीं कुठें मोडलें तुटलें कीं, तो लगेच दुरुस्त करून ठेवी. आमच्या जिन्याच्या कठड्यांतील कांहीं चात्या कितीतरी दिवस अगदीं पडायला झाल्या होत्या. त्या त्यानें पहिल्यांदा सुधारल्या. आमच्या पुढच्या दाराची घंटी पारच बिघडली होती. मुलें लहान असतांना त्यांनीं एकदां ती कशी चालते हें बघायला काढली, तेव्हांपासून कितीक वर्षांत तरी ती कोणीं सुधारलीच नव्हती. टिंचीनें जमिनीला आपल्या गिरमिटानें भोंक पाडून त्यांतून दोन तारा खालीं तळघरांतल्या बॅटरीला लावून ती सुधारली. त्यामुळें जमिनीची थोडीशी खराबी झाली पण घंटी वाजूं लागली. त्या आनंदांत जमिनीची खराबी झाली याबद्दल बोलून त्याला दुखविणें मला बरें वाटलें नाहीं. म्हणून तिकडे आम्हीं दुर्लक्षच केलें.

टिंचीला आमचें घर आवडायचें. त्याचें मला तरी एक कारण वाटतें, तें म्हणजे, अगदीं नमुनेदार व्यवस्थित घरांपैकीं तें नव्हतें. त्यामुळें त्याला काम करायला खूपच वाव होता. तावदानें फुटलीं कीं तीं बसवणें, तळघराच्या पायऱ्या नीट बसवणें, खराब झालेलें लाकूडकाम रंगवणें इ. सगळ्या कामांची जसजशी तो काळजी घेऊं लागला तसतसें 'प्रेमळ घर' त्याचें, असें त्याला वाटूं लागलें.

"आतां काय करूं" असा कधीं त्याला प्रश्नच पडलेला दिसला नाहीं. सदान्कदा तो कांहींतरी करीत असलेला दिसे. त्याला वेळ घालवायलाहि कुणाची जरूर लागत नसे. आमच्या घरांत ज्याला कांहीं करायचें असेल त्याला इतका वाव मिळे कीं त्याचा दिवस कुठच्या कुठें जाई. टिंची तेंच करी.

एकदां मात्र अशीच एक वस्तू नीट करीत असतां तें काम इतकें बिघडलें कीं, पारच वायां गेलें. पण अशी वेळ क्वचितच येई. जें काय करी तें नीट व

इतक्या चांगल्या बुद्धीनें करी कीं, अशा एकाद्या वेळेकरतां रागावयाचें माझ्या जिवावरच येई.

त्याचें हें सगळें वागणें पाहिलें कीं लोक मला सांगत, तुम्ही त्याला जसजसा जीव लावाल, तसतसा तो सुधारेल.

पण मला तरी वस्तुस्थिति निराळी आहे, असें वाटे. आमचा त्यावर जीव लावायचा प्रश्नच नव्हता. प्रश्न होता त्याच्या बाजूनें. म्हणूनच मला वाटे, ज्या दिवशीं त्याला आमच्याविषयीं खरोखर आपलेपणा वाटायला लागेल त्या दिवशीं तो खरा इथला होईल. आतांपावेतों आम्ही त्याला नुसतीं आवडतच होतों, पण आतांशा मात्र, त्याच्यांत आमच्याविषयीं आपलेपणा उत्पन्न होतो आहे, असें वाटूं लागलें.

त्याचा आमच्याविषयीं आपलेपणा वाढत चालला तसतशी आम्हांला मदत करायची त्याला इच्छा होऊं लागली. कित्येक वेळां मदत करतांना तो आपला जीव धोक्यांत घालायलाहि मागेंपुढें पाहत नसे. एक दिवस, 'केरसुणी घेऊन, आपल्या निजायच्या खोलीवरच्या पावसाच्या पन्हळांतून पडलेला सारा पातेरा मी आतां झाडून टाकणार आहें' असें मीं नुसतें म्हटलें मात्र, लगेच टिंची म्हणतो, "नको, कशाला त्रास घेतेस? मी ठीक करतों." त्यानें खरोखरच ठीक केलें व तें सुद्धां अगदीं 'लवकर लवकर'. तेवढेंच करून तो थांबला नाहीं. शेवटच्या पोटमाळयावरून खिडकी उघडून तो छपरावर सरपटत आला. आणि हळूच पावसाच्या पन्हळांना धरून सरकत सारें छप्पर, पन्हळ्या, सगळें साफ करीत सुटला. तीन मजले उंचीवर असलेल्या छपरावर हें करतांना जेव्हां मीं त्याला पाहिलें, तेव्हां माझ्या पोटांत एकदम धस्स झालें. एकादी नळी सरकली तर? मीं खालूनच त्याला 'आधीं एकदम खालीं ये' म्हणून सांगितलें. तो खालीं आल्यावर मात्र मी त्याच्यावर चांगलीच रागावलें. "हें पाहा, आज असें केलेंस खरें, पण फिरून नको हो करूं. समज, खालीं पडला असतास तर? काय धास्ती वाटली माझ्या मनाला!"

टिंची मनापासून हसतच सुटला. "इतकी घाबरलीस? मी पडलों तर कुणालाच कांहीं वाटायचें नाहीं."

"वाः, असं कसं? मला वाटतं तर. किती घाबरलें मी!"

नंतर खऱ्याखुऱ्या आश्चर्यानेंच टिंचीनें प्रश्न केला, "मी पडलों तर खरंच तुला वाईट वाटेल?"

"म्हणजे काय टिंची, वाटल्यावांचून का मी बोलतें आहें? आज तूं पडून मेला असतास तर मला रडतां भुई थोडी झाली असती."

"वाः गंमतच!" आनंदानें टिंची एकदम ओरडला. "अजूनपर्यंत मी मेलों कीं जगलों कुणालाच त्याचें कांहीं वाटत नसे. पण तुला वाटतें अं! सांग पाहूं फिरून काय वाटतें तें?"

"टिंची, तूं मेलास तर मला भारी, भारी वाईट वाटेल. खास मला रडूं कोसळेल."

"खरं? सांग पाहूं फिरून. कित्ती कानाला गोड लागतें तें!"

त्याच्या समजुतीखातर मी पुन्हा एकदां तेंच वाक्य उच्चारलें.

मग त्यानें एक नवीनच युक्ति केली.

"मी सायकलवर बसूं लागलों कीं, तूं मला नेहमीं 'काळजी घे' 'काळजी घे' असें कां सांगतेस?"

"कां म्हणजे? गर्दींत तुला कुठें दुखापत होऊं नये म्हणून."

"मला दुखापत झाली तर तुला वाईट वाटेल?"

"खासच. मला काळजी वाटते."

"खरं?" असें म्हणून तो एकदां हंसला व 'फिरून मला ते शब्द ऐकव' म्हणून त्यानें विनंती केली.

"बरं, मीं छपरासंबंधीं आतां तुला सांगितलें तें लक्षांत ठेव बरं का. तुला तिथें पाह्यलं नी काय धस्स झालं माझ्या पोटांत!"

"हो मला कळलें. मला पण भीति वाटत होती, म्हणून तर मीं प्रार्थना केली." असें म्हणून त्यानें 'क्रास' केलें. असो "पण मी किती चांगलें काम केलें आहे पाह्यलेंस?"

"हो. पण फिरून असें करायचें नाहीं अं." मीं निक्षून बजावलें.

नंतर त्यानें आपल्या हाताचा पंजा उभारून मला शांत होण्याबद्दल खूण केली आणि मला म्हणतो, "काळजी करूं नकोस. तुझा 'बाप' मेला आहे, मी तुझी नी घराची नीट काळजी घेईन."

टिंची आपला शब्द कधींच विसरत नसे तसा हाहि शब्द तो बिलकुल विसरला नाहीं.

एके दिवशीं सारखा पाऊस पडत होता, त्याला विशेषसें काम नव्हतें. आज बघ तुला कसें चकित करून सोडतों तें, त्यानें मला सांगितलें व छपराजवळच्या

पोटमाळा त्या दिवशीं त्यानें सारा साफ केला. अस्ताव्यस्त पडलेलें सारें सामान त्यानें नीट व्यवस्थित ठेवलें. कांहीं ट्रंकांतून भरलें. त्यानंतर त्याला एक दहा सेंटचें कुलुप लावून त्याची किल्ली मजजवळ आणून दिली.

"तुझ्या माळ्यावर कोणीं जाऊन खराब करूं नये म्हणून तुला छोटी भेट" त्यानें किल्ली ठेवतांना मला सांगितलें. मला आमच्या 'घरच्यांची' आठवण झाली. ते अशा कामाची फार चाह्य करीत. ते स्वतः तर फारच व्यवस्थित होते. टिंचीला खेळण्यापेक्षां घर स्वच्छ करणें वगैरे कामेंच आवडत. त्याला खेळायचें जमत नसे. एवढें खरें कीं, साधारण मुलाला जितकी खेळांत गंमत वाटेल तितकीच त्याला असें काम करतांना वाटे.

मुलांना सारखेंच कामाला लावलें, खेळूं दिलें नाहीं, कीं मुलें मंद होतात. टिंचीवर असा परिणाम होईल कीं काय याची मला केव्हां केव्हां भीति वाटे. पण लगेच लक्षांत येई कीं इतर मुलें आणि टिंची यांत फार फरक आहे. तीं मुलें काम करून कदाचित् मंद होत असतील पण टिंची कशानेंच मंद, आळशी होणें शक्य नाहीं. तो दुसरें सारें कांहीं करील पण मंदपणा त्याच्या अष्टांगींसुद्धां येणें शक्य नाहीं.

असें असूनसुद्धां, तो असें साफसुफीचें काम करायला निघाला कीं मी त्याला बाहेर जाऊन खेळ म्हणून त्याच्या पाठीस लागें. बाकी एक दिवस असें मी म्हणत असतां, त्यानें मला अगदीं लाजवलें म्हटलें तरी चालेल. "खेळाला जा सांगतेस ? आणि आत्तां ? कमालच केलीस ! आपल्या घरीं पाहुणे येणार आहेत. तेव्हां घर नीट स्वच्छ करून लावायला नको का ? नाहीं तर त्यांना वाटेल आपण एखाद्या जंगलांतच राहतों आहों !"

हिवाळ्यांत एके दिवशीं सायंकाळीं मी घरीं आलें नी पाहतें, तों घरांत कुणी नाहीं. 'आन्द्रितिनिस' म्हणून हाका मारल्या पण त्याचाहि पत्ता नाहीं. कुणीच घरांत [illegible]हतें मुळीं. एक वेळ मनांत आलें, घरीं कुणी नाहीं, तेव्हां हा बाहेर गेला असेल. कुठें बरें गेला म्हणून विचार करतां करतां मला हेन्रीची आठवण झाली. हेन्री त्याच्याच वर्गांत होता. शाळा सुटल्यावर ते नेहमीं बरोबर खेळत. "हेन्री माझा जिगरदोस्त आहे. त्यानें आज असें चांगलें मला वागविलें." इ. हेन्रीच्या गोष्टी तो नेहमींच सांगत असे. आम्हांलाहि त्याला असा कोणी मित्र मिळाल्यानें कितीतरी समाधान वाटे. एक सुचिन्हच होतें तें.

तो हेन्रीच्या घरीं गेला असेल या कल्पनेनें मी त्याच्या घराच्या दिशेनें हाका

मारूं लागलें. इतक्यांत आमच्या तळघरांतून आवाज आला. काय झालें, म्हणून मी पाहयला गेलें; तों टिंची, तळघरांतून "इथें आहें बघ मी, तळघरांत." "बघ कसें छान साफ केलें आहे तें." तो मला सांगू लागला.

घरांत रिकामा असतांना स्वस्थ न बसतां, त्यानें सारें तळघर साफ केलें होतें. तें काम कांहीं थोडेंथोडकें नव्हतें. चांगलें एका मोठ्या माणसाला पुरेल एवढें तें काम होतें. पण आतां तळघरांतली सगळी घाण पार नाहींशी होऊन टिंचीवर बसली होती, त्यामुळें त्याचे पांढरे शुभ्र दांत बोलतांना अधिकच चमकूं लागले. मोठ्या गंभीरपणें त्यानें मला सांगितलें, "तुझा 'बाप' मेला आहे ना म्हणून मी तुझ्याकरतां तळघर साफ करून ठेवलें."

मीं त्याला शाबासकी दिली.

जसजशी टिंचीला मी कमी कामें सांगूं लागलें, तसतसा तो स्वतः जबाबदारी घेऊन माझीं सारीं कामें करूं लागला. कठिण जबाबदारीचीं सुद्धां सारीं कामें तो अंगावर घेई.

घरांतला कचरा टाकायचा म्हणजे जणुं आपलेंच काम असें त्याला वाटे. तो बिलकुल कधीं विसरत नसे. एकाद्या वेळीं मी डबा उचलायला लागलें कीं, मला म्हणे, "तूं कशाला करतेस? मी आहें कीं!" असें म्हणून मला करूं देत नसे.

ह्या त्याच्या सगळ्या गोष्टी पहिल्या कीं, तो पहिल्याप्रथम ज्या घरीं होता त्या घरून आम्हांला मिळालेल्या अहवालाची मला आठवण येई. "तुमचा प्राण जायला लागला तरी तो बोटसुद्धां उचलणार नाहीं तुम्हांला वांचवायला." असें त्यांनीं आम्हांला सांगितलें होतें.

पण आतां कांहीं निराळाच अनुभव येत होता.

मी बाजारांत जाऊं लागलें कीं पिशवी घेण्याकरतां म्हणून तो नेहमीं माझ्या-बरोबर येत असे.

मी त्याची काळजी घेतें, हें पाहून उलट माझी तो काळजी घेऊं लागला. मी बाहेर जाण्याकरतां मोटरमध्यें बसलें कीं, मला 'काळजीपूर्वक जा, नाहीं तर दुखापत होईल, असें तो सांगूं लागला. घरीं मी परत आलें कीं धावतच तो पुढें येऊन 'ठीक आहेस ना' म्हणून विचारल्याशिवाय राहत नसे.

एकादे वेळीं मी कांहीं बोललें नाहीं कीं त्याला काळजी वाटे. 'बरं वाटतं ना?' असें विचारल्यावर मी हसलें कीं त्याचें एकदम समाधान होई. "तूं हसते आहेस तेव्हां सारं ठीक आहे, आतां मला कळतं" असें म्हणून तो आपलें समाधान व्यक्त करी.

यापुढें, कां कोणास ठाऊक, माझ्या प्रकृतीचीच त्याला फार काळजी वाटे. "थकली तर नाहींस? बरें वाटतें आहे ना?"

तो मला मध्येंच एकदम विचारी, "तूं आतां म्हातारी झालीस. एकादे दिवशीं तूं मरशील नाहीं? पण मला तूं मरायला नको आहेस" असें कितीतरी वेळां त्या दिवसांत त्यानें मला सांगितलें असेल.

एकदां मी आजारी पडलें. तीन दिवस अंथरुणावर पडून होतें. त्या तीन दिवसांत मुसंब्याचा रस वगैरे गोष्टी घेऊन त्यानें माझ्याकरतां इतक्या कांहीं खालीं वर खेपा केल्या असतील कीं, त्याच्या पायाचे तुकडेच पडले असतील.

सकाळची न्याहारी, दुपारचें जेवण, सारें ट्रेमध्यें घालून तो माझ्याकरतां वर घेऊन येई. खायचे सगळे जिन्नस तो स्वतः करी. तेसुद्धां किती व्यवस्थित. कॉफी तर तो फक्कडच बनवी. एकादा टोस्ट पण कधीं जाळला नाहीं कीं बिघडवला नाहीं. सॅन्डविच, अंडीं, सारे पदार्थ असे कांहीं छान करी कीं मला कौतुक वाटे. मी कधीं त्याचे आभार मानले म्हणजे मात्र खांदे उडवून तो मला सांगे, "तुझा 'बाप' मेला आहे म्हणून नको का तुझी काळजी घ्यायला?"

टिंचीनें मला लाडावूनच ठेवलें म्हटलें तरी चालेल. दिवसेंदिवस बारीक-सारीक सगळ्या गोष्टींकरतां मी त्यावर अवलंबून राहूं लागलें. कांहीं बिघडलें कीं मी म्हणें, 'टिंची करील तें ठीक', आणि तो खरोखरच सुधारी. एकदां आमच्या घरीं एक अगदीं तान्हें मूल आलें होतें. त्याला मी सांभाळीत होतें. तें जें रडायला लागलें, तें कांहीं केल्या थांबेचना. अखेर टिंची आला नी हळूहळू हलवून हलवून त्यानें त्याला निजवलें.

त्या दिवशीं मात्र हा मुलगा काय वाटेल तें करूं शकेल, असें माझ्या मनांत येऊन गेल्याशिवाय राहिलें नाहीं.

मी कुठें बाहेरगांवीं जायची झालें कीं, टिंची माझी सूटकेस इतकी छान भरून देई कीं, कोणत्याहि कपड्याला एवढीसुद्धां सुरकुती सांपडत नसे. खरं म्हणजे मला स्वतःलासुद्धां इतकी व्यवस्थित पेटी भरतां येत नाहीं.

टिंचीच्या गोष्टी निघाल्या कीं कितीक तरी वेळां मी लोकांना या मुलांत एक विशिष्ट व्यक्तिमत्त्व दिसून येतें असें उद्गार काढतांना ऐकलें आहे. त्यानंतर गोष्टी निघतां निघतां व्यक्तिमत्त्व म्हणजे काय यावर चर्चा होई. मला वाटतें हें व्यक्ति-मत्त्व आपण लोकांना कशा रीतीनें प्रतिसाद देतों यावर अवलंबून असतें. टिंची अशी प्रतिसाद फारच चटकन् देई. कोण काय बोलतो, इकडे त्याचें चांगलें लक्ष

असे एवढेंच काय, कुणीहि कांहीं विचारलें कीं त्याला तो मोठ्या आपुलकीच्या स्वरांत उत्तरें देई. कुणाला काय आवडतें काय नाहीं, कुणाला कसला नाद आहे, कोणत्या गंमतीच्या गोष्टी आवडतात, हें लक्षांत ठेवून, तो पुढल्या खेपेला भेट झाली कीं त्याचा उल्लेख करण्याची दक्षता घेई. कुणालाहि मदत करायची त्याची तयारी चटकन् असे. भेट म्हणून लहान लहान गोष्टीसुद्धां तो पटकन् देऊन टाकी. त्यामुळें त्याच्याविषयीं लोकांना कुतूहल उत्पन्न झाल्याशिवाय राहत नसे. मी घरीं आलें कीं, नेहमींच तो धावत, धावत पुढें येऊन जणुं काय माझें स्वागत करी व मी काय म्हणतें इकडे पूर्ण लक्ष देई. कधीं त्याच्या खोलींत गेलें कीं, चटकन् उभा राहून, तुला काय पाहिजे, मी देऊं का, असें विचारल्याशिवाय राहत नसे.

तो आल्यावर मीं त्याचें प्रथम स्वागत केलें म्हणूनच कीं काय आतां सदैव तो माझें स्वागत करायला तत्पर असे.

आतां टिंची किती सुस्वभावी झाला होता. सुस्वभावी, सदैव मदतीला तत्पर, उद्योगी, समाधानी, आणि प्रेमळ अशा रीतीनें त्याला वाढत असलेला पाहून कित्येक वेळां त्याचेंच वाक्य माझ्या मनांत आल्याशिवाय राहत नसे.

"तुझा 'बाप' मेला आहे ना, मी तुझी काळजी घेईन बरें."

एकमेकांचें हित पाहण्याकरतां, जणुं काय आम्हीं दोघांनीं एक समितीच स्थापन केली होती.

टिंची इतक्या सगळ्या गोष्टी करायला तयार असतां एका बाबतींत मात्र, काळ्या दगडावरची रेघ आंखल्यासारखें, तो कोणाचेंच ऐकत नसे. आणि ती बाबत म्हणजे बुटांना पॉलिश करण्याची. बुटांना पॉलिश करायला तो कधींच कबूल नसे. आमचे बूट नाहीं तर नाहीं, पण स्वतःचे बूट तरी त्यानें पॉलिश करावें असें आम्हांला नेहमीं वाटे, पण तें तो कधींच करीत नसे. बूट फार महाग असतात, पॉलिश केले कीं ते चांगले टिकतात, असें आम्हीं त्याला समजावून सांगण्याचा कित्ती प्रयत्न केला, पण ज्याचें नांव तें. तो लक्षच देत नसे.

गोडीगुलाबीनें, कशाहि रीतीनें सांगा, त्याचा त्याच्यापुढें कांहींच उपयोग होत नसे. मीं रागावून त्याला पॉलिश करायला लावलेंच, तर रागावायचें त्यानें आतां सोडून दिलें होतें. पण असें हिरमुसल्यासारखें तोंड करून तो बसे कीं, त्यापेक्षां रागावणें बरें, असें कांहीं वेळां वाटे. टिंची असाच हिरमुसला असतांना त्याचा फोटोग्राफरनें काढलेला एक फोटो मजजवळ आहे. फोटोला

जातांना मीं त्याला बूट पॉलिश करायला सांगितलें, म्हणून स्वारी रुसली होती. "हें काय, मीं इतके बूट पॉलिश केले, पण त्या फोटोग्राफरनें माझा वरचाच फोटो काढला. बूट दिसत सुद्धां नाहींत यांत." बूट दिसत नाहींत मग पॉलिश तरी कशाला करायला हवे होते, असें म्हणण्याचा त्याचा बहुधा उद्देश असावा. घाणेरडे, चिखल वाळलेला, असे बूट घालून तो शाळेला, चर्चमध्यें, खुश्शाल मजेंत जात असे. पण तेच पॉलिश करायला सांगितले कीं, त्याच्या कपाळाची तिडीक उठून एकदम तोंड आंबट करी.

आतांपर्यंत त्याच्या सगळ्या खोडी जवळ जवळ त्यानें घालवल्या, पण ह्या बुटांच्या बाबतींत, तो कधीं कोणाचेंच ऐकत नसे. त्याला अगदीं जबरदस्ती केल्या-शिवाय तो कधींच बुटांना पॉलिश करीत नसे. पुष्कळ वेळां, बिचारा डेव्हिड त्याचे बूट पॉलिश करी. टिंची युरोपियन लोकांप्रमाणें खोलीच्या दाराबाहेर बूट काढून "डेव्ह, चक्क काढ अं" असें खुश्शाल सांगे.

"होय सरकार" म्हणून थट्टेनें डेव्ह कबूल करी, पण त्याला धडा शिकवायचें त्याच्या कधीं मनांतच येत नसे. ही एक गोष्ट सोडली तर इतर गोष्टींत वाटेल ती मदत करायला टिंची सदैव तयार असे. खुर्च्या मोडल्या कीं स्क्रू बसवून सरस लावून तो नीट करी. प्लेटी फुटल्या कीं त्याचें विशिष्ट सीमेंट लावून तो सांधून टाकी.

"या सगळ्या गोष्टी तुला साधतात तरी कशा ?" म्हणून एकदां मीं त्याला आश्चर्यचकितच होऊन विचारलें. तेव्हां मला मिळालेलें उत्तर मोठें छान आहे. "हात्तिच्या, त्यांत मोठेंसें काय ? मी प्रथम नीट पाहतों, विचार करतों, नी मग करतों" म्हणून त्यानें एकदां इस्त्री करीत असल्यावेळचें उदाहरण दिलें. तो खरोखर सराइतासारखी इतकी छान व चटकन् इस्त्री करीत होता कीं पाहतांना गंमत वाटे. कुठें एकदांहि निष्कारण दाब नाहीं, एक चुकीचा हात नाहीं, कांहीं नाहीं. कमालीचें सुव्यवस्थित व झटकन् काम करण्याची त्याची पद्धत होती. "तूं कुठें शिकलास इस्त्री करायला ?" मीं त्याला विचारलें. त्यावर त्यानें हसून तेंच उत्तर दिलें, "मी पाहतों नी मग करतों." "पाहिलास, मीं कसा कागद ठेवला आहे तो." मला गंमत वाटली. इस्त्री करतांना ट्रौचाचा झगा बोर्डवरून जमिनीवर लागून मळूं नये म्हणून त्यानें मुद्दाम कागद पसरला होता.

सुईदोरा घेऊन स्वतःचे कपडे नीट करणें, रफू करणें, इत्यादि कामांत सुद्धां तो फारच पटाईत होता. हें त्याला कसें यायला लागलें म्हणून विचारतां त्यानें मला सांगितलें कीं, 'अग, तुला वाटतें पण शाळा सुटल्यावर इथलीं मुलें जशीं

खेळतात तसे आम्ही खेळत नाहीं. माझ्या देशांत मुलें शाळेंतून सुटलीं कीं, त्यांना कपडे नीट करीत बसावें लागतें."

मोटर गॅरेजवर चढून तेथल्या छपरावर पडलेलीं भोकें झाळणें इ. कामेंसुद्धां टिंची आपण होऊन न सांगतां करी. तींसुद्धां इतक्या हौशीनें कीं कधीं कधीं तो म्हणे, "शाळेंत जाऊन वेळ घालवण्यापेक्षां एकदां हें हातचें काम संपविलेलें बरें, नाहीं का ? किती करायचें आहे अजून !"

पण एवढें सगळें करीत असतां बूट पॉलिश करायचा प्रश्न आला कीं मग मात्र नन्नाचा पाढा.

माझा 'बाप' नाहीं याबद्दल टिंचीला मनापासून इतकें वाईट वाटे कीं, जणुं काय तो त्यांना ओळखीतच होता. आमच्या घरच्या सगळ्याच माणसांवर त्यानें मोठा जीव लावला होता, पण इतरहि माणसांबद्दल त्याला चांगलीच सहानुभूति वाटे, नाहीं असें नाहीं.

एकदां आम्ही 'दीनबंधु' या नांवाच्या हॉस्पिटलमध्यें माझा 'डॉक्तार' (हा टिंचीचा शब्द) मुलगा राहत असे त्याला भेटायला गेलों. जातांना मधल्या भागांत भिंतीवर एक मोठी पेटी लटकलेली त्यानें पाहिली. "कशाला ही?" त्या वरच्या सुवर्णाक्षरावरून बोटें फिरवीत, त्यानें विचारलें.

गरीब व रुग्णाइतांकरतां पैसे द्या व त्यांच्याकरतां देवाची प्रार्थना करा, असें त्यावर लिहिलें आहे, असें मीं त्याला सांगितलें. त्याचा अर्थ काय हें जेव्हां मी त्याला समजावून सांगितलें तेव्हां त्याला फारच वाईट वाटलें. लगेच आपल्याजवळ उरलेल्या हातखर्चांचे पैसे (जवळजवळ ½ भाग) त्यानें पेटींत टाकले. 'डॉक्तार' आला, तेव्हां टिंची कुठें दिसेना. "तुझा बच्चा–माकड–कुठें गेला?" त्यानें मला विचारलें. "बहुधां तो तुझ्या गरीब व आजारी लोकांकरतां प्रार्थना करीत असावा." मीं उत्तर केलें, आणि खरोखरीच तो पेटीजवळ उभा राहून डोकें वाकवून प्रार्थना करीत होता.

प्रत्येक वेळीं आम्ही हॉस्पिटलमध्यें गेलों कीं, टिंची त्या पेटींत कांहींतरी टाकल्याशिवाय राहत नसे. शिवाय तेथेंच उभा राहून तो प्रार्थना पण करी. ती सुद्धां इतक्या सहजपणें कीं, आपण कांहीं वेगळें करतों आहों, याची त्याला जाणीव सुद्धां नसावी. त्यानंतर प्रत्येक वेळीं, 'डॉक्तार तुमचे जमले का गरिबांपुरते पैसे?' हें सुद्धां 'डॉक्तार'ला विचारल्याशिवाय तो राहत नसे.

टिचीमध्यें गरिबांविषयीं सहानुभूतीची भावना असेल अशी सहसा कल्पना होत नसे. पण त्याचें सर्वच कांहीं अनपेक्षित नव्हतें का ?

एक दिवस मध्यरात्रीच्या सुमारास मीं त्याला माझ्या खोलींत पाऊल न वाजवितां येत असलेला पाहिला.

"लक्ष ठेवा हो नाहीं तर एखाद् दिवशीं सुरी खुपशील तो" असें अनेकांनीं सांगितलेलें वाक्य झटकन् माझ्या मनासमोर उभें राहिलें. मी झोपेचें सोंग घेऊन तशीच पडून राहिलें. तो 'बद्‌माष' काय करतो तें मला पाह्यचेंच होतें. अंधारांत हळूच पाऊल न वाजवितां तो तडक माझ्या बिछान्यापाशीं आला. त्याच्या हातांत कांहींसें होतें.

"टिंची, काय करतो आहेस?" त्याला विचारलें. "कांहीं नाहीं ग ब्लँकेट घलतों आहें तुला, थंडी वाजत असेल म्हणून" तो हातांतलें ब्लँकेट माझ्या अंगावर घालीत होता.

मला तरी त्याच्या हल्ल्याचा अनुभव आला तो एवढाच. ब्लँकेटचा हल्ला—सुरीचा नव्हे.

त्याला सुद्धां कारण होतें. कांहीं दिवसांपूर्वीं तो थंडी-पडशानें नुसता बेजार होऊन निजला होता. रात्रीं त्याला थंडी वाजूं नये म्हणून मीं त्याच्यावर ब्लँकेट घालीत होतें. घाबरून तो एकदम ओरडला, तेव्हां मी त्याला सांगितलें कीं, "बघ बाहेर थंडी पडली आहे. ब्लँकेट घालतेंय मी, तुला उबदार वाटावें म्हणून."

"तूं झोपलेली असलीस तरी कशी ग तुला माझी आठवण राहते?" त्यानें मला प्रश्न केला.

"टिंची, साऱ्याच मुलांना थंडी पडली कीं, त्यांची आई पांघरूण नीट आहे कीं नाहीं हें येऊन बघतेच."

माझ्या उत्तरासरशीं तो रात्रीच्या प्रहरीं बिछान्यांतून बाहेर आला. आपल्या उघड्या पायाच्या टांचा नेहमींप्रमाणें जुळवून खालीं वाकून माझ्या हाताचा त्यानें मुका घेतला.

आज थंडी पडलेली पाहून, माझ्या बाबतींत तो तसेंच करीत होता. "किती गोड पोरगा आहेस रे" कौतुकानें माझ्या तोंडून शब्द निघाले. त्यावर तो म्हणतो, "माझ्या सगळ्या आयुष्यभर, जेव्हां जेव्हां थंडी पडेल तेव्हां तेव्हां, मी तुला पांघरुण घालून नीट उबदार ठेवीन. तूं कधीं आजारी पडलीस, तुला वाईट वाटलें, तर नेहमीं तुझी काळजी घेईन." अशा रीतीनें टिंचीनें मला आणखी एक वचन दिलें.

माझ्याविषयीं वाटत असलेल्या सहानुभूतीनें, त्याचप्रमाणें गरीब व आजारी यांबद्दल वाटत असलेल्या आस्थेनें, टिंचीनें 'दीनबंधु' (Son of Consolation) हें नांव स्वतःला खरोखर सार्थ करून घेतलें होतें.

## ५. प्रेमळ घर

तसें म्हटलें तर टिंचीला इंग्रजी शब्दांविषयीं कांहींच भावना नव्हत्या, पण एवढें खरें कीं त्याला 'कोझी' (आरामशीर) हा शब्द फारच आवडत असे. संध्याकाळीं, नेहमीं, तो आरामखुर्चीवर धडपड करून बसे, इकडे तिकडे पाही, आणि म्हणे, 'कसें छान (cozy) आरामशीर वाटतें, नाहीं?' त्यामुळेंच असेल, घरीं राहायला तो नेहमीं खूष असे. एक प्रकारचें समाधान दिसे त्याच्या तोंडावर. पण एके दिवशीं त्याचें तें घर, त्याचा तो आराम, यांवर चांगलाच हल्ला झाला. तो तर त्या दुःखानें, भीतीनें, अगदीं कोलमडल्यासारखा झाला.

ट्रोचानें टेलिव्हिजन सेट घ्यायचें ठरविलें म्हणून हा हल्ला झाला. कुठें सेट ठेवायचा असा प्रश्न निघाला असतां 'डायनिंग रूम'मधली कोपऱ्यांतली जागा सगळ्यांत सोयीची असें आम्हीं ठरवलें व फर्निचर आणि इतर सामान हलविलें. सेट आला, तेव्हां टिंची घरांत नव्हता. आल्यावर पाहतो तों सामान हलवलेलें. तो कांहीं वेळ पाहतच उभा राहिला. कांहींच जाग्यावर राहिलेलें नाहीं असें पाहून त्याला एकदम रडूं कोसळलें. तो खोलीबाहेर सटकला. आम्ही गडबडींत होतों. इतक्यांत कोचावर पालथा पडून राहिलेल्या टिंचीकडे आमचें लक्ष गेलें. बिचारा तळहातावर डोकें ठेवून निराश झाल्यासारखा मूकाश्रु ढाळीत होता.

"काय झालें तुला टिंची?"

"तुम्हीं सगळें बदलून टाकलें. मला आतां ओळखता सुद्धां येत नाहीं, हें माझेंच घर म्हणून."

त्याच्या त्या रडण्यांत इतकी आर्तता होती कीं त्याला कमालीचें वाईट वाटलें असावें हें स्पष्ट होत होतें. "कशाला दुखवा थोडक्याकरतां" म्हणून आम्हीं सारें फर्निचर फिरून जाग्यावर आणलें. "आई, त्याचें ऐकून चालायचें नाहीं, हें तर खरेंच; पण जरा दमादमानें घेतलें कीं, आपोआपच तो वळणावर येईल. तेव्हां राहूं दे असेंच आज रात्रभर. उद्यां पाहूं."

दुसऱ्या दिवशीं टेलिव्हिजनच्या तारा प्लगला कशा लावायच्या, तें जणुं काय आम्हांला समजतच नाहीं, असा आम्हीं बहाणा केला. टिंचीला तें एक प्रकारचें

आव्हानच होतें.

'मी बसवतों बघ', टिंचीनें चटकन उत्तर केलें. तदनंतर स्वारी कंपनीची माणसें सेट कसा बसवतात, हें पाहण्यांत व जाणून घेण्यांत इतकी गुंगली कीं, अखेर टेलिव्हिजनचा आगंतुकपणा त्यांत पार नाहींसाच झाला. नंतर त्यानें आपण होऊनच फर्निचर हलवायला आम्हांला मदत करून सेटकरतां एक छान कोपरा तयार केला. नंतर नेहमींच्या आरामखुर्चीवर बसून मोठ्या खुषींत येऊन "किती छान नी आरामशीर वाटतें नाहीं" असें फिरून स्वारी म्हणूं लागली; तेव्हां आम्हीं निष्कर्ष काढला कीं, आतां सारें ठीक आहे.

युद्धामधील अस्थिरता, अशाश्वती, सारखी अनुभवल्यानें यत्किंचित् कुठें बदल झाला, इकडची खुर्ची, टेबल, तिकडे झालें, तरी त्याला एक प्रकारें मानसिक ताण बसे, व तो अस्वस्थ होई.

टेलिव्हिजनवर दाखवण्यांत येणाऱ्या मारामाऱ्या, बंदुकीनें ठार मारणें, सूड इ. प्रकार पाहून तो फार अस्वस्थ होईल अशी आमची पहिल्याप्रथम कल्पना होती. पण लवकरच ती अस्थानीं असल्याचें आमच्या लक्षांत आलें. एकंदर सगळ्याच तऱ्हेच्या या मारामाऱ्यांविरुद्ध मीं कांहीं म्हटलें कीं तो मला म्हणे, "मिसिस, तूं अगदीं काळजी करूं नको. हीं माणसें कांहीं खरींखुरीं मरत नाहींत, तीं नुसतीं सोंग करतात मेल्याचं. फिरून दुसरें पिक्चर सुरूं झालें कीं तयार कामाला. बघ तूं खरें आहे कीं नाहीं तें!"

इतक्या रीतीची हिंसा, खून पाहिले कीं, त्यानें असलीं चित्रें पाहूं नये असें मला वाटे. म्हणूनच मला वाटतें तो शहाणपणें गप्प बसून हें सारें पाही. व हळूच मला सांगे, "तूं इतकी काळजी कां करतेस? चांगलें, वाईट कोणतें हें मला पुरें समजतें. तीं पांढऱ्या घोड्यावर बसतात ना तीं माणसें चांगलीं असतात. तीं कधीं मरत नाहींत. वाईट माणसें नेहमीं काळ्या घोड्यावर बसतात आणि तीं मेल्याचें सोंग करतात. हा नुसता खेळ आहे. खरं नव्हे कांहीं हें."

टेलिव्हिजनवर कितीहि धूमधडाक्याचीं चित्रें पाहिलीं, तरी नवीन आला तेव्हांसारखा तो आतां झोपेंत ओरडत नसे.

एके दिवशीं टेलिव्हिजनवर दक्षिण कोरियांतील लढाईचीं चित्रें दाखविण्यांत आलीं. तीं पाहतांक्षणीं हा कांहीं खेळ नव्हे हें ताबडतोब टिंचीच्या लक्षांत आलें. तीं पाहतां पाहतां त्याचा चेहरा उतरूं लागला. तो अगदीं भिऊन गेला. त्या दिवशीं रात्रीं मात्र त्याला झोप येईना. तो आपल्या पायजम्यांतच माझ्या खोलींत

येऊन माझ्या बिछान्यावर बसला.

"लढाई किनई फार भयंकर असते" तो मला रडतच सांगूं लागला. "तुला कल्पना नाहीं त्याची. मी जेव्हां इथें अमेरिकेंत आलों, तेव्हां लढाई अमेरिकेपर्यंत येईल अशी नव्हती मला कल्पना."

"पण लक्षांत ठेव, अमेरिकेंत जर युद्ध सुरू झालें, तर मी पाव कापायची सुरी घेईन नी सरळ छातींत खुपसून घेईन माझ्या, खरं सांगतोंय. दुसरें युद्ध पाहण्यापेक्षां मेलेलें काय वाईट?" बोलतां बोलतां इतक्या आवेशानें तो बोलूं लागला कीं बसल्या बसल्या बिछान्यावरच उशी घेऊन आदळावें, तसें त्याला झालें. त्या बारा वर्षें पूर्ण झालेल्या बालमुखांतून युद्धाच्या नुसत्या कल्पनेनें निराशेचा आर्तरव बाहेर येत होता. त्याचे डोळे भीतीनें थरारून, थिजून, काळे पडल्यासारखे वाटत होते.

"तुला माहीत आहे, त्या पिक्चरमध्यें बोल्शेव्हिक लोक अमेरिकासुद्धां घेण्याच्या गोष्टी करीत होते. तुला कळत नाहीं, पण मला ते बोल्शेव्हिक काय बोलतात तें कळतें. थांब, मी आतां अमेरिकेला एका दृष्टीनें मदत करूं शकेन. मी F. B. I. च्या लोकांना मदत करीन. रशियन हेर काय म्हणतात, हें मी अमेरिकन पोलिसांना सांगूं शकेन. अमेरिका किती चांगली आहे. त्या वाईट रशियनांना मी अमेरिकेला दुखवूं देणार नाहीं. तुझ्याकरतां मी अमेरिकेची नीट काळजी घेईन बरं." मोठा झाल्यावर 'अमेरिकन नागरिक व्हायला तुला आवडेल का' असें मीं एकदां त्याला विचारलें असतां मात्र नेहमींसारखें "नाय नाय" म्हणूनच त्याचें उत्तर आलें. "माझ्या देशीं मी परत जाईन...नाहीं... गेलेंच पाहिजे मला स्वदेशीं. त्या रशियनांना मारून लटाव्हियांतून हाकलून दिलें पाहिजे." किती लहान वय! पण त्या दिवशीं एखाद्या मोठ्या माणसासारखा टिंची बोलत होता.

एखाद्या रक्ताचे आनुवंशिक कांहीं गुण असतात कीं नाहीं हें कांहीं मला माहीत नाहीं. तथापि टिंचीची इतर मुलांपेक्षां चाललेली सारखी धावपळ पाहून जेव्हां एकदां त्याची 'केस' पाहणारी मानसशास्त्रज्ञ तज्ज्ञबाई विचारांत पडली, तेव्हां मला तरी ती धावपळ, ती अखंड हालचाल, म्हणजे एकप्रकारें रशियन बॅलेची द्योतक वाटली. एक प्रकारचा नाचच होता तो.

टिंची कम्युनिस्टांचा लाल निशाणवाले किंवा कम्युनिस्ट असा कधीं उल्लेख करीत नसे. पण कां कोण जाणे, त्याला लाल रंग मात्र बिलकूल आवडत नसे.

एकदां आम्हीं त्याला एक बायसिकल दिली. तिला छान लाल रंग दिलेला होता. टिंचीच्या मात्र तो बिलकूल मनास आला नाहीं. तो रंग पाहतांच त्याला अगदीं रडूं कोसळलें. "अरे, मग त्याला निळा रंग लाव" म्हणून आम्हीं सुचविलें पण तें कांहीं त्याला पटेना. "तसें केलें तरी आंत लाल राहील त्याची काय वाट ?" त्यानें प्रश्न केला. कांहीं दिवसांनीं आपोआप त्याला लाल रंगाची संवय झाली. तथापि एवढें खरें कीं त्याला तो रंग कधीं आवडला मात्र नाहीं. त्याचा आवडता म्हणजे निळा रंग. त्याच्या सगळ्या वस्तु निळ्या रंगाच्या असलेल्या त्याला आवडत. एक दिवस सहज म्हणून मीं त्याला कारण विचारलें. तेव्हां "माझे डोळे निळे आहेत ना, म्हणून मला निळा रंग आवडतो" त्यानें उत्तर दिलें. पण मला तरी तें उत्तर जरा चमत्कारिक वाटलें.

कारण अशा प्रकारचा गर्व मुलांत असणें तितकेंसें बरें नव्हतें. शिवाय त्याच्या एकंदर स्वभावाशीं अशातऱ्हेचा अभिमान बराच विसंगत असा वाटे. त्याच्यामध्यें असला बायकीपणा इतर गोष्टींत कधींच दिसून आला नाहीं. पुढें एक दिवस मला त्याचें सारें कोडें अनपेक्षितपणें उलगडलें. त्या दिवशीं तो एका मुलावर रागावला होता. "तो मुलगा बोल्शेव्हिक आहे त्याचे बघ डोळे कसे तपकिरी आहेत ते."

"अरे, पण पिंगट डोळ्यांचा आणि बोल्शेव्हिकांचा कांहीं संबंध ?" मीं विचारलें. त्यावर त्यानें मला कैद्यांच्या छावणींतील मुलांमुलांतील थट्टा सांगितली.

"ज्यांचे डोळे तपकिरी असत त्या सगळ्या मुलांना आम्ही सांगत असूं, तुमचे डोळे तपकिरी आहेत, तुम्ही बोल्शेव्हिक आहांत, तुम्हांला नाहीं मिळणार अमेरिकेला जायला. फक्त निळ्या डोळ्यांचींच मुलें तिथें नेतात." असें म्हणून तो हसूं लागला. "आणि मग कित्येक तीं मुलें खूप रडत."

डोळ्यांचा हा इतिहास ऐकल्यावर मला त्याला निळा रंग कां आवडतो याचा उलगडा झाला. आम्हीसुद्धां आवडूं लागलों, त्याचें कारण आमच्या घरांत असलेले निळे डोळे, असें कुणी समजलें तर फारशी चूक होणार नाहीं.

रशियाच्या विजयाची बातमी ऐकली कीं त्याला बरें वाटत नसे. अशा वेळीं फक्त धर्माचाच त्याला आधार वाटे नी तो प्रार्थना करूं लागे.

रोज रात्रीं निजतांना त्याच्या त्या क्रॉसवरील येशूच्या प्रतिमेसमोर उभा राहून तो प्रार्थना करी. मीहि त्याच्याबरोबर उभी राहून त्याच्या प्रार्थनेचा सूर ओळखून इंग्रजींत प्रार्थना म्हणत असे.

"तुला माझी भाषा कळते ?" चकितच होऊन त्यानें एकदां मला विचारलें.

"छे रे, मला कुठली तुझी भाषा यायला, पण परमेश्वराची प्रार्थना कोणत्याहि भाषेंत केली तरी तशीच लागते कानाला."

"मग म्हण तर."

तेव्हांपासून मी इंग्रजींत व तो लटाव्हिअनमध्यें अशा रीतीनें आम्ही प्रार्थना करूं लागलों. ही गोष्ट टिंची लटाव्हिअन विसरण्यापूर्वीची आहे. पण त्यानंतर एक दिवस तो स्वतःच इंग्रजींत प्रार्थना सुरू करून पुढें लटाव्हिअन म्हणूं लागला. हळूहळू मात्र त्याचे लटाव्हिअन शब्द कमी होऊन इंग्रजी शब्द वाढूं लागले. अखेर अखेर तर तो पूर्ण प्रार्थना इंग्रजींतच करूं लागला.

एक दिवस प्रार्थना झाल्यावर 'क्रॉस' करीत असतांना 'हें ग काय? किती चुकीचें तूं क्रॉस करतेस? थांब मी तुला शिकवतों अं" असें म्हणून त्यानें आपल्या पद्धतीनें मला 'क्रॉस' करायला शिकविलें. टिंची 'ईस्टर्न आर्थोडॉक्स' चर्चचा असल्यानें आम्हां ॲंग्लिकन व रोमन पद्धतीप्रमाणें डावीकडून उजवीकडे न करतां उजवीकडून डावीकडे क्रॉस करी. त्या दिवशीं एकाद्या आज्ञाधारक मुलाप्रमाणें मीं त्याच्यासारखें 'क्रॉस' केलें. एखाद्या निर्वासित मुलाच्या समजुतीखातर मीं एकादे वेळीं पश्चिम पूर्व करण्याऐवजीं पूर्व पश्चिम तऱ्हेनें 'क्रॉस' केलें तर पूर्व व पश्चिम या दोहोंनाहि उत्पन्न करणारा परमेश्वर रागावेल असें कांहीं मला वाटलें नाहीं.

यानंतर त्याला रविवारीं चर्चला व रविवारच्या धार्मिक शिक्षणाच्या वर्गाला पाठविण्याविषयीं कांहींतरी केलें पाहिजे असें मला वाटूं लागलें.

आमचें चर्च तर त्याला एकदम आवडलेंच. लुथेरिअन व आर्थोडॉक्स चर्च प्रमाणें एपिस्कोपेलिअन चर्चचा पूजा-आचार विधीहि चांगला प्रेक्षणीय असतो. त्यामुळें एकदम देवळांत आल्याची त्याची भावना झाली. एक वेळ त्याच्या चर्चमध्यें त्याला घेऊन जावें, असें माझ्या मनांत आलें होतें. पण एक तर तें चर्च कितीतरी मैल दूर होतें, शिवाय कुटुंबाच्या एकतेची भावना निर्माण व्हायला तो आमच्याच चर्चमध्यें असणें जास्त इष्ट होतें. म्हणूनच मीं त्याला आमच्या चर्चमध्यें नेलें. त्याला तें आवडलेंहि. आमच्या चर्चमधील प्रार्थना-संगीत म्हणणाऱ्या लहान मुलांच्याकडे तो मोठ्या उत्सुकतेनें पाहत राही. स्वतः त्या संघांत शिरल्याशिवाय तो खरोखर आमच्या प्रार्थनेशीं एक होणार नाहीं, हें मी जाणून होतें. पण त्या-बाबत एक चांगलीच अडचण होती. टिंचीला आवाज बिलकूल नव्हता. तरी सुद्धां, गळा नाहीं एवढ्या कारणामुळें टिंचीसारख्या धर्मशील मुलाला प्रार्थना-संगीत म्हणणाऱ्या मुलांच्या तुकडींत घेऊं द्यावयाचा नाहीं, हें मला निष्ठुरपणाचें वाटलें.

हा अनुभव असा असतो कीं, त्याची सर्व आयुष्यभर आठवण राहते. याबाबत धर्मोपदेशक, संगीतशिक्षक या दोघांशींहि माझें बोलणें झालें. माझी अडचण मीं त्यांना समजावून सांगितली. त्याला बिलकुल आवाज नसल्याचें कबूल केलें. त्याबरोबरच एका निर्वासित मुलाला अशा रीतीनें प्रत्यक्ष भाग घेऊं देणें धर्म-शिक्षणाचा इष्ट परिणाम करण्याच्या दृष्टीनें कसें आवश्यक आहे, हेंहि मीं त्यांना पटविण्याचा प्रयत्न केला.

माझ्या नशिबानें दोघांनाहि माझें म्हणणें पटलें.

'संगीतापेक्षां मुलांचें महत्त्व जास्त आहे' असें म्हणून त्यांनीं त्याला गाणाऱ्या मुलांमध्यें घ्यायचें ठरविलें.

पहिल्याप्रथम टिंची भिडेनें लाजत असे. पण त्याला गीतसंघांत घेतल्याचा आनंद मात्र झाल्याशिवाय राहिला नाहीं.

टिंची पहिल्यांदा चर्चमध्यें गेला तेव्हां गुडघे टेकून देवाची प्रार्थना करायला नाखूष असे. उभ्यानें शिर नमवून प्रार्थना केली पाहिजे असें त्याचें मत होतें. पण हळूहळू साऱ्यांचें पाहून तो गुडघे टेकून प्रार्थना करूं लागला.

मुलें नवीन संवयी किती पटकन् आत्मसात् करतात याची मला मोठी मजा वाटते. ह्या गोष्टीनंतर दोनतीनच रविवार उलटले असतील नसतील. एके दिवशीं तो मला घरीं सांगत आला, "आमच्यांत किनई एक नवीन मुलगा आला आहे, पण त्याला गुडघे टेकून प्रार्थना करायची असते हेंच मुळीं माहिती नाहीं ग. मला दाखवायला पाहिजे त्याला. पण असं कसं ग? गुडघे टेकायचें हें सुद्धां त्याला कसं माहित नाहीं? मी त्याला सांगितलंसुद्धां, 'अरे वाक कीं चटकन.'"

चर्चच्या संगीत-शिक्षकांनीं टिंचीच्या संगीतावर निराळी अशी मुद्दाम मेहनत घेणें सुरू केलें. त्यामुळें त्याचा कर्कश व जाडा वाटणारा आवाज पुष्कळ नरमला. बोलण्याला एक प्रकारची गोडी आली. या मेहनतीनें त्याच्या एकंदर व्यक्तिमत्त्वांत चांगलीच भर पडली.

टिंची मोठ्या आवडीनें चर्चला येई, संगीतांत भाग घेई, पण रविवारच्या चर्चमधील धर्मशिक्षणाच्या तासाला जायचें मात्र तो साफ नाकारीत असे. अर्थात् त्याला कारणें पण तशींच होतीं.

"तें कांहीं नाहीं, रविवारच्या वर्गाला मी मुळींच जाणार नाहीं" त्यानें एके दिवशीं स्पष्ट सांगितलें. "तुला माहित आहे मुलें तिथें काय बोलतात तीं? फूटबॉल, आणि नाच. मी त्यांना म्हटलें, अरे देवळांत येतां नी हें काय

भलतें बोलणें! त्यावर मला विचारतात कीं 'का तुला नाहीं आवडत फुटबॉल?' मीं त्यांना सांगितलें कीं आवडतो. एवढेंच नाहीं, मी चांगलाच खेळतों. पण तो शाळेंत सोमवारीं. रविवारीं देवळांत नव्हे. एवढेंच नव्हे आणखी कितीतरी वाईट वाईट वागतात मुलें देवळांत. वस्तु काय फेकतात! सारा वेळ 'चुईंग गम' काय चावत असतात! सांग पाहूं बरें कां ग हें वागणें? आणि तें सुद्धां रविवारीं नी देवळांत? तें कांहीं नाहीं, मी बिलकुल जाणार नाहीं त्या तासाला."

त्यानंतर खरोखरच तो गेला नाहीं. त्याच्या म्हणण्यांत तथ्य होतें. जवळजवळ वर्षपर्यंत तो धर्मशिक्षणाच्या वर्गाला जात नसे. त्यानंतर संगीत संघाकरितां जो वेगळा वर्ग असे त्याला तो जाऊं लागला. त्या संघांतील शिस्त आचारबद्धता त्याला फारच आवडली.

आणखी एक वर्ष त्यानें त्या वर्गांत काढलें. तेवढ्या अवधींत त्या चर्चची दीक्षा घेण्यापर्यंत त्यानें सहज मजल मारली.

टिंचीला धर्माची दीक्षा देण्यांत आली तेव्हां त्याला फारच आनंद झाला. "तुला ठाऊक आहे, अजूनपर्यंत कोणत्याच चर्चनें मला दीक्षा दिली नव्हती." त्यानें मला हळूच सांगितलें.

एक दिवस तो असाच घरीं आला व प्रार्थनागीत संघांतून निघायच्या गोष्टी करूं लागला. त्या वेळीं जरा कांहीं मनाविरुद्ध झालें कीं सगळ्याच बाबतींत तो निघून जायच्या गोष्टी करूं लागे.

"कां रे, मला तर वाटलें तुला आवडतें त्या संघांत!" मीं त्याला विचारलें.

"आवडतें म्हणजे फारच आवडतें. तरीसुद्धां सोडायलाच पाहिजे मला तो संघ."

"कां कांहीं 'वाईट बिईट' वागलास म्हणून काढताहेत कीं काय तुला?"

"वाः ग. देवळांत मी वाईट वागेन, असें वाटतें तुला? पण मला किनई फसवायचें नाहीं."

"म्हणजे काय?"

"त्यांनीं किनई आम्हांला सगळ्यांना गाण्याबद्दल पैसे द्यायचें ठरविलें आहे. तसे पैसे मीं घेणें म्हणजे फसविण्यासारखेंच नाहीं का?"

"पण तुला तर मुलांना पैसे देतात हें माहीत होतें पूर्वीपासून. तेव्हां कुठें कांहीं नाहीं म्हणालास तें?"

"अग दुसरीं मुलें किती सुंदर गातात पण मला तर बिलकुल गातां येत नाहीं.

अशा वेळीं पैसे घेणें म्हणजे परमेश्वराला फसविण्यासारखें नाहीं का? छे, मला नाहीं तें करायचें."

"त्याचें काय, देवानेंच तुला जसा गळा दिला आहे तसा गातोस तूं. मग देवाला कशी बरं तक्रार करतां येईल?"

"तें खरें पण त्याबद्दल पैसे घेणें गोष्ट वेगळी." लवकरच आपल्या शिक्षकांपुढें त्यानें हें आपलें म्हणणें मांडलें, तेव्हां त्यांनीं त्याला समजावून सांगितलें कीं, "आम्ही तुला पैसे देतों तें प्रार्थनासंगीताबद्दल नसून देवळांतल्या इतर कामांबद्दल देतों." तेव्हां कुठें त्याचें समाधान झालें. त्यानंतर प्रार्थनासंगीताचें ध्वनिमुद्रीकरण करणें इ. देवळांतील कामें तो फारच चोख रीतीनें करूं लागला. पुढें पुढें इतर अमेरिकन मुलांसारखा देवळाच्या बाहेर आला कीं त्यांच्यांत मिसळून खेळूंहि लागला. कांहीं दिवसांनीं वयानुसार त्याचा आवाज फुटल्यानें तो आपोआपच गीतसंघांतून निघाला. तरीसुद्धां त्याच्यावर देवळांतील छोट्याशा जबाबदारीचें एक काम सोपविण्यांत आलें व त्याचा नी चर्चचा संबंध कायम राहिला. टिंची वृत्तीनें मोठा धार्मिक. देवळांत असो वा नसो, रविवार असो नाहीं तर सोमवार असो, धर्मावर त्याची मोठी अढळ श्रद्धा.

हळूहळू त्याचा आवाज पूर्ण पुरुषी झाला. त्यानंतर गंभीर पण सुरेल सुरांत तो प्रार्थनागीतें गाऊं लागला. त्याच्या आवाजाला एक प्रकारचा सुरेलपणा आल्यानें, बोलतांना सुद्धां त्याचें बोलणें मोठें गोड वाटे.

माणूस आवाजानें किती छाप पाडूं शकतो याचें तें एक छान उदाहरणच होतें.

घरीं, शाळेंत, चोहोंकडे बायकांशींच टिंचीचा संबंध येत असल्यामुळें पुरुषी असलेल्या या गीतसंघाचा अनुभव टिंचीला मिळाला हें एकप्रकारें बरें झालें. याच कारणाकरतां, बालवीरचमूंत त्यानें नांव घालणें बरें, असें मला वाटूं लागलें. बालवीरपथकाचे त्याचे मास्तर फारच उत्तम होते. शिवाय बालवीरांचीं कामें करण्यांत त्याला इतकी कांहीं मजा वाटे व समाधान मिळे कीं तें एरवीं शाळेंत कधींच मिळालें नाहीं. आमच्या घरांतील तीनहि मुलगे लहानपणीं बालवीरपथकांमध्यें असून त्यांनीं घरांत तीन गरुडपक्षी (मानचिन्हें) आणले होते. आतां चौथा टिंची. तो पण तिकडेच गेला. परक्या भाषेंत बालवीरांचे सारे नियम पाठ करायचे म्हणजे बरेंच अवघड काम होतें पण टिंचीनें तेवढें मोठ्या चिकाटीनें केलें. या बाबतींत डेव्हिडनें त्याच्यावर बरीच मेहनत घेतली. तो टिंचीला प्रत्येक नियम समजला आहे कीं नाहीं हें नीट विचारून पाहत असे.

नियमांतल्या इंग्रजी शब्दांचे उच्चार टिंची मोठे मजेचे करी. ओबिडिअन्ट ऐवजीं ओवीऽऽडिन्ट, चीअरफुलबद्दल चिऽऽफ, थ्रिफ्टी ऐवजीं ट्रिऽऽफ आणि रेव्हरंट बद्दल 'स्काऊट रेंट' असतो असें तो सांगे. "रेंट म्हणजे काय" डेव्हिडनें त्याला चिडवूनच विचारलें "चर्चमध्यें हसा-खिदळायचें नाहीं" टिंचीचें थोडेसें कुऱ्यांतच उत्तर झालें.

"ओबिडिअंट म्हणजे काय?"

"तुम्हांला सांगितलें तें करायचें."

"चीअरफुल?"

"हसत राह्यचें, पण उगीच गडबड नाहीं करायची."

"थ्रिफ्टी?"

"बँकेंत पैसे ठेवायचे."

अशा रीतीनें सारे नियम येऊं लागल्यावर तो टेन्डरफूट झाला.

हळू हळू, चढत चढत तो वरच्या तुकडींत जाऊं लागला. बालवीरांच्या नियमाप्रमाणें आपण खरोखर आयुष्य घालवूं शकतों, हें सिद्ध करण्याच्या मार्गाला तो आतां लागला होता.

बालवीरांच्या ह्या शिक्षणानें, नकळत कां होईना, टिंचीची एक वाईट संवय गेली. पूर्वी बंदूक हाताळीत असतां, त्याला एक प्रकारचा आसुरी आनंद होत असतांना दिसे. नवीन आला, तेव्हां तर पुष्कळंच वेळां तो आपली खेळांतली बंदूक आमच्यावर रोखून मी तुम्हांला ठार करणार आहें, असें सांगे. ती बंदूक खेळांतली असे ही गोष्ट खरी, पण ती रोखून ठार करायच्या तो गोष्टी करी, त्या मात्र खोट्या नव्हत्या. त्याच्या मनाचा कोंडलेला संताप बाहेर पडून, तो ते उद्गार काढी. "तुम्ही त्याला खेळांची का होईना बंदूक देतांच कशाला?" कित्येकजण मला विचारीत.

बंदुकी काढून घेणें मला शक्य असलें, तरी त्यामागें असलेली सुप्त भावना जोंपर्यंत आम्हांला काढून घेतां येत नव्हती, तोंपर्यंत त्या बंदुकी काढून घेण्यांत कांहींच अर्थ नव्हता. अखेर एके दिवशीं मीं त्याला नीट समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. "टिंची, तूं आतां मोठा झाला आहेस. या खेळांतल्या बंदुकी घेऊन खेळण्याचें कांहीं तुझें वय राहिलें नाहीं. तेव्हां मी तुला त्या फेकून दे असा जरी आग्रह करीत नाहीं, तरी मोठा झाल्यासारखा त्या तूं आतां बाजूला ठेवाव्यास असें मला वाटतें. मी उचलून त्या सहज बाजूला ठेवूं शकतें, पण मला तें नको

आहे. तूं स्वतः मोठ्यासारखें वागून त्या बाजूला ठेवाव्यास असें मला वाटतें. छोट्या पोरांच्या त्या बंदुका आहेत."

"पण मग शिपाई वापरतात ते ? ते कांहीं छोटीं पोरें नव्हत."

"तें खरं पण शिपाई रणांगणावर असतात. चांगल्या आरामशीर घरांत नाहीं. इथें कशाला बंदुका ?"

यानंतर कांहीं दिवसांनीं आपण होऊनच त्यानें त्या बंदुका वरतीं पोटमाळ्यावर नेऊन टाकल्या. तेथें धूळ खात, गंज चढत त्या तशाच पडून राहिल्या. इतकें झालें, तरी मारायची खुमखुमी पूर्णपणें त्याच्या मनांतून जायला आणखी एक वर्ष लोटावें लागलें. त्यावेळीं माझ्याकडे येऊन आपण होऊन त्यानें बंदुकीची गोष्ट काढली. "तूं म्हणत होतीस तें खरें आहे. बंदुकी खरोखरच चांगल्या नाहींत, हें आतां मला कळलें. तूं मला इतकी ममतेनें वागवितेस, तेव्हां मीपण तुझ्याकरतां एक गोष्ट करतों. घे या बंदुकी नी दे तूं फेकून."

मीं पूर्वीच बंदुकी फेकून दिल्या असत्या तर हा बदल घडून आला नसता. त्या दिवशीं एकप्रकारें आपण खरोखरी जिंकलें, असें मला वाटूं लागलें. मीं त्या फेकल्या तर नाहींतच पण लपवून सुद्धां ठेवावयचा प्रयत्न केला नाहीं. एकदां फक्त त्यानें 'वेस्टर्न पिक्चर्स' पाहत असतां बंदूक जवळ ठेवण्याविषयीं मला विचारलें, पण तें चित्र संपल्यावर त्यानें ती बंदुक परत दिली.

बंदुकीशीं खेळतांना दिसून येणाऱ्या त्याच्या आसुरी वृत्तींत फरक पडतो आहे असें दिसूं लागल्याबरोबर, कधीं केलें नाहीं असें धाडस करून, आणखी एक पाऊल पुढें टाकायचें मीं ठरविलें.

"तूं आतां खऱ्या बंदुकीनें नेम मारायला शिकावेंस" असें मीं त्याला सुचविलें. हे धडे बालवीरांच्या कॅम्पमध्यें शिक्षकांच्या देखरेखीखालीं घ्यावयाचे होते. त्यामुळें मला कांहीं हरकत वाटत नव्हती. बंदुकीच्या गोळ्या विकत घेण्याकरतां मीं त्याच्या हातावर पांच डॉलर ठेवले. त्या दिवशीं मी कोणतें धाडस करीत आहें, याची मला पुरी कल्पना होती.

"तूं आतां युद्धाच्या छावणींतून आलास तेव्हांसारखा राहिला नसून पुरा बदलला आहेस हें मला कळलें आहे, म्हणूनच मी तुला नेमबाजीचे धडे घे म्हणून म्हणतें आहें. बंदूक कशी धरायची तें नीट शिकून घे नी मला सांग तुला कसं काय वाटतं तें," मीं त्याला समजावणीच्या स्वरांत शांतपणें सांगितलें.

उन्हाळ्याच्या शेवटीं बालवीरांच्या कॅम्पमधून परत आल्यावर, "नेम धरायला

शिकलास कीं नाहीं ? त्यासंबंधीं काळजी कोणती घ्यावी लागते ? त्याचे नियम काय ? किती डॉलर खर्चलेस गोळ्यांवर ?" इ. प्रश्न मीं भराभर त्याला विचारलें. पण मला मिळालें तें उत्तर असें:

"नाऽऽऽय, तुला काय वाटतें पैसे नुसते नेम मारण्याकरतां खर्चीन होय ? 'बीऽचे' असा एक आवाज आणि खलास तुमचे पैसे ! तें कांहीं नाहीं, मी दुसरें कांहीं तरी करीन त्या पैशांचें."

"म्हणजे बंदूक चालवायला तूं शिकला नाहींसच कीं काय ?"

"शिकलों ग, पण माझा नेमच चुके. खुणेवर मुळीं लागतच नसे नीट. तेव्हां मीं म्हटलें, जाऊं द्या. यापेक्षां होडी घेतलेली काय वाईट."

तो मोठा झाल्यावर आपल्याला चांगला नेम धरतां येत नाहीं हें कळूं लागल्याबरोबर त्याचें बंदुकींतलें लक्ष आपोआप कमी झालें.

एकदां शनिवार-रविवारच्या सुट्टींत बालवीरांचा कॅम्प बाहेरगांवीं ठरवला होता. टिंची जायला कांकूं करूं लागला.

"मी गेलों तर तुझी मला आठवण येईल सारखी. तुला पण येईल का ग ?"

"नाहीं तर, मला नेहमींच तूं बाहेर गेलास कीं आठवण येते. घर कसं सुनं सुनं नी भकास वाटतं."

"मग तर मी जातच नाहीं. तुला दुखवून कशाला जायचं ?"

"वाः असं कुठें झालंय. तूं जा. छान मजा वाटेल तुला. आल्यावर सगळंसगळं मला सांग अं."

"पण मला जमिनीवर निजायची भीति वाटते ग. साप खाऊन टाकतील मला."

"वेडा कुठचा ?"

मोठ्या नाखुषीनेंच त्यानें आपली बालवीरांची पिशवी भरली. सामान ठेवतांना टूथब्रश, साबण, टॉवेल, स्वच्छ मोजे यांच्याबरोबरच अत्यंत काळजीपूर्वक त्यानें आपली प्रतिमा पण आंत ठेवली. सापाच्या भीतीनें त्याच्या मनांत चलबिचल झाल्याबरोबर फिरून तो पूर्वीच्या वळणावर आला. या खेपेला मात्र त्यानें तीनऐवजीं दोनच चड्डया घातल्या.

बाहेर पाऊल टाकतांना घराच्या कठड्यावर हात फिरवण्याकरतां जरासा तो थांबला. कठड्यावर प्रेमानें हात फिरवीत जवळजवळ मुक्तछंदांतच तो उद्गारलाः

"निरोप घेतों तुझा आतां मी अति लाडक्या घरा,
तुझ्याविण मला नसे आसरा,
परतुनि येइन तेव्हां सुद्धां इथेंच अस तूं घरा
खरोखर माझ्या 'प्रेमळ घरा'."

"काय रे हें प्रेमळ घर म्हणजे काय?" मीं विचारलें.

टिंची जरा रागावल्यासारखाच झाला.

"हें काय, तुला इंग्रजी शब्दसुद्धां कळत नाहींत? थांब अं. कसं सांगूं दुसऱ्या शब्दांत? प्रेमळ घर म्हणजे ज्या घरांतलीं माणसें ममताळू आहेत तें. तुला ममताळू कळतें ना?"

"हो 'ममताळू' कळतें मला." मीं उत्तर दिलें.

"आणि किनई तिथें माणसाला पक्कें सुरक्षित वाटतें. कळलें?"

"हो" आमच्या जुन्या घराला एवढें कोणींच गौरविलें नव्हतें.

मीं त्याला स्टेशनवर नेलें, तेव्हां पिशव्या, होल्डॉल, कढया, टॉर्च, सुऱ्या, लहानशा कुऱ्हाडी वगैरे सामानाच्या ढिगाऱ्याभोवतीं मुलें उभींच होतीं. 'काम केल्यानें माणूस शिकतो.' या तत्त्वावर टिंचीनें स्वतःचें तिकिट स्वतःच काढलें. मीं त्याला गोल सफरीचें अर्धें तिकीट मागायला सांगितलें होतें. त्यानें तिकीट मास्तरांना गुड मॉर्निंग करून "मला कृपा करून 'अर्धें गोल तिकीट' द्या" सांगितलें. मास्तर हंसूं लागले. "तुझें वय काय?"

"कुणास ठाऊक किती आहे तें, पण आमच्या बाई म्हणतात तुला या वर्षी बारावें लागेल." बारावें लागण्यापूर्वीं तो कॅम्पला गेला होता.

गाडी धाड धाड करीत आली. टिंचीचें धैर्य गळून तो एकदम माझ्याकडे वळला. टिंची मला आई म्हणून कधींच हाक मारीत नसे. त्याच्या दृष्टीनें आई आणि मुलगा हे शब्द मेरी व येशू या संबंधांत वापरायचे असें असावें. तो मला नेहमीं 'मिसिस' म्हणे. पण आतांशें तो एक नवा शब्द शिकला होता. 'मॅडम' ह्या शब्दांत त्याला वाटणारें प्रेम, आदर, सारें कांहीं व्यक्त होतें अशी त्याची भावना झाली होती, म्हणून त्या दिवशीं पहिल्यानेंच तो शब्द त्यानें वापरला.

"हां सगळ्यांनीं चढा आतां' म्हणून कंडक्टरनें सांगतांच आपला नेहमींचा युरोपियन रुबाब सोडून टिंचीनें दोन्ही हातांनीं माझ्या मानेला एकदम मिठीच मारली आणि माझा मुका घेतला.

"येतों मॅडम. मी येईपर्यंत नीट सांभाळून राहा बरं" असें सांगून स्वारी

हात हलवूं लागली.

"आम्हीं स्वयंपाक केला." कॅम्पमधून घरीं आल्यावर आम्हांला टिंचीनें बातमी देण्यास सुरवात केली.

"काय केलेंस?"

"मीं घिरडें केलें."

"वा, छान." वा "आणखी मी 'बिसाइड दी एग' पण शिजवलें."

त्याला लाजल्यासारखें वाटूं नये म्हणून तो बोलला कीं नेहमीं आम्ही समजल्यासारखें दाखवीत असूं. पण आज तो काय सांगतो, हें आम्हांला कळेच ना. हासायचें म्हटलें तर तो शरमिंदा होईल म्हणून आम्ही हसूं दाबून शक्य तोंवर समजल्याचा आव आणीत होतों. पण तें साधेना.

"तुम्हांला नाहीं कळलें काय तें?"

"नाहीं बाबा."

"वा नेहमीं तर अंड्याजवळ नसतें का? अगदीं पातळ पातळ, पांढरे पांढरे तुकडे असतात. तळले कीं छान खरपूस होतात नी वास पण खमंग येतो. नेहमीं अंड्याजवळ नसतात का?"

"ह्यात्तिच्या बेकन होय" आम्ही सगळीं एकदमच ओरडलों.

आम्हांला कळल्यानें टिचीला फारच आनंद झाला कारण त्यानें तें तळून तयार केलें होतें.

बालवीरांच्या दुसऱ्या वर्गाची परीक्षा जेव्हां तो पास झाला तेव्हां नेहमींपेक्षां आपण फारच कांहीं तरी केलें असें त्याला तर वाटलेंच पण सर्वांनाहि वाटलें.

या दुसऱ्या वर्गाच्या अभ्यासक्रमांत प्राथमिक उपचार व शुश्रूषा याचेंहि शिक्षण घ्यावें लागतें. पण प्राथमिक ह्या शब्दानें त्याचा मोठा गोंधळ उडे. इतका कीं एकदां तो खरोखर रागावला सुद्धां. "मी दुसऱ्या वर्गात नी तुम्ही 'प्रथमोपचार' कसें म्हणतां? मला प्रथमोपचार हें काय तें माहीत सुद्धां नाहीं. मी 'फर्स्ट एड' नाहीं करीत, 'सेकंड एड' करतों."

बोर्डापुढें त्याची परीक्षा झाली तेव्हां त्याची भाषेची अडचण लक्षांत घेऊन भाषेपेक्षां त्याला काय येतें नी काय नाहीं हें पाहून त्यांनीं त्याला पास केलें.

अर्थातच तेव्हांपासून घरांत जरा कोणाला लागलें, कापलें कीं, लगेच आम्हांला 'सेकंड एड' मिळते हें सांगणें नकोच.

सर्व बालवीर मुलांचा एक वार्षिक मेजवानीचा समारंभ असतो त्या दिवशीं त्यांना त्यांचीं चिन्हें व पदकें देण्यांत आलीं. सर्व मुलांबरोबर टिंची पण आपलें दुसऱ्या वर्गाचें पदक व चिन्ह लावून गणवेषांत उभा होता. आम्ही सर्वजण समारंभाला हजर होतों. आमची मित्रमंडळी, शेजारी, नातेवाईक, शाळेचे शिक्षक, सारे टिंचीकरतां मेजवानीलासुद्धां आले होते. तो आल्याबरोबर आम्हीं खूप टाळ्या पिटल्या.

त्या रात्रीं तरी त्याला एकटें वाटलें नसेल. डेव्हिडनें आपलें नांव आरमारांत दाखल केलें होतें तरी तोसुद्धां आपल्या गणवेषांत टिंचीचा समारंभ पाहण्यास हजर होता. डेव्हिडचा आरमारी गणवेष टिंचीला फारच आवडला. त्यानें त्यावर हळूच हात फिरवला, नी मग किंचित् मागें जाऊन तो फिरून पाहतच राहिला. त्यानंतर आपल्या चमत्कारिक इंग्रजींत एकदम तो डेव्हिडला म्हणतो, "हा गणवेष तुला आवडतो? तूं ठेवतो?"

"हो, मी ठेवतों" हसत हसत डेव्हिडनें उत्तर दिलें.

"पण तुझा गणवेष?"

टिंचीनें आपल्या बालवीराच्या गणवेषाकडे पाहिलें.

"हो, मला आवडतो. मी ठेवतों." त्यानेंहि गंभीरपणें उत्तर दिलें.

यानंतर एकंदरींत मजेनें दिवस चालले होते. मात्र अजूनहि टिंची नीटसें वाचूं शकत नसे, किंवा वाचण्याचा प्रयत्नहि करीत नसे. तरीसुद्धां पांचव्या वर्गाच्या बगीचाला पाणी घालणें, आपल्या वर्गाच्या सोनेरी माशांना खायला घालणें, इ. कामें तो अत्यंत चोखपणें पार पाडीत असे. अंकगणितांत तर टिंची चांगलाच होता. भूगोलाची त्याला मोठी मजा वाटे; नव्हे, त्याला तो तास आवडतच असे. मेक्सिकोवरच्या एका खेळांत वर्गामध्यें त्याला स्पॅनिश माणसाची भूमिका देण्यांत आली होती. त्याचे निळे डोळे व सोनेरी केस असल्यानें तो एकाद्या स्पॅनिश माणसाप्रमाणें दिसत नसला तरी त्यानें सुंदर स्पॅनिश पोषाख घातल्यानें व एक प्रकारचा स्पॅनिश नाच केल्यानें त्याला खूपच मजा वाटली. अर्थात् हा नाच फारसा स्पॅनिशवरून नसून रशियन बॅलेच्या धर्तीवरच होता इतकें सांगितलें कीं पुरे.

घरीं तर आतांशा तो इतका चांगला वागूं लागला होता कीं, कधीं कधीं त्या वागण्याला दृष्टच लागेल व भूत मागल्या वळणावर जाईल कीं काय अशी आम्हांला भीति वाटे.

डिसेंबरमध्यें तसें झालेंच. एकादा सुप्त ज्वालामुखी जागा होऊन तप्त रस फेकूं लागावा तसाच कांहींसा प्रकार झाला. बूटपॉलिश करण्यावरून सगळं वादळ उठलं.

त्या दिवशीं ट्रोचाच्या लक्षांत न राहिल्यानें, तिनें त्याला त्याचे बूट पॉलिश करायला सांगितलें व आग्रह धरला. लगेच टिंची भडकून किंचाळूं लागला. "करत नाहीं", "मी नाऽकरीत", "नाऽऽय करीत", त्याचा आरडाओरडा सुरू झाला. त्यावेळीं मात्र मी रागावलें व दरडावून त्याच्यावर अंगावर ओरडलें. "करत नाहीं—मी नाऽ करीत—नाऽऽय करीत अं! बघ तुला एक गोष्ट सांगतें आहें. ख्रिसमस जवळ आला आहे. त्या वेळीं तुझा असला त्रागा आणि नकारघंटा सारख्या वाजायला नको आहेत मला. मेली इथें 'नकारघंटा', तिथें 'नकारघंटा', सदान् कदा कसली? आणखी एकदां नकारघंटा बडव आणि पाहा, लगेच तूं आणि तुझी ती 'नकारघंटा', बाहेरच जावें लागेल दोघांना. कळलें? मग शांतता तरी जरा नांदेल घरीं."

आश्चर्य हें कीं माझें बोलणें ऐकतां ऐकतां टिंची हसतच सुटला. "नकारघंटा हीऽहीऽहीऽ! म्हणे 'नकारघंटाऽ' कुठून आणलीस ही घंटा?" असें म्हणून तो इतका पोट धर-धरून हसूं लागला कीं, अखेर खालीं गालिच्यावर हातपाय हवेंत उडवून लोळूं लागला. त्याबरोबरच त्याची नकारघंटा पण जी बंद पडली, ती फिरून कांहीं कधीं वाजली नाहीं. याचा अर्थ असा नाहीं कीं तो इतर मुलांसारखा रुसत फुगत नाहींसा झाला. मधून मधून तो रुसे फुगे. सारें होई. पण एवढें खरें कीं मागल्यासारखें वादळ कधीं झालें नाहीं. त्यामुळें आमच्या घरांत बरीच शांति नांदूं लागली. मात्र एवढा धिंगाणा झाला तरी टिंचीनें बूटपॉलिश न करण्याचें आपलें व्रत कांहीं सोडलें नाहीं. त्या बाबतींत तो कुणाचेंच ऐकत नसे. आणि अगदीं लढाईचाच प्रसंग आला, तर नमे थोडासा. पण जास्त नाहीं.

'नकारघंटेचें' वादळ ओसरल्यावर, टिंची मोठ्या उत्साहानें ख्रिसमसच्या तयारीला लागला.

पहिल्यानें आपल्याजवळचे सांठवलेले सर्व पैसे खर्च करून, त्यानें मला एक ख्रिसमसची भेट म्हणून आणली. ती ख्रिसमसच्या कागदांत छान रीतीनें गुंडाळून, त्यानें त्यावर एक सुंदरशी हिरवी फीत बांधली. "आतां ख्रिसमसच्या दिवशीं उघडायचें अं" म्हणून लपवून पण ठेवली. दोनचार दिवस गेल्यावर मात्र एवढें 'गुपित' पोटांत ठेवणें त्याला जड जाऊं लागलें. कसाबसा Thanksgiving दिनापर्यंत त्यानें दम काढला. पण त्यानंतर मात्र हवेंत ख्रिसमसचा रागरंग येऊं

लागला. सगळीकडे ख्रिसमस संचारलेला पाहून एक दिवस त्यानें ती भेट आणली आणि हळूच माझ्या मांडीवर ठेवली.

"बघ, तुला ख्रिसमसकरतां काय आणलें आहे तें. तूं आतां उघडलेंस हें पार्सल तरी चालेल."

"वाः आतां उघडून कसें चालेल? ख्रिसमस सकाळकरतां ठेव तसेंच."

"पण आत्तां उघड ना ग."

"अरे, पण किती छान बांधलें आहेस तें कशाला उगीच बिघडवायचें?" मीं थोडेसें आडवलें.

"मी बांधीन फिरून तसंच. पण उघड एकदां, पाहा, नी मला सांग माझी भेट तुला आवडते का?"

मीं फीत सोडली. सारे कागद उलगडले. आंत पाहतें तों एक सुंदर कटग्लासची दौत. मी माझें फाउन्टनपेन नेहमीं शाईच्या बाटलींत बुडवून लिहीत असें; तेव्हां मला एक दौत पाहिजे आहे, असें त्याच्या मनानें घेतलें असावें. जुन्या तऱ्हेच्या कलाकुसरीची, फारच सुंदर होती ती दौत. त्यानें ती जुन्या कलाकुसरीच्या सामानाच्या एका दुकानाच्या खिडकींत पाहिली. तेव्हांपासून मला देण्याजोगी ती भेट आहे, असें त्याच्या मनानें घेतलें. मी लेखन करीत असल्यानें त्याचा मला विशेष उपयोग होणार होता. शिवाय सूर्याचीं किरणें तीवर पडलीं कीं, तीमधून किती तरी इंद्रधनुष्यें चमकूं लागत. त्यामुळें तर ती दौत त्याला फारच आवडली होती.

सूर्यप्रकाशांत धरून ती चमकतांना पाहिल्यावर तर ती दौत मला फारच आवडली.

"तुला आवडली?" त्यानें विचारलें.

"फारच!"

नंतर एक क्षण जरा कचरतच त्यानें विचारलें, "तूं मुका घेऊन ठेवणार ती?"

त्यानें जेव्हां तें पहिलें पाकिट मला दिलें होतें, तेव्हां मीं त्याचा मुका घेऊन माझी पसंती दर्शविली होती. मला त्याची आठवण झाली.

"हो बरं, मी ठेवणार आहें" असें म्हणून मीं त्या दौतीचा मुका घेतला.

टिंचीला समाधान वाटलें. त्यानें फिरून ती एका नव्या कागदांत गुंडाळली. त्यानंतर वरची फीत जरा चुरली आहे असें त्याला वाटलें तेव्हां कार्डबोर्डच्या पेटींत ठेवण्यापूर्वी त्यानें ती फीत काढून तिला इस्त्री केली. नंतर ख्रिसमस-

करतां इतर आणलेल्या भेटीच्या वस्तूंत, त्यानें ती फिरून नीट गुंडाळून अगदीं व्यवस्थित तयार करून ठेवली.

'थँक्स गिव्हिंग (आभारप्रदर्शन) डे' नंतर घरच्या सगळ्या मंडळीकरतां, जवळपासच्या मित्रांकरतां, त्यानें निरनिराळ्या भेटी बांधून तयार ठेवल्या. आमच्या त्या गांवाबद्दल आपलेपणा वाटत असल्याचें तें द्योतकच होतें. आपलेपणाची भावना त्याच्या मनांत आतां पक्कें मूळ धरूं लागली होती. त्यानें त्या साऱ्या वस्तू नीट बाजूला लपवून ठेवल्या. मधून मधून तो ती दौत मात्र काढून आणी व माझ्या मांडीवर ठेवून मला उघडायला सांगे. 'आतां नको, ख्रिसमसा-करतां राहूं दे' असें म्हटलेलें त्याला पटत नसे. 'आत्तांच उघड' असा तो आग्रह धरी. "अरे पण आतांच मला ही भेट दिलीस तर मग ख्रिसमसला काय?" असें मीं कधीं म्हटलें कीं 'त्या वेळीं मी तुला दुसरें कांहींतरी देईन', असें तो सांगत असे. उघडल्यावर दर वेळीं तो मला 'तूं मुका घेणार?', 'ठेवणार?' असें मोठ्या आस्थेनें विचारी व मीं हो म्हणून सांगितलें कीं, त्याच्या आनंदाला सीमा राहत नसे. ख्रिसमसची सकाळ उजाडेपर्यंत त्याचा हा क्रम चालू होता. ख्रिसमस उजाडला. मोठ्या अभिमानानें त्यानें ती दौत माझ्यापुढें ठेवली. आजसुद्धां ही जी मी टिंचीची हकीकत लिहितें आहे ती त्याच दौतींत फाउंटन पेन बुडवून.

ख्रिसमसच्या सणाची तयारी करण्याचा टिंचीला दांडगा उत्साह चढला होता. त्यानें ख्रिसमसचें झाड आणून तें ऊन येत असलेल्या व्हरांड्यांत ठेवलें.

"हां, तिथें थांब" त्यानें त्या झाडाला बजावलें.

तें झाड नीट उभें करतां यावें, यासाठीं बैठक म्हणून एक चांगलाच आधार त्यानें शोधून काढला.

"तूं अगदीं काळजी नको. तुझा 'बाप' मेला आहे—मी तुला झाड बसवून देईन."

त्या वर्षीं, आम्हीं मिळेल त्यांतलें मोठें झाड आणलें होतें. मनांत म्हटलें, टिंचीचा चेहरा फुलून येईल, एवढें झाड पाहून. तेव्हां होऊं द्या जरा खर्च!

आम्ही नेहमीं आणीत असूं त्याच्या जवळ जवळ दुप्पट मोठें तें झाड होतें. एक खोड नी त्याला दोन सुरेख मोठ्या फांद्या. तें उभें धरलें तेव्हां अगदीं छताला लागून सगळीकडे त्याच्या सुंदर सुवासिक फांद्या पसरलेल्या दिसूं लागल्या. गुडघे टेकून टिंचीनें वर पाहिलें आणि त्याला इतका आनंद झाला, "बघ ग

किती प्रचंड! Tannenbaum आहे तें, अगदीं राक्षसी." टिंची 'राक्षसी' हा नवा शब्द शिकला होता. नंतर त्यानें शोभिवंत दिसेल अशा रीतीनें त्याच्या फांद्या कापल्या, त्यांवर दिव्यांच्या माळा अडकविल्या. प्रथम कांहीं केल्या ते दिवे लागतच ना. मला वाटतें नेहमींच सगळीकडे असें होतें.

"काळजी नको. मी इलेक्ट्रिस छान बसवतों." असें म्हणून आपल्या तांबड्या सायकलवरून सत्राशेंसाठ दुकानांत खेपा घालून, वेळेनुसार स्वतःचे पैसे खर्च करून, निरनिराळ्या रंगाचे दिवे त्यानें आणले व फारच शोभिवंत दिसतील असे बसवले.

गोठा, येशूचा पाळणा तयार करायचें काम आम्हीं त्याच्यावरच सोपवलें होतें. खरोखर आजवर झालें नव्हतें इतक्या सुंदर रीतीनें त्यानें तें सारें सजवलें. गोठ्यांत जन्मलेल्या त्या बालकावर नेमका एक प्रकाशकिरण पडावा पण तो प्रखर न दिसतां, स्निग्ध असा दिसावा, याकरितां त्यानें किती तरी मेहनत घेतली.

बैल, गाढव, मेंढरें, अगदीं खरेंखुरें गवत ठेवून त्यांत उभीं केलीं. उंट, राजे आणि मेंढपाळ, त्या गोठ्याच्या दारापाशीं गुडघे टेकून ठेवले.

गोठा झाल्यावर "बघ कसा झाला आहे तो!" असें म्हणून मोठ्या विजयी मुद्रेनें त्यानें आम्हांला पाह्यला बोलावलें.

टेलिव्हिजनवर ख्रिस्तजन्माचीं चित्रें पाहत असतां त्याचें अंतःकरण अगदीं भरून आलें. बेथलेम शहरांत मेरी आणि जोसेफ दारोदार हिंडत असतां, त्यांना कुठें खोली मिळेना, हें पाहून त्याच्या डोळ्यांतून टपाटप पाणी गळूं लागलें.

"का ग त्यांना कोणी जागा देत नाहीं? कित्ती वाईट, नाहीं?"

राजा हेरॉड बाल येशूला मारील कीं काय अशी त्याला सारखी भीति वाटत होती.

तें 'पवित्र कुटुंब' जेव्हां एकदांचें इजिप्तला सुरक्षित पोहोंचलें तेव्हां टिंचीसाठीं म्हणून मला एक प्रकारें बरें वाटलें. पण टिंचीचे हुंदके मात्र चालूच होते.

"अरे आतां त्यांना कसली भीति नाहीं" मी त्याचें समाधान करण्याकरतां त्याला सांगितलें.

"छे ग, अजून क्रास येईल तो. मला येशूकरतां भारी वाईट वाटतें." त्याचें मन इतक्या रीतीनें अस्वस्थ करून सोडणारें तें चित्र त्यानें पाहूं नये म्हणून त्याचें मन दुसरीकडे वेधायचा मीं खूप प्रयत्न केला. पण व्यर्थ! चेहरा लाल करून,

रडून रडून डोळे सुजले, तरी शेवटपर्यंत तो तो चित्रपट पाहत होता. ख्रिसमसच्या संध्याकाळच्या प्रार्थनेच्या वेळीं त्यानें प्रार्थनासंगीत संघांत भाग घेतला. सकाळीं पण देवळांत जाऊन त्यानें गाण्यांत भाग घेतला.

एकंदर ख्रिसमसच्या धार्मिक स्वरूपाचा त्याच्यावर एवढा परिणाम झाला होता कीं, दुपारीं टेलिव्हिजनवर 'काऊ बॉय'चा चित्रपट सुरू झाल्यावर "आज येशू-ख्रिस्ताचा दिवस, मग असा चित्रपट पाहिला तरी चालेल का ग?" म्हणून त्यानें मला प्रश्न केला; तेव्हां, त्याचें मन दुसरीकडे लागावें या हेतूनें मीं त्याला 'जरूर पाहा' म्हणून सांगितलें. ख्रिसमस संपला. पन्नास साल पुरें करून सुट्टींतच नव्या एक्कावन सालाला आम्हीं सुरवात केली.

आतांपर्यंत टिंचीची बरीच प्रगति झाली होती. त्याचे रागाचे झटके, 'नकार-घंटा', साऱ्या बंद झाल्या होत्या. तरी पण टिंचीच्या मारामाऱ्या, लढाया मात्र सारख्या चालू असत. त्यांतल्या त्यांत वसंतऋतूंत तर कमालच होई त्याची.

आतांपावेतों, शाळेंत क्रीडांगणावरच त्याच्या लढाया होत. पण आतां त्यांचें क्षेत्र वाढूं लागलें. गीत संघांत, देवळाच्या मैदानावर, रस्त्यांत, बालवीरांच्या सभांतून, कँपमधून—सगळीकडेच त्याच्याविरुद्ध मारामारीच्या तक्रारी येऊं लागल्या.

"बघ, मी माझ्या वडलांना सांगेन अं, ते तुझ्या वडलांना सुद्धां असा समज देतील की यंव" अशा रीतीनें आपल्या वडलांचा आधार ज्या मुलाला सांगायला मिळत नाहीं, त्याची अशा मारामारींत मोठी करुण अवस्था असते.

टिंचीचे 'वडील' वारल्यानें, त्याची बाजू घेणारें कोणीच नव्हतें. 'डॉक्तार', डेव्हिड, जिमीजॉन, सगळेच आतां घरापासून दूर गेल्यानें "थांब, मी माझ्या मोठ्या भावाला सांगतों—तो तुला चांगला नरम करील", असेंहि त्याला सांगतां येत नव्हतें.

पण जेवढें कांहीं त्याच्यामागें बळ होतें तें घेऊन तो इतर मुलांना दम भरायला बिल्कूल कचरत नसे. एके दिवशीं मारामारी होत असतां, एका मुलानें त्याला खालीं पाडून छातीवर गुडघा ठेवला, तशीं टिंची म्हणतो, "थांब जरा. माझ्या घरीं तर ये—माझ्या बाई केरसुणीनें तुझी चामडी लोळवतील, नी तुला उचलून खिडकीबाहेर फेकून देतील. तूं मरशीलच मग."

"बारा वर्षांचा मुलगा संभाळायला द्यायचा म्हटलें तर तुमचें आतां वय झालें!" असें समजल्या जाणाऱ्या म्हातारीचें, टिंचीनें चांगलें शब्दचित्र रंगविलें होतें!

त्या हिवाळ्यांत जेव्हां जेव्हां म्हणून त्याच्या बालवीर तुकडीला बाहेर 'कॅम्प'

ला जायचा हुकूम दिला गेला तेव्हां तेव्हां, पाऊस असो नाहीं तर बर्फ पडो टिंची कॅम्पला गेल्याशिवाय राहिला नाहीं. टिंचीचे जेव्हां जेव्हां कॅम्प निघाले तेव्हां तेव्हां पूर, वादळी हवा, बर्फ, यांपैकीं कांहीं पडलें नाहीं असें कधींच झालें नाहीं. मला तर वाटूं लागलें कीं, अवर्षण पडलें म्हणजे ढगांतून पाऊस पाडण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां बालवीरांचा एकादा कॅम्प काढायची व्यवस्था केली कीं पुरे! पाऊस पडलाच म्हणून समजावें.

कॅम्पच्या वेळीं, असें कांहीं झालें नाहीं, अशी एकसुद्धां वेळ गेल्याचें मला तरी आठवत नाहीं.

टिंचीची 'सापांनीं खायची' भीति तर गेलीच. आतां बर्फ पडो, चिखल असो, काय वाटेल तें होवो, तो खुश्शाल कॅम्पमध्यें व्यवस्थित रीतीनें निजत असे. अगदीं वक्तशीर, न चुकतां हजर राहण्याबद्दल आणि कॅम्पचीं कामें व्यवस्थित करण्याबद्दल त्याला एक सुवर्णपदक सुद्धांमिळालें.

एक दिवस चांगलाच पाऊस कोसळत असतां कॅम्पवर राहिल्यामुळें 'छोटा बेडूक' म्हणून त्याला एक मजेचें सर्टिफिकेट पण देण्यांत आलें. खरं म्हणजे कॅम्पवर जाणें टिंचीला आवडे पण त्याच्या मारामाऱ्या मात्र नेहमीं आडव्या येत. या मारामाऱ्यांमुळें टिंचीनें सुवर्ण हातमोजाच्या बॉक्सिंगकरतां (Golden Gloves Boxing) जावें, असें एका स्काउट शिक्षकानें उद्गार काढले होते. माझ्या मतें, सुवर्णापेक्षां हीरक पदवीच्या Boxing ला तो जास्त लायक होता. त्याचे कॅम्पमधल्या इतर मुलांशीं कधीं जमत नसे. त्यामुळें वसंतऋतु सुरू झाल्यावर कॅम्पला जायचे दिवस जवळ येऊं लागतांच त्याच्या मास्तरांनीं मला आधींच एक सूचना देऊन ठेवली कीं, "तुम्ही बाहेर न जातां गांवांतच राहिलेलें बरें. कारण टिंची केव्हां अनावर होईल व केव्हां तुम्हांला बोलवावें लागेल हें कांहीं सांगतां येत नाहीं."

टिंचीचें कॅम्पमधलें आयुष्य सुखाचें जावें, मारामाऱ्यांचे प्रसंग येऊं नयेत, या करतां त्याला मीं एका मानसरोगतज्ज्ञाकडे—सायकिएट्रिस्टकडे—न्यावयाचें ठरविलें. पण प्रश्न होता, टिंचीला कसा तयार करायचा?

टिंची उन्हाळ्यांत जेव्हां आमच्याकडे पहिल्यानें राहायला आला तेव्हां मी आणि ट्रोचा त्याला, लहान मुलांना कसें वळण लावायचें हें सांगणाऱ्या एका तज्ज्ञ डायरेक्टर-कडे नियमितपणें नेत होतों. अगदीं सूक्ष्म भेदच काढायचे तर तो मानसशास्त्री होता. मनाच्या रोगांचा तज्ज्ञ नव्हता. त्यानें तपासून टिंचीचा बुद्धिमत्तानिदर्शक (I. Q.) चांगला असून तो वेडपट नसल्याचें आम्हांला पूर्ण आश्वासन दिलें होतें.

बाकी, ह्या वेळेला त्या गृहस्थांनीं त्याच्या मनाची तपासणी करण्याकरतां ज्या ज्या कसोट्या वापरल्या, त्या पाहिल्या कीं कित्येक वेळां आम्हीसुद्धां आमच्या मनाबाबत अस्वस्थ होत असूं.

एकदां त्याची अशीच परीक्षा चालू होती. एकाद्या कागदावर शाईभरला डाग पाडून त्या कागदाची घडी घालायची व ती घडी उघडून मग जे आकार येतील ते पाहावयाचे, अशीहि त्यांत एक कसोटी होती. त्यांत एकहि डाग दुसऱ्या डागासारखा पसरत नसे.

डायरेक्टर, टिंची, ट्रोचा, आणि मी एकत्र बसून त्याचा एक खेळच सुरू केला. हेतु एवढाच कीं, टिंचीला संशय येऊन त्यानें मानसिक परीक्षेची कसोटी टाळण्याचा प्रयत्न करूं नये. त्या डागाच्या ज्या चित्रविचित्र आकृति होत त्यांतून टिंचीला वाघ, चोर, खाटीक, खाटकाच्या सुऱ्या, वगैरेंचा भास होतो कीं काय तें त्यांना पाहावयाचें होतें. डाग पाहून डायरेक्टरनें सुरवात केली.

"मला एक पंख पसरलेली पाकोळी दिसते. तुला काय दिसतें, आंद्रिस?"

"कांहींच नाहीं."

"असं कसं कांहींच दिसत नाहीं तुला?"

"अं हं!"

"हा बघ अं, हा आकार हत्तीसारखा नाहीं कां दिसत?"

"नाहीं."

"मग काय, एक मोठा शिपाई बंदूक घेऊन उभा आहे, असें वाटतें ना? कां एकादी जख्ख चेटकीण वाटते? कीं भूत वाटतें?"

"कांहींच नाहीं."

"बरं, तूं आतां पाहत बस, नी मग मला सांग अं, काय दिसतें तें. तोंपर्यंत मी तुला छानशी केक आणि आणि आइस्क्रीम घेऊन येतों."

खरं सांगायचं तर डायरेक्टरबरोबरच्या या भेटी, मुलाखती, फारच मजेच्या होत. तिथें टिंचीलासुद्धां बिलकुल परक्यासारखें वाटत नसे. तथापि त्या डागांमध्यें त्याला डागापलीकडे कांहींच दिसेना.

डायरेक्टर केक कापायला गेले. टिंचीहि ते केक कशी कापतात, हें हळूच चोरून पाहूं लागला. तेव्हां ट्रोचा मला हलक्या आवाजांत म्हणते, "काय ग, मला सुद्धां त्यांत डागापलिकडे कांहींच दिसत नाहीं. पण टिंचीला तर वेडपट समजतात, मग माझें काय?"

"मलासुद्धां कांहींच दिसत नाहीं. तूं आतां म्हणतेच आहेस म्हणून सांगतें, मलासुद्धां टिंचीसारखे नुसते डागच दिसतात. आपण सगळेच वेडपट आहोंत कीं काय कोण जाणे?"

आइस्क्रीम व केक घेऊन डायरेक्टर आले. बोलतां बोलतां जेव्हां त्यांनीं आम्हांला सांगितलें कीं तुमचें मानसिक स्वास्थ्य बिघडलें असल्याखेरीज तुम्हांला डागांत कांहीं दिसत नाहीं, तेव्हां कुठें आम्हांला हायसें वाटलें. अगदीं थोडक्यांत त्यांचें म्हणणें स्पष्ट करायचें तर असें कीं, तुम्हांला 'डाग हे डागच दिसले तर तुमचें मनःस्वास्थ्य बिघडलेलें नाहीं. तसेंच त्या डागांत ढगाप्रमाणें वेगवेगळ्या आकृति दिसल्या तरी हरकत नाहीं, पण भेदरून टाकणाऱ्या गोष्टींच्या आकृति त्यांत दिसूं लागल्या कीं तुमचें मनःस्वास्थ्य नाहींसें झालें असें समजावयाचें. 'एकूण आम्ही तिघेंहि मनानें धड होतों तर. टिंचीलाहि त्या डागांत बॉंब, संगिनी, कांहींच दिसलें नाहीं. असो. हा झाला सुटींत समुद्रकांठच्या गांवीं असतांना मानसशास्त्रज्ञानें सांगितलेला अनुभव. आम्ही गांवीं आलों, पण त्याहिनंतर टिंचीच्या मारामाऱ्या व लढाया कांहीं थांबेनात.

पांचवीच्या वर्गात असतांना वर्षभर त्याच्या मारामाऱ्या चालू होत्या. टिंचीच्या एकंदर प्रगतीवरून, टिंची बुद्धिमंताच्या मोठ्या जागेवर जाणें शक्य नाहीं, हें आम्हांला कळून चुकलें होतें. तथापि रोज नाक फुटून रक्त येणें, लागणें, हे प्रकार थांबावे म्हणून आम्ही सायकिएट्रिस्टची मदत घ्यावयाचें ठरविलें. मानसशास्त्रज्ञाला असली गोष्ट म्हणजे काय हातचा मळ असेल, तो असलें काम झटकन करील, अशी माझी समजूत होती.

या बाबतींत खरी अडचण म्हणजे टिंचीचें सहकार्य कसें मिळवावयाचें हीच होती. पण तें अपेक्षेपेक्षां फारच सहज घडून आलें.

एक दिवस टिंची शाळेंतून घरीं आला तो धुळीनें माखलेला, नाकांतून रक्त वाहत असलेला, अशा अवतारांत.

त्याला पाहून जरा त्रासूनच मीं म्हटलें, "अरे, अशी रोज रे कशी तुझी मारामारी होते?"

"कां कुणास ठाऊक?" तो रडतच बोलूं लागला. "मी रागावून अगदीं बेभान होतों. मी असा बेभान झालों कीं, माझें डोकें दुखायला लागतें सारा वेळ. मळमळायला लागून सारें अन्न बाहेर येतें कीं काय, असें वाटूं लागतें."

मनांत म्हटलें, 'वाः छानच संधि मिळाली.' मीं सुरवात केली, "टिंची! तुला

आठवतें का मीं तुला थंडी व पडसें झालें होतें तेव्हां डॉक्टरकडे नेलें होतें तें? त्यानें कसें बरं तुला बरें केलें! मग तूं बेभान झालास कीं, जर तुला मळमळतें, इतकें तुझें डोकें दुखूं लागतें, तर मला वाटतें असें होणें बंद करायला आपण डॉक्टरकडे जाऊं या."

"खरंच तूं मला 'डॉक्तारकडे' ने—अगदीं लवकर लवकर ने. खास त्यानें बरें वाटेल."

टिंचीचें तर जमलें. पण पुढें सायकिएट्रिस्टकडे गेलें, त्यानें मात्र माझ्या उत्साहावर चांगलेंच पाणी ओतलें. 'हा जर वारंवार असा बेभान होत असेल तर हें कांहीं फारसें चांगलें चिन्ह नाहीं. फारच वेळ लागतो ही मनःस्थिति बरी करायला. एकादे वेळीं त्याच्या मेंदूला विजेनें धक्के द्यायला लागतील किंवा कुणास ठाऊक ब्रेन ट्युमरनें सुद्धां त्याला त्रास होत असेल. शिवाय अशा रीतीचे रागाचे अनावर झटके पुष्कळ वेळां एपिलेप्सीनें सुद्धां येतात. तसं एकदम आतांच कांहीं सांगतां यायचं नाहीं." त्यानें मला स्पष्ट सांगितलें.

मी आंतल्या आंत घाबरूनच गेलें. टिंचीची अवस्था इतकी गंभीर स्वरूपाची असेल, अशी मला बिलकुल कल्पना नव्हती. "अहो, हा युद्धाच्या साऱ्या प्रसंगांतून गेल्यामुळें, त्याच्या भावनांना बसलेल्या धक्क्यांमुळें सुद्धां असें होईल आणि तसें असलें तर मात्र सुधारणें फारसें कठीण नाहीं." मला खट्टू झाल्याचें पाहून त्यांनीं थोडा धीर द्यायचा प्रयत्न केला. "पहिल्यांदा 'एपिलेप्सी' नाहीं, अशी खात्री करून घेण्याकरतां आपण त्याच्या मेंदूतून निघणाऱ्या लहरींचा एक फोटो (elctroencephalgoram) काढूं. नंतर काय तें ठरवूं."

एकंदरींत तो सारा प्रकार, मोटर दुरुस्तीकरतां नेली असतां दुरुस्ती करणारानें सांगावें कीं, यांतला स्पार्क प्लग तरी गेला असावा नाहींतर व्हाल्व्ह तरी, अशा-सारखाच, मला वाटला. त्याच्या डोक्याला कांहीं स्पार्क प्लग लावण्यांत येणार होते. तो सगळा प्रकार काय आहे हें मलाच कळत नव्हतें तर मी टिंचीला तरी काय सांगणार? पण एवढें खरें कीं तो "वेडा डॉक्टर तुला बरें करायचा प्रयत्न करणार आहे" असें मीं टिंचीला सांगितलें आणि त्यानें त्यावर विश्वास ठेवला. ज्या दिवशीं त्याला ते प्लग लावायकरतां आम्ही मोटरनें निघालों त्या दिवशीं मला इतकें अवघड वाटत होतें कीं बाह्यतः आनंदी दाखवून टिंचीशीं बोलत राहणें सुद्धां मला जमेना.

आम्ही उपचाराच्या जागीं पोहोंचल्याबरोबर आवाराच्या बाहेरच्या द्वारावरच

'एपिलिप्टिक खेडें' अशीं मोठीं अक्षरें लावलेलीं दिसत होतीं. टिंचीला वाचतां येत नाहीं या गोष्टीमुळें मला कधीं बरें वाटलें असेल, तर तें त्या दिवशीं.

टिंचीला मात्र गंमत वाटून तो सारे सोपस्कार करून घ्यायला अगदीं तयार होता. त्या यंत्रानें त्याच्या मेंदूतील लहरींचा आलेख निघून मेंदूच्या तपासणी-करतां डॉक्टरांकडे जायचा होता. टिंचीला त्या यंत्राची मोठी मजा वाटून तो पाहतच राहिला. एकंदर यंत्र बरेंचसें भानगडीचें होतें. त्याला किती तरी दिवे, बटनें, आणि इतर खूपच भानगडी होत्या. त्याला कागदाची एक गुंडाळी असून ती उलगडत जात असतां त्यावर तारांच्या बोटांनीं मेंदूतील लहरींचा आलेख काढला जाई. अर्थात् त्याचें ज्ञान फक्त डॉक्टरांनाच होऊं शके हें सांगणें नकोच.

टिंचीनें सर्व बाजूंनीं लक्ष लावून त्या यंत्राची दूरून तपासणी केली. "मला वाटतें हा मोठा रेडियो असावा" त्यानें मला सांगितलें. "अंहं:, तूं इतका रागावतोस कां हें डॉक्टरना सांगायचें तें एक यंत्र आहे." मी माझ्याकडून त्याला समजावून सांगितलें. "काय ग, कसं ग हें यंत्र काम करतं?" त्यानें मला मोठ्या आश्चर्यानें विचारलें.

पण मलाच तें गूढ होतें.

आम्ही दोघेंहि आतां काय होतें हें पाहण्याकरितां थांबलों.

टिंचीचा डॉक्टर अत्यंत सहृदय व आपल्या कामांत कमालीचा वाकबगार व कुशल होता. त्यानें पहिल्याप्रथम टिंचीला विश्वासांत घेऊन अगदीं मोठ्या माणसांना समजावून सांगावें तसें त्या 'मोठ्या रेडियो'बद्दल समजावून सांगितलें. तेंसुद्धां अशा रीतीनें कीं टिंचीला उत्सुकता उत्पन्न होऊन तो ती कसोटी स्वतःवर करून घ्यायला तयार व्हावा. त्यामुळें त्या यंत्रानें टिंची घाबरला तर नाहींच, उलट त्याला स्वतःवरच प्रयोग करून घेण्याचें औत्सुक्य मात्र उत्पन्न झालें.

टिंचीला एका अंधेऱ्या खोलींत नेऊन पलंगावर पडायला सांगितलें. त्यानंतर तेथें त्या सगळ्या तारा त्याच्या डोक्याला जोडण्यांत आल्या. ह्या सगळ्या तारा खोलीबाहेर नेऊन आलेख लिहणाऱ्या यंत्राला जोडण्यांत आलेल्या होत्या. मला तर तो सगळा प्रकार पाहून माणसाला मृत्यूची शिक्षा देतात त्या विजेच्या खुर्चीचीच आठवण झाली, व कांहीं केल्या बरें वाटेना. टिंची पण जरा अस्वस्थ होऊं लागला. दरवाज्याजवळ त्याला दिसेल अशा रीतीनें मला उभी राहूं देण्याचें डॉक्टरनीं कबूल केल्यावर, कसा बसा तो तिथें पडून राहिला.

बटन दाबलें. यंत्र सुरू झालें. हजारों मधमाशा घोंघावूं लागाव्या तसा चमत्कारिक

भीतिदायक आवाज त्या यंत्रांतून येऊं लागला. मधूनच दिव्यांची उघडझाप होतांना दिसूं लागली.

टिंचीच्या अंतर्यामीं चाललेले विचार आपल्या सांकेतिक भाषेंत कां होईना उलगडत चाललेल्या कागदाच्या सुरळीवर तीं तारेचीं बोटें लिहूं शकतील हें मला संभाव्यसुद्धां वाटेना. टिंचीच्या अंतर्यामींचीं सारीं दिवास्वप्नें त्या यंत्रांतून लाउड स्पीकरनें सांगितल्याप्रमाणें ध्वनिक्षेपित केलीं जातील किंवा पडद्यावर दिसणाऱ्या चित्रपटांप्रमाणें चित्ररूपानें दिसतील अशी माझी कल्पना होती; पण तसें कांहींच घडलें नाहीं. उलट तीं तारेचीं बोटें आतां लिहूं लागलीं होतीं. तीं बोटें म्हणजे वस्तुतः लेखण्याच असून मेंदूला जखडविलेल्या विजेच्या तारांतून उठणाऱ्या लहरीप्रमाणें त्यानें लिहिलें जाई. स्टेशनवर, गाड्यांना उशीर झालेला दाखविणाऱ्या फलकावर एकाद्या गाडीला किती उशीर होईल हें विजेच्या साह्यानें आपोआप लिहिलें जातें तसाच थोडासा हा प्रकार होता. फरक एवढाच कीं, त्या फलकावर शब्द लिहिले जातात आणि येथें ताप दाखवणाऱ्या तक्त्याप्रमाणें वरखालीं धक्के बसल्यासारख्या रेघोट्या रेखाटल्या जात होत्या. दुसरा फरक म्हणजे स्टेशनाच्या फलकावर वरून खालीं लिहिलें जातें. पण येथें एकीकडून सुटणाऱ्या व दुसरीकडे गुंडाळल्या जाणाऱ्या कागदावर किती तरी लेखण्या आडव्या आलेखाच्या रेघोट्या चितारीत होत्या. निदान मैलोगणती कागदावर त्यांनीं रेघोट्या चितारल्या असतील. एक क्षण हें इतकें काढून वाचायचें म्हणणें केवढें काम आहे असा प्रश्न माझ्या मनांत आल्याशिवाय राहिला नाहीं. एकंदर सर्वच प्रकार फारच मनोरंजक होता. पण तीं यांत्रिक बोटें टिंचीचें काय नशीब लिहीत असतील नी काय नाहीं या भीतीनें मला मात्र भारावून गेल्यासारखें झालें होतें; त्यामुळें तितकी गंमत वाटेना.

त्यानंतर आम्हांला कळलें कीं त्या यंत्राच्या जादूगाराला तीं भेंडोळीं वाचून काढायला सहज कांहीं आठवड्याचा अवधि लागेल. त्यामुळें एवढ्या सगळ्या खटाटोपानंतर तात्पुरतें तरी कांहीं न कळतांच आम्हांला परत जावें लागलें.

जरी त्या साऱ्या दिव्यांतून टिंचीनें मोठ्या धैर्यानें निभावून गेल्यासारखें दाखवलें तरी पाठीमागून त्याची कांहीं तरी प्रक्रिया झाल्याशिवाय राहणार नाहीं अशी माझी कल्पना होती; म्हणून टिंचीच्या वर्गशिक्षकाला मी सारा प्रकार समजावून सांगितला व अखेर शाळेंतहि त्यानें त्या संबंध प्रकरणाची कांहीं वेडी-वांकडी प्रतिक्रिया दाखविली कीं काय म्हणून त्यांच्याजवळ चौकशी केली.

"छे, तुम्ही म्हणतां तसा त्याच्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं." शिक्षकिणीनें मला सांगितलें. "उलट त्यानें साऱ्या वर्गासमोर उभें राहून आपल्या डोक्याला तारा कशा लावल्या, कसें यंत्र होतें, याचें झक्क वर्णन करून सांगितलें."

"बाई, म्हणाला तरी काय तो!" मीं विचारलें.

"रेडियोवर तो ध्वनिक्षेपित करीत होता असें मोठ्या ऐटीनें त्यानें मुलांना सांगितलें; एवढेंच, नव्हे त्याबद्दल त्याला फारच अभिमान वाटत असावा असें दिसलें."

तीन आठवडे गेल्यावर त्या तपासणीचा अहवाल आला. एपिलेप्सी असली तर मेंदूच्या ध्वनिआलेखांत (ताप आल्याप्रमाणें रेघांनीं दाखवला जातो त्यांत) कांहीं विशिष्ट प्रकारच्या आकृति तयार होतात. पण एपिलेप्सी नसून मेंदू ठीक असेल, तर त्या रेघांत कोणतीच विशिष्टाकृति दिसून येत नाहीं. निरोगी मेंदू अगदीं मोकळ्या व वाटेल तशा रेघा काढतो, शिवाय त्या व्यक्तीप्रमाणें बदलतात. सर्वसाधारण माणसाला त्या खटाटोपांतून एवढाच अर्थ कळण्याजोगा होता. निदान मला तरी त्या सर्व भानगडीचें फक्त एवढेंच ज्ञान झालें. असो. पण माझ्या दृष्टीनें सर्वांत महत्त्वाची गोष्ट एवढीच होती कीं, टिंचीच्या मेंदूंत कांहींसुद्धां विकृति नसून तो अगदीं निरोगी असल्याचा, समुद्राप्रमाणें अनियंत्रित आलेख लिहीत असल्याचा, दाखला मला मिळाला. एकूण टिंची 'ठीक आहे' हें ऐकून मला हायसें झालें.

एक क्षणभर फांसावर लटकून सुटका करावी तशाच प्रकारचें तें दिव्य होतें.

आतां फक्त युद्धांतील अनुभवानें टिंचीच्या भावनामय मनाला जो काय धक्का बसला असेल तेवढ्यांतूनच त्याला मुक्त करण्याचें काम राहिलें. आणि तें, त्या डॉक्टरनीं टिंचीला एका खोलींत बोलावून दार लावून घेऊन सुरू केलें. आठवड्यांतून एकदां अशा रीतीनें टिंची एक महिना त्या डॉक्टराकडे गेला असेल; पण तेवढ्यानें काम संपलें.

त्यानंतर लवकरच टिंची उन्हाळ्यांतील कॅम्पला गेला. सायकिएट्रिस्टचा तो सारा उपचार इतका जादूसारखा झाला कीं, त्यानंतर त्या सबंध उन्हाळ्यांत टिंचीनें एकसुद्धां मारामारी केली नाहीं. त्या मानसिक उपचारानंतर टिंची अगदीं निवळला. खरीखुरी अशी त्याची मारामारी तेव्हांपासून कधींच झाली नाहीं, कीं अगदीं मळमळून सोडणारा रागाचा झटका पण त्याला कधीं आला नाहीं. कॅम्पमधले त्याचे दिवस फारच मजेचे जाऊं लागले, असें दिसत होतें. प्रत्येक

दिवशी त्याचें एक कार्ड आम्हांला येई त्यावरून सारी हालहवाल कळे.

रोज इतक्या नेमानें पत्र पाठविण्याबद्दल जेव्हां मीं त्याला शाबासकी दिली तेव्हां तो मला म्हणतो:

"अग भोजनशिबिराच्या दाराशीं, घरीं लिहिलेलें पत्र दाखवल्याशिवाय आम्हांला खायलाच देत नसत."

या त्याच्या उद्गारांनीं 'उगीच नसता भावनाप्रधान तर हा पोरगा होणार नाहीं ना' ही माझी भीति पार नष्ट झाली.

टिंचीचीं पत्रें मात्र कमालीचीं अशुद्ध असत. इतकीं कीं त्यांतून अर्थ जाणूनच घ्यावा लागे. एक दिवस त्याच्या पत्रावर "फुडचा आठवडा मी करईन मान चिन हा वर काम." असें लिहिलेलें होतें. तो पुढच्या आठवड्यापासून मान चिन्हांवर काम करणार होता, असा त्याचा अर्थ मला पुनः पुनः वाचून कळूनच घ्यावा लागला. त्यावेळीं मात्र अगदींच मठ्ठ आहे हा पोरगा, बुद्धि कशी ती बिलकुल नाहीं, असें माझ्या मनांत आल्याशिवाय राहिलें नाहीं.

'वेड्या डाक्तारा'च्या उपचारानंतर टिंचीनें आपल्या शिपायाला (बाहुला) आपोआपच रजा दिली. तो मला जुन्या बुटांच्या जवळ पडलेला एक दिवस दिसला. आतां टिंची चांगलाच मोठा झाला होता. त्याला बाहुल्याची जरूर नव्हती. तरी सुद्धां त्याचे स्काऊटमास्तर समजत इतका मोठेपणा मात्र त्याच्या अंगांत अजून आला नव्हता.

एका रविवारीं मी त्यांचा कॅम्प होता तेथें मोटारनें गेलें. टिंची व त्याचे सोबती रानांत गेले होतें, म्हणून त्याच्या स्काउटमास्तरांजवळ तशीच बोलत बसलें.

आम्ही बोलत होतों. एवढ्यांत भेटायला आलेल्या एका मुलाच्या आईनें त्या मुलाला मिठी मारून पटापट त्याचे मुके घेतले. माझ्याजवळ असणाऱ्या मास्तरांना तें कांहीं फारसें पसंत पडलें नाहीं.

"पाहा कशा बायका असतात त्या! एवढ्या मोठ्या मुलाचे सगळ्या लोकांदेखत मुके घेऊन बिचाऱ्याला अगदीं लाजवून सोडते आहे ही बाई." माझ्याकडे वळून ते पुढें म्हणाले, "माझी खात्री आहे तुम्ही कध्धीं असें करणार नाहीं नी मुलाला लाजवून पण सोडणार नाहीं."

इतक्यांत, मी उभी होतें त्याच्या वरच्या बाजूच्या टेकाडावर टिंची मला दिसला. मला पाहतांच, "बाई, तुम्ही आलांत? किती मजा!" म्हणून एकाद्या

रानमेंढरासारखी त्यानें टेकाडावरून उडी टाकली आणि सरळ माझ्याकडे येऊन त्यानें मला घट्ट मिठी मारली व मुके घेतले. मी आल्यानें होणारा आनंद सगळ्या स्काउट मुलांसमोर व त्यांच्या नातेवाइकांसमोर प्रकट करण्यांत त्याला कोणताच कमीपणा वाटला नाहीं.

मघांशीं माझी स्तुति करणारे स्काउटमास्तर टिंचीकडे बघून हसत असल्याचें मीं हळूच डोळा वर करून पाहिलें.

"असो, निदान मी तरी त्याला लाजल्यासारखें व्हावें अशी वागलें नाहीं ना?" मी त्यांना जातांना विचारलें.

टिंची सारा वेळ आपण काय काय गंमती केल्या तें मला सांगत होता. सांगतां सांगतां त्याचा आवाज एकदम पडला. तो अगदीं गंभीर होऊन बोलूं लागला. "तुला माहीत आहे, आज एक फार वाईट झालं होतं. मी एका मुलाबरोबर रात्रीं रानांत गेलों. कंदिल त्या दुसऱ्या मुलाजवळ होता. नि तुला माहीत आहे काय झालें तें? एकदम कंदील विझला. इतका काळा कुट्ट अंधार होता कीं आम्हांला तर रस्ताच सांपडेना. कित्ती फिरलों आम्ही, पण कॅम्पच दिसेना. अगदीं घाबरलों मी. मनांत देवाची सारखी प्रार्थना सुरू केली. शेवटीं देवानें रस्ता दाखविला नी आम्ही आलों इथें." खरोखरच तो तिथें आला होता यांत शंकाच नाहीं.

# ६. रंगाऱ्याकडे उमेदवारी

जून १९५१ चा उन्हाळा म्हणजे टिंची आमच्याकडे आल्यानंतरचा दुसरा उन्हाळा. अजून उन्हाळ्याचे बालवीरांचे कॅम्प सुरू व्हावयाला अवकाश होता. याच अवधींत माझ्या 'डॉक्तार' मुलाचें व्हर्जिनियामधील एका मुलीशीं लग्न ठरलें. वाङ्निश्चय जाहीर करण्यापूर्वी आम्ही एकदां तिला जाऊन भेटावें, असा माझ्या मुलाचा आग्रह पडला. तो मोडणें शक्य नव्हतें. इंचा तर आपल्या व्यवसाया-निमित्त घरापासून दूरच होती. तेव्हां राहतां राहिलों ट्रोचा आणि मी. आम्हीं दोघींनीं मोटरनें व्हर्जिनियाला जावें असें ठरलें. आम्हांला भीति वाटत होती तरी टिंचीला बरोबर नेण्याखेरीज इलाजच नव्हता. भीति वाटण्याचें मुख्य कारण असें कीं, टिंची थकला म्हणजे उतावळ्यासारखें करी व भारी चिडचिड करीत असे. कोणत्याहि कारणानें एखाद्या गोष्टीला वेळ लागला कीं त्याला बिलकुल सहन होत नसे. तो कमालीचा अस्वस्थ होई. पण माणूस एकदां घराबाहेर पडलें म्हणजे, रस्त्यांत रांग लागली कीं स्वतःची पाळी येण्यास, उपाहारगृहांत गेलें कीं वाढपी अन्न पुढें आणून ठेवीपर्यंत, उशीर हा लागतोच. पण त्यामुळें टिंची लगेच त्रासून जाई व रागावून वेड्यासारखें करी.

आतां व्हर्जिनियाची सफर म्हटली कीं असे प्रसंग वारंवार येणार. शिवाय तेथें परकी लोकांना भेटावयाचें असल्यामुळें तेथें तरी टिंचीनें अगदीं चांगलें वागावें असें आम्हांला वाटत होतें. एकदां का तो चिडचिड करूं लागला कीं मग तो काय करील नी काय नाहीं याचा बिलकुल नेम सांगतां येत नसे...त्यांतून व्हर्जिनियांतील माणसांशीं आमचे नवे संबंध जोडले जाणार असल्यानें त्यांच्यावर आमची चांगली छाप पडावी अशी साहजिकच आमची इच्छा होती. पण आमचें हें पोर कुठें काय करील याचा बिलकुल नेम नव्हता. कॅम्पमध्यें पाठवावा म्हटलें तर कॅम्प उघडायल अजून बराच अवकाश होता. शिवाय टिंचीला कुणाजवळ ठेवूं म्हटलें तर तेंहि शक्य नव्हतें. अखेर त्याला बरोबर न्यावें असेंच आम्हीं ठरविलें. "लक्षांत ठेव, आम्ही आंद्रिसला प्रवासाला घेऊन चाललों आहों, कार्लिसला नाहीं बरं," ट्रोचानें जातांना त्याला फिरून फिरून बजावलें.

"उगीच काय? कार्लिस तर केव्हांच जर्मनीला गेला." त्यानें अधीरतेनें उत्तर दिलें.

अशा रीतीनें टिंचीसह आम्ही निघालों. वाटेंत रोज त्याची कांहींतरी कुरकुर चाले, पण नशीब! रागावला मात्र नाहीं. तेथें गेल्यावर 'डॉक्तार'च्या 'वाग्दत्त वधूला' तिच्या आईवडिलांना भेटण्याची जेव्हां वेळ आली तेव्हां टिंची चांगला पोषाख घालायलाच कबूल होईना.

उगीच बिथरून जाऊं नये म्हणून माझ्या 'डॉक्तार' नें त्याचे बूट पॉलिश करून चकचकीत केले. स्वतः होऊन त्याचे केस व्यवस्थित बसविले व एक 'बो'हि बांधून दिला. शेवटीं एकदांची स्वारी तयार झाली.

चांगली कडक इस्त्रीची पाटलोण, स्टार्च लावलेला पांढरा कडक इस्त्रीचा शर्ट, नवीन निळें कार्ड्रायचें 'याकिट' (जाकिट), चकचकीत बूट, व्यवस्थित बसवलेले सोनेरी केस, या सगळ्या पोषाखांत टिंची इतका सुरेख दिसत होता कीं त्याच्या निम्म्यानें आम्ही दिसलों तरी पुरे, असें ट्रोचाला नी मला वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. त्यानंतर लवकरच आम्ही मुलीच्या घरीं गेलों. बराच वेळ दोन कुटुंबांची सभा भरावी असे आम्ही अगदीं गंभीरपणें बसलों होतों. हळूहळू मोठ्या माणसांच्या गप्पा सुरू झाल्या. टिंची अस्वस्थ होऊन चलबिचल करूं लागला.

"जा, तुला बाहेर जायचें असलें तर जा आणि बघ काय करायचें तें," मी चुकून म्हणून गेलें. वास्तविक टिंचीची पूर्ण कल्पना असल्यानें मी त्याला असें सांगण्यापूर्वीं जरा विचार करायला पाहिजे होता.

टिंची बाहेर गेला.

आम्ही एका सुंदर सजविलेल्या बैठकींत खोलींत बसलों होतों. एक छानदार मोठी अशी भिंतींतील शेगडीहि पण तेथें होती.

जून महिना असल्याकारणानें विस्तव पेटवलेला नसून उलट घासून पुसून ती जागा व तिचा पिवळा कठडा स्वच्छ करून ठेवल्याचें दिसत होतें. इतक्यांत एकाएकीं धुराड्यांतून विस्तवाच्या शेगडीवर टिंची म्हणे त्याप्रमाणें 'टप्पक् टप्पक्' एकेक गोष्टी पडूं लागल्या. झाडांच्या फांद्या, खडे, गोटे, पाइनचे कोन्स, पातेरा, वाळलेली फांदी, इ. गोष्टी टपकन् खालीं पडत व शेगडीच्या जागेवर इतस्ततः पसरत. तें पाहतांक्षणींच ट्रोचा नी मी एकमेकीकडे पाहूं लागलों. लगेच ट्रोचा बाहेर गेली. तिचा आवाजहि मला ऐकूं येऊं लागला...

"टिंच, काय चालवलें आहेस छपरावर?"

"कांहीं नाहीं ग, सहज या धुराड्याच्या मोठ्या भोंकांतून खालीं टाकून पाहतों आहें जातें का तें?"

"बरं, पुरें कर तें. आणि चटकन खालीं ये बघूं आत्तांच्या आत्तां."

"हो. पण मी इथेंऽऽऽ आहे. लवकर येतों."

टिंचीचा आवाज धुराड्यांतून घुमत असल्याचें आम्हांला ऐकूं येऊं लागलें.

"लवकर नाहीं. आत्तांच्या आतां खालीं उतर." ट्रोचानें त्याला खडसावलें.

"तूं मला नेहमीं सांगतेस ना कीं म्हातारा सांताक्लॉज धुराड्यांतून खालीं उतरतो म्हणून. तेंच पाहतोय मी. मीं काड्या टाकल्या त्या टपकन खालीं गेल्या पण या भोकांतून सांताक्लॉजसारख्या लठ्ठ म्हाताऱ्याला जायचें म्हटलें तर कठीणच!"

"टिंची, खालीं ये बघूं अगदीं या मिनिटाला."

"ट्रोचा, तुला सांगायचें म्हणजे मला या भोकांतून खालीं उतरतांच येत नाहीं ग. खरं सांगूं का, मला वर पण येतां येत नाहीं. मला वाटतें मी अडकून बसलोंय इथें."

बाटलीला लावलेल्या बुचासारखा तो धुराड्यांत फसूनच गेला होता. त्याचे रविवारचे शानदार कपडे पूर्णपणें खराब झाले होते.

'डॉक्तार' हसतच बाहेर गेला.

टिंचीचा त्या दिवशींचा पराक्रम 'डॉक्तारा'ला फारच पसंत पडला. कारण आपली निवड सगळ्यांना पसंत पडावी, शिवाय दोन्हीकडच्या लोकांचें एकमेकां-विषयीं चांगलें मत व्हावें, या तीव्र जाणिवेनें भारावून तो अस्वस्थच झालेला होता. आम्हीसुद्धां एकमेकांना परकी असल्यानें व आतां नात्याचेच संबंध जुळायचें या दृष्टीनें जरा ताठरच होतों. पण टिंचीनें तें मोठेपणाचें ओझें फेकून देऊन सग-ळ्यांना हसायला लावलें. एकदम सगळ्यांचीं मनें हलकीं झालीं. 'डॉक्तार' तर हसतच सुटला. धुराड्यांतून येणाऱ्या सांताक्लॉजप्रमाणें, सगळे कपडे चुरगळलेला, कपड्यांना आणि तोंडाला धुराचें काळें लागलेला असा टिंची जेव्हां धडपडत खालीं आला तेव्हां त्याला पाहून कुणालाच ताठर राहणें शक्य नव्हतें. एकदम सगळीं हसूं लागलीं.

या विजयामुळें टिंची इतका खूष होऊन गेला कीं, व्हर्जिनिया संस्थान आपल्याला फार आवडलें असल्याचें त्यानें परत आल्यावर आम्हांला कितीदां तरी सांगितलें. "न्यूजर्सीमध्यें मला जशीं बोलणीं बसतात तशीं तिथें बसत नाहींत. शिवाय तिथली भाषा पण कशी गुळगुळीत व गोड वाटते. ते काय बोलत हें मात्र मला कळलें नाहीं म्हणा."

बाकी मुलांना कोणत्या गोष्टी आठवतात नी कोणत्या गोष्टी तीं विसरतात हें पाहिलें कीं एक प्रकारचें आश्चर्यच वाटतें.

"का रे, तुला आपण व्हर्जिनियाला गेलों होतों तें आठवतं का?" असें तीन वर्षांनीं त्याला विचारलें असतां हें 'धुराडें-प्रकरण' तो साफ विसरून गेला आहे असें आम्हांला आढळलें. त्याला तो प्रवास आठवत होता तो म्हणजे ट्रोचानें 'पक्ष्यांबरोबर मोटर मागें घेतली' ह्या एका गोष्टीमुळेंच. 'पक्ष्यांबरोबर मोटर मागें घेतली' हा प्रकार आम्हांला कांहीं केल्या किती तरी वेळ आठवेना. अखेर एकदांचें आठवलें. टिंची त्या वेळीं बालवीर पथकांत पक्ष्यांचा अभ्यास करीत होता. व्हर्जिनियांतील सुंदर वेगवेगळे पक्षी पाहून त्याला फारच मजा वाटली. एकदां, तो एका कुंपणावर बसलेल्या लहानशा गाणाऱ्या पक्ष्याकडे पाहत असतां ट्रोचाने भर्‌कन मोटर पुढें नेली, तेव्हां "हें ग काय, तूं किती भर्कन नेतेस मोटर, मला तो पक्षी पाहतां सुद्धां आला नाहीं." अशी टिंचीनें तक्रार केली.

प्रवासानें मनावरचा दाब जाऊन आलेला मोकळेपणा, समोर अगदीं निर्मनुष्य, गांवाबाहेरचा लांबच्च लांब रस्ता, त्यामुळें टिंची असें म्हणतांच ट्रोचानें झर्कन मोटर मागें घेऊन पक्षी होता तेथें आणली. नंतरहि एक 'मॉकिंग बर्ड' (वेडावणारा पक्षी) नीट पाहतां यावा याकरतां तिनें मोटर अशीच मागें आणली होती. अशा रीतीनें मोटारनें पक्ष्यामागें धावणें तेवढेंच टिंचीच्या चांगलें लक्षांत राहिलें. धुराड्याचें प्रकरण त्याच्या स्मृतींतून पार गळालें. हें पाहून आतांपर्यंत घडलेल्या गोष्टींपैकीं ह्याला पुढें काय आठवेल नी काय नाहीं याबद्दल आम्हांला पुष्कळ वेळां मोटें कुतूहल वाटे.

त्या हिंवाळ्यांत टिंची जेव्हां घरीं आला तेव्हां तो सहाव्या वर्गांत गेला होता. पण या नव्या वर्गापेक्षां आमच्या जुन्या घराला नवीन रंग देण्याचें काम चाललें होतें, त्याचेंच टिंचीला जास्त कुतूहल होतें.

रंग देण्याकरतां एक माणूस बोलावला होता. लवकरच एके दिवशीं टिंचीची स्वारी फिरून छपरावर चढली. त्याला रंगाऱ्याच्या कामांत मदत करायची इच्छा होती. अखेर त्याला गप्प बसविण्याकरितां रंगाऱ्यानें एक रंगाचा डबा व ब्रश त्याच्याजवळ दिला.

जी गोष्ट करायची ती अत्यंत सफाईनें काळजीपूर्वक करण्याचा टिंचीचा स्वभावच होता. त्यामुळें आपल्याला फारच चांगली मदत मिळाली असल्याचें रंगाऱ्याच्या लवकरच लक्षांत आलें. खिडकीपाशीं कठड्याच्या नक्षीशीं किंवा

इतर अशाच नक्षीच्या ठिकाणीं रंगारी मामुली काम करून वेळ भागवून नेई. पण टिंचीचें तसें नव्हतें. अगदीं नमुनेदार गोष्ट करायची असा त्याचा बाणा असल्यानें तो अशा ठिकाणीं जर्मनांप्रमाणें अगदीं कटाक्षानें अत्यंत व्यवस्थित रीतीनें रंग लावी.

त्याचा हा व्यवस्थित व नीटनेटकें काम करण्याचा गुण पाहिल्यावर जरा अवघड व वेळ लावणारीं सगळीं कामें रंगाऱ्यानें टिंचीवर सोंपवलीं व सरळ मोठे हात मारायचे असत अशा जागा तो शिडीवर चढून करूं लागला.

"काम चुकवतो लुच्चा" असे टिंचीनें त्यावर उद्गार काढले पण सर्व अवघड, सरळ नसलेल्या जागीं रंग देण्याचें स्वतःचें काम मात्र जोरांत चालू ठेवलें.

त्याची काम करण्याची आवड व चिकाटी मोठी विलक्षण होती. सकळीं शाळेंत जाण्यापूर्वी कांहींतरी काम संपवितां यावें म्हणून सकाळीं लवकरच उठून न्याहारी-पूर्वी जेवढें काम करतां येईल तेवढें तो करून टाकी. दुपारीं मधल्या सुट्टींत आला कीं दुधाचा ग्लास व सॅन्डविच मटकावून शाळेला उशीर न करतां जेवढें राहतां येईल तेवढें राहून तो काम करी. नंतर शाळेंतून आल्यावर जी पुनश्च सुरवात करी ती अगदीं दिसेनासें होईपर्यंत.

तसें पाहिलें तर रंगारी स्वतः साडेचारच्या ठोक्याला चालूं लागायचा. पण टिंची मात्र पुष्कळ वेळां 'सपर' चुकवून अंगावर घेतलेलें काम करीत बसे, तों अगदीं दिसेनासें होईपर्यंत. त्यानंतर घरांत येई व जेवीत असे. त्याच्या आधीं कधीं जेवला नाहीं.

"आपण नाहीं बुवा असा मुलगा पाहिला." रंगाऱ्यानें एके दिवशीं चक्क कबूल केलें व म्हणाला, "आतांशीं कामें करायला जीं माणसें मिळतात त्यांतल्या कितीतरी माणसांपेक्षां हा मुलगा शतपटीनें चांगला आहे."

आणि खरोखरच टिंची कामांत चांगलाच वाकबगार होता.

पुढें रंगाऱ्यानें तर त्याला तासाच्या हिशेबानें कामावर घ्यायचेंच ठरविलें. टिंची आपल्या लांड्या विजारींच्या मागल्या खिशांत एका लहानशा निळ्या नोंदबुकांत आपल्या तासांचा हिशेब लिहून ठेवीत असे.

हा हिशेब तो ठेवीत असला तरी एक दिवस हळूच त्यानें मला सांगितलें कीं, "जरी त्यानें कांहीं दिलें नाहीं तरीसुद्धां मी काम करीन. फारच मजा येते काम करतांना. पण त्याला पैसेच द्यायचे असले तर मी करतों त्या मिनिटा-मिनिटाचे सुद्धां पैसे त्याला द्यावे लागतील."

या बाबतींतला त्याचा निश्चय अगदीं ठाम होता. त्याचप्रमाणें कामाच्या तासांचा हिशेब ठेवतांना त्यानें कधींच लबाडी केली नाहीं. अत्यंत चोखपणें खरा हिशेब तो मांडून ठेवी. अर्थात् ठरलेल्या वेळेपेक्षां बाहेर काम केल्यास मिळणाऱ्या 'जादा दरा'सबंधीं टिंचीनें कधीं ऐकलें नसल्यानें, रंगाऱ्याच्या दृष्टीनें त्याचा फायदाच होता.

एक दिवस तो असाच शिडी लावून रंगवीत बसला असतां, मला हाका मारून विचारूं लागला, "मिसिस, मी शाळेला न जातां सारा दिवस रंगवीत बसलों तर काय ग हरकत आहे ?"

"खरंच तुम्ही त्याला कां रंगवूं देत नाहीं ?" रंगाऱ्यानें पण पुस्ती जोडली, "शाळेंत शिकेल त्यापेक्षां किती तरी शिकेल इथें. शिवाय माझ्या देखरेखीखालीं तो एक धंदेशिक्षण शिकून तयार होतो आहे. शाळेचें शिक्षण काय, फिरून गेला कीं सहज भरून काढील जरा ज्यादा अभ्यास करून."

मलासुद्धां त्याचें म्हणणें पटलें. सहाव्या वर्गाची शिक्षिका फारच चांगली होती. तिनेंहि सर्व गोष्टी पुढें मांडल्यावर रजा द्यायचें पटकन कबूल केलें. अखेर टिंची एक आठवडा शाळेंत न जातां रंगाऱ्याचा मदतनीस म्हणून काम करूं लागला व त्यानें पैसे पण मिळवले.

"कधींहि सांगा, मी त्याला चटकन् कामावर घेईन" रंगाऱ्यानें जातांना मला सांगितलें. "पुढच्या उन्हाळ्यांत त्याला सतत काम पाहिजे असेल तरी मी देऊं शकेन." असेंहि त्यानें कबूल केलें.

पण मलाच ती कल्पना पटेना. टिंची आत्तां कुठें बारा वर्षांचा झाला होता. शिवाय घरीं पाहिजे तेव्हां काम करणें गोष्ट वेगळी आणि बाहेर जाऊन नियमितपणें वेळच्यावेळीं रोजंदारीनें काम करणें गोष्ट वेगळी. काम करायची त्याला चांगलीच संवय होती. पण माझ्या मतें कामापेक्षांहि स्काऊट कॅम्पमध्यें जाऊन नीट रीतीनें जुळवून घेऊन लोकांबरोबर चांगलें वागायला शिकणें या गोष्टीची या वेळीं त्याला अधिक आवश्यकता होती.

म्हणूनच, धंद्याला लागणाऱ्या कागदपत्रांची त्याच्या बाबतींत अडचण उपस्थित झाली नसती तरीहि मीं त्याला त्या वेळीं काम करून दिलें नसतें.

टिंचीला रोजगारी काम मिळाल्यानें सुतारकी व रंगारी काम याबद्दलची त्याची हौस अधिकच भरास आली.

"खालच्या तळघरांत मी एक लहानशी कामाची खोली (workshop) तयार करूं का ?" त्यानें मला विचारलें.

मला ती कल्पना फारच पसंत पडली.

स्वतःच्या कल्पनेनें तळघरांत कामाची खोली तयार करायची ही त्या वयाच्या मुलाला तरी काम करायला फारच छान कल्पना होती. शिवाय हिंवाळ्याचे किती तरी महिने त्याला तें काम पुरणार होतें.

मागल्या वर्षीं त्याला अशीच एक झोपडी बांधायची फार इच्छा झाली. तेव्हां जुनें लाकूड आणून आमच्या आवारांत एक झोपडी बांधायला मीं परवानगी दिली होती. सगळ्याच मुलांना कधीं ना कधीं आपण आपली अशी एक झोपडी बांधावी अशी इच्छा होते.

पण आतां त्या झोपडीचें लाकूड काढून घेऊनच त्याला कामाची खोली तयार करावयाची होती. मीं त्याला हो म्हणून सांगितलें, तेव्हां ही खोली कशी केवढी होणार याची मला कांहींच कल्पना नव्हती.

माझा होकार मिळाल्याबरोबर टिंचीनें भराभर झोपडीचीं लाकडें काढलीं व तो तीं तळघरांत नेऊं लागला.

एखाद्या वारुळांतील सगळ्या मुंग्यांप्रमाणें तो कामांत एकसारखा गुंग होता. मग करवतीनें कापणें व ठाकठोकीचें काम सुरू झालें. किती आठवडेच्या आठवडे हें काम चाललें होतें. त्या अवधींत त्याच्या हातोड्याच्या घावांनीं सारें घर थरथरूं लागे. कधीं कधीं तो हातोड्यांनीं घाव घाली त्यासरसा पुढच्या खोलींतला गालिचा लाटा आल्यासारखा खालींवर होई. त्याचे खालीं घण सुरू असले कीं कांहीं वेळां आम्हांला वरतीं एकमेकांचें बोलणें ऐकणें सुद्धां जड जाई. असो, कांहीं असलें तरी त्याचा रिकामपणाचा उद्योग फारच चांगल्या तऱ्हेचा होता यांत शंका नाहीं. तसं पाहिलें तर टिंची लहानच होता. अशा कांहीं उद्योगांत गढलेला तो न राहता, तर त्याला किती एकटें व कंटाळवाणें झालें असतें. या कारणानेंच इतकें गढून त्याला काम करितांना पाहिलें कीं रस्त्यांत बाहेर इकडे तिकडे पाहत भटकत बसण्यापेक्षां हें पुष्कळ बरें असें माझ्या मनांत येऊन एक प्रकारें सुटका वाटे. शिकारी कुत्र्याप्रमाणें मुलांना पण कांहीं करायला नसलें कीं इकडे तिकडे भटकायची त्यांना मोठी संवय असते. त्यापेक्षां घरीं राहून त्याचें काम चालू आहे हें नक्की माहीत असणें मला एक प्रकारें बरेंच वाटे. शिवाय तो काय करतो नी काय नाहीं हें पाहायला मला तरी वेळ कुठें होता!

अखेरीला एक दिवस ट्रोचानें माझे डोळे उघडले.

"टिंचीचें खालीं तळघरांत काम चाललें आहे. तुला कल्पना आहे का?"

"कां, तो कामाकरतां खोली तयार करतो आहे ना?"

"तूं पाहिलीस का ती?"

"नाहीं, अजून तरी मी गेलेंच नाहीं."

"मग एकदां जाऊन बघच."

"कां, करतो आहे तरी तो काय?"

"आई, तळघरांत एका माणसानें बोट बांधायला घेतली नी अखेर ती बोट इतकी प्रचंड झाली कीं घर फोडूनच काढायची पाळी आली, ही गोष्ट कधीं तूं ऐकली आहेस का?"

"म्हणजे तो बोट बांधतो आहे कीं काय?"

"नाहीं ग घरच बांधतो आहे. पण त्यांतल्या खोल्या नी सारें पाहिलेंस कीं आपल्या साध्या घरापेक्षां मोठें व्हायचें आहे तें घर. आणि तें झाल्यावर जादा कर भरायला नाहीं लागला तर पाहा. उद्यां गॅसच्या आणि पाणीपट्टीच्या माणसांना त्याचें मीटर्स सांपडले तरी पुरे."

मी सरतेशेवटीं खालीं गेलें.

एका हातांत हातोडा. अंगावर रंगानें डागळलेला 'ओव्हरऑल' तोंडावर खिळे तोंडांत धरल्याकारणानें जरा वाकडें झालेलें हसूं. अशा थाटांत स्वारीनें सामोरें येऊन माझें स्वागत केलें. "ये ना, ये, पाहा, कसं माझं घर झालं आहे तें." तोंडांतले खिळे टाकून अति आदरानें व उत्साहानें टिंचीनें मला आंत बोलावलें. "आवडलें तुला? हें बघ, इथें कामाची खोली. तुझ्या बापाचीं सारीं हत्यारें, माझीं हत्यारें. कशीं छान लावलीं आहेत पाहा तरी. हा काम करायचा बाक. हा दिवा, आतां दुसऱ्या खोलींत चला. हा छापखाना आहे, समजलीस? आवडला तुला?"

'डॉक्टर'च्या लहानपणींच्या खेळांतला सारा टाइप, छापखाना त्यानें अडगळींतून शोधून काढून व्यवस्थित रीतीनें जुळवून लावला होता.

"आणि ही एक आणखी खोली. हां, खालीं वाक नाहीं तर लागेल. इथें सगळ्या विजेच्या गाड्या ठेवल्या आहेत."

ही खोली त्याला अत्यंत आवडणाऱ्या विजेच्या गाड्यांकरतां होती. तेथें रूळ, स्टेशनें, सगळे सिग्नल दिवे, पूल, सारें सामान अत्यंत व्यवस्थित रीतीनें मांडलेलें होतें. या वयाला यापेक्षां अधिक चांगलें कोणाला मांडतां आलें असतें कीं नाहीं याची मला शंका आहे.

"तुला सांगतों, एक गोष्ट मात्र मीं चुकीची केली आहे." आपल्या विचित्र

भाषेंत तो सांगूं लागला. 'तुला पहिल्यांदां विचारायला हवें होतें. पण आतां सांगितलें तरी चालेल. हा जो दरवाजा मीं आणलाय, तो तूं म्हणत असशील तर फिरून जाग्यावर लावतों." पण तो असला तर त्याचें ऑफिस कसें छान खऱ्या खऱ्या दरवाजासारखें बंद करतां येतें हें दाखवून त्यानें मला किल्ली पण दाखविली. वरची पितळेची गुंडी फिरवून ऑफिस कसें उघडायचें तें पण सप्रयोग त्यानें मला दाखविलें.

"अरे, पण हा दरवाजा तूं आणलास कुठून?" मीं त्याला विचारलें. कारण त्याच्या पूर्वींच्या झोपडीला दरवाजा नव्हता.

"तो किनई मीं या छोट्या संडासाचा काढला. आपण तो वापरतो कुठें? पण तूं म्हणत असशील तर मी लावतों जागेवर अगदीं लवकर, लवकर,"

टिंची अत्यंत प्रामाणिक मुलगा होता. मी माझी पैशांची पिशवी घरांत कुठेंहि टाकीत असे. कधीं बाजारांत जायचें असलें कीं त्यांतून पैसे काढून घे म्हणून त्याला सांगत असें. पण त्यानें कधीं पैसे घेतले नाहींत. बाजारांतून वस्तु आणल्यावर अगदीं सेंटचा सुद्धां फरक न करतां बाकीचे पैसे तो बरोबर परत करीत असे. त्यांत कधीं एक सेंटची सुद्धां अफरातफर झाली नाहीं. पण इतर गोष्टींत मात्र त्याचें तत्त्वज्ञान पुरेपुर युद्धांतून उत्पन्न झालेलें होतें. त्याला पाहिजे असेल तें, दिसलें कीं तो खुशाल घेई व वापरूं लागे. त्यांत आपण चोरी करतों असें कधीं त्याला वाटलेंच नाहीं. लबाडीचा त्याचा बिलकुल हेतु नसे. वापरून वेळ काढायची, अडायचें नाहीं हा व्यावहारिकपणाच फक्त त्यामागें दिसून येई. वेळ कशी निभवायची हें टिंचीला छान कळत असे.

त्यामुळें एकादे वेळीं तुमचीच घेतलेली वस्तु तुम्हांला लागली तर तो जाऊन पटकन आणून देई. त्यानें ती घेतली असली तरी गरजेपुरती, त्यांत चोरायचा मुळींच उद्देश नसे. तुम्हांला गरज पडली कीं 'लवकर लवकर' ती तुमच्या पुढें हजर पण करीत असे.

तो दरवाजा पण त्यानें असाच घेतला होता. त्यानें म्हटलें तेंहि खरें होतें. आम्ही ती खोली कधींच वापरीत नसूं.

त्याच्या त्या कार्यालयाला ट्रोचानें त्याच्या धंद्याचें मुख्य ठिकाण, 'कार्यकेंद्र', असें नांव दिलें. टिंची शाळेपेक्षां सुद्धां या केंद्रांत अधिक रमे. पण अभ्यासाची अशा तऱ्हेनें हेळसांड करून भागलें नसतें; शाळेंत जाणें तर आवश्यकच होतें. नशिबानें त्याच्या सहाव्या वर्गाच्या शिक्षिकेचे डोळे निळे असल्यानें त्याला ते आवडले.

गेल्या वर्षीप्रमाणें भूगोलाचा तास याहि वर्षी त्याला आवडूं लागला. अंकगणितांत तर त्यानें पूर्वीपेक्षां खूपच प्रगति केली.

खेळांतहि त्याची प्रगति चांगलीच झाल्यामुळें मुलांना तो आपल्या बाजूला हवाहवासा वाटे.

त्याच्यांतील खिलाडूवृत्ति आतां चांगलीच वाढत असल्याचें वारंवार निदर्शनास येई.

इतर सगळ्या बाजूंनीं होणाऱ्या या प्रगतींत एकच मात्र उणीव होती. वाचनांत अजूनहि टिंचीचें पाऊल फारसें पुढें पडत नव्हतें. एक शिक्षक त्याला मुद्दाम शिकवीत असे; तो स्वतःहि खूप मेहनत घेतो असें दिसे. पण प्रगतीच्या दृष्टीनें मात्र अखेर शून्यच आढळून येई. अजूनहि तो घरीं वाचण्याचा बिलकुल प्रयत्न करीत नसे कीं माझी मदतहि घेत नसे. त्याला कुणीं कांहीं म्हटलेंच तर "घरीं 'मुलें शाळा करीत' नाहींत." असें तो खुश्शाल सांगे. त्यामुळें पुढचें सगळें बोलणेंच खुंटे—

मारामारी करण्याची त्याची संवय मात्र आतां खूपच कमी झाली होती. आतांशा तो बिलकुल मारामारी करीत नसे. वर्गाच्या निरनिराळ्या कामांत भाग घेत असतां त्याच्या स्वभावांतील दोन गोष्टी फारच प्रामुख्यानें दिसून येत. कुठेंहि कितीहि अव्यवस्था असो, त्यांत नीटनेटकेपणा, एक प्रकारची पद्धत व व्यवस्थितपणा आणण्याचें काम तो फारच दक्षतेनें व झपाट्यानें करी. त्यामुळें त्याला वर्गाच्या वाचनालयाचा व्यवस्थापक नेमण्यांत आलें. ताबडतोब त्यानें सारीं पुस्तकें आद्याक्षरांप्रमाणें नीट लावलीं. पुस्तकांचीं नांवें घालून कार्डेंहि तयार केलीं. त्यांवर नेणाराचें नांव, तारीख घालून व्यवस्थित रीतीनें तीं कार्डेंहि पण लावलीं. सारेंच काम अत्यंत सुव्यवस्थित व सुबक दिसूं लागल्यानें आंद्रिसला त्याचें श्रेय मिळणार असा रंग दिसूं लागला. इतक्यांत कार्लिसहि मध्येंच उपटला. मला वाटतें तो जर्मनींतून परत आला असावा. येतांना आपले गुण घेऊन यायला तो बिलकूल विसरला नव्हता. वर्गाच्या कामांत आंद्रिसबरोबर कार्लिसहि वास करीत असल्याचें निदर्शनास येऊं लागलें.

एकदां पुस्तकांतील किडा असणाऱ्या एका मुलानें त्याला एक पुस्तक काढून देण्याबद्दल सांगितलें. त्यासरशीं कार्लिस एकदम उसळला व त्याला नाहीं म्हणून तर त्यानें सांगितलेंच पण त्याहिवर अंगावर खेकसून तो म्हणतो, "जा, तुला पुस्तक देतच नाहीं जा. तुला इतकें कमालीचें घाणेरडें पडसें झालेंय तरी तूं खुशाल पुस्तकांत शिंकतोस. असें तूं शिंकलेलें पुस्तक कुणाला वाचायला आवडेल?

जा. चालता हो इथून. नाहींतर मला पडसें होईल जा. पडसें बरें होऊन नाक कोरडें झाल्याशिवाय पाऊल घालूं नकोस वाचनालयांत."

दुसऱ्या एका मुलाला त्यानें असेंच खडसावलें. "जा, तुला पुस्तक बिलकुल मिळणार नाहीं जा. गेल्या वेळेला बिचाऱ्या पुस्तकाची पाठ फाडून ठेवलीस. ती नीट करायला मला कित्ती वेळ लागला. तूं फाडतोस पुस्तकें. तेव्हां तुला बिलकुल देणार नाहीं मी माझीं पुस्तकें."

"हो, तुझ्या मालकीचीं नाहींत कांहीं तीं पुस्तकें" असें त्या मुलानें उत्तर दिल्याबरोबर कार्लिसनें खवळून उत्तर दिलें, "लक्षांत ठेव, माझ्या ताब्यांत जोंपर्यंत वाचनालयाची व्यवस्था आहे तोंपर्यंत हीं पुस्तकें माझीं आहेत. कोण म्हणतो नाहीं तें पाहतों मी ?"

"नाहीं" कोण म्हणणार? धजावतच नव्हतें कुणी नाहीं म्हणायला. मात्र एवढें खरें कीं ह्या बाबतींत वरिष्ठांनीं त्याची बिलकूल गय न करतां त्याला समजावून सांगून अखेर योग्य तें करायला भाग पाडलें. समजूत पडल्यावर तोहि सुधेपणें वळला पण. हेंच खरें कीं आंद्रिस कार्लिसच्या या जोडीला अजून वागायचें शहाणपण यावयाचें होतें.

सहाव्या वर्गाची वार्षिक झाली. शाळेचा अहवाल आला. "लोकांबरोबर वागण्यांत खूप सुधारणा झाली आहे" असें त्यांत लिहिलें होतें. 'चूक दाखवली तर नेहमीं सुधारायची तयारी असते' हें वाक्य तर आम्हांला फारच महत्त्वाचें वाटलें. एकूण आम्ही आणलें तर तारूं ताळ्यावर, असेंच आम्हांला क्षणभर वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

तारूं ताळ्यावर येऊं लागलें खरें पण बूट पॉलिश न करण्याचा त्याचा दुराग्रह मात्र अजून कायम राहिला. कधीं कधीं माझ्यावर खूष होऊन किंवा मला चकित करण्यासाठीं म्हणून तो माझे बूट पॉलिश करी. इतके कीं अगदीं नव्यासारखे ते चकचकूं लागत. पण स्वतःचे बूट पॉलिश करण्याचें मात्र तो नांव सुद्धां काढीत नसे. आम्ही पण आतां तिकडे फारसें लक्ष देत नसूं. त्यामुळें गबाळ बूट असलेले पाय घेऊनच तो इकडे तिकडे भटके. गंमत ही कीं आरशासमोर उभे राहून आपण कसे दिसतों हें पाहण्याकरतां तो आतां वारंवार केस सारूं लागला होता. पण बुटांकडे तो बिलकूल लक्ष देत नसे.

सुदैवानें बालवीर कॅम्प होता ते दिवस सोडले तर आतां उन्हाळा असल्यानें त्याला बूट पॉलिश करायची कांहींच जरुरी नव्हती. समुद्रावर उघड्या पायानें त्याला खुशाल हिंडतां येत होतें. असो. टिंचीचा १९५२ चा उन्हाळा अशा रीतीनें पूर्ण मजेंत गेला.

## ७. ‘बालवीर चमूंचा जंगी मेळावा’

उन्हाळा संपला. फिरून शाळा सुरू झाली. आंद्रितितिनिसच्या ७ वीची सुरवात तरी फारच अकल्पित तऱ्हेनें छान झाली, असें म्हटलें तरी चालेल. “त्याच्या वर्गानें सामाजिक अभ्यासक्रमामध्यें लटाव्हियाचा अभ्यास सुरू केला. ही गोष्ट यदृच्छया घडून आली कीं कोणाचा त्यामागें बुद्धिपुरस्सर हात होता हें कळायला मार्ग नाहीं. पण एवढें खरें कीं लटाव्हियाचा अभ्यास सुरू झाला.

हा एक विषय असा होता कीं ज्यांत टिंचीला आपल्या वर्गातील कोणत्याहि मुलापेक्ष कितीतरी जास्त माहिती होती. नेहमीं ‘परकी’ आणि जरा ‘चमत्कारिक’ अशा रीतीनें ओळखला जाणारा टिंची या विषयांतला तज्ज्ञ म्हणून ओळखला जाऊं लागला.

त्यानें जसें आठवत होतें तसें, म्हणजे त्याच्या अर्धवट लटाव्हिअन भाषेंत लटाव्हियाचें राष्ट्रगीत मुलांना म्हणून दाखविलें. त्यांत तो कांहीं विसरला असला किंवा गळलें असलें तरी कुणाला कळणें शक्य नव्हतें.

### *लटाव्हिअन राष्ट्रगीत*

*लटाव्हिअन भाषेंत*

Dievs, Svetī Latviju
Mūs' dārgo teviju!
Sveti jel Latviju,
Ak, svetī jel to!

Kur latviju meitas zied
Kur latviju deli dzied
Laid mums tur laime diet,
Mūs' Latvijā!

—by Karlis Baumanis

*त्याचें मुक्त इंग्रजी रूपांतर*

God bless our Latvian land,
Prosper our Fatherland
With thy Almighty hand
Oh, shield us and bless.

Let Latvian sons rejoice,
Her daughters fair and choice,
All singh with heart and voice
Bless Latvia!

*मराठींतील स्वैर अनुवाद*

**लटाव्हिआ ही आमुची भूमि। ईशा राखीं तूं तिजला।**
**विभवाप्रत ने प्रिय भूमीतें। सर्वशक्ति तूं तुज न तुला**
**तुझ्याविना अजि कोण रक्षिता। अमुचा जगतीं नच उरला**
**म्हणुनी रक्षीं देवा आम्हां। आणि आमुच्या प्रियभूला ॥ १ ॥**

**लटाव्हियाचे सुपुत्र सगळे। एक मिळुनिया गाऊं या।**
**तिच्या कन्यका अप्सराच जणुं। त्याही येतिल बघ गाया।**
**सगळीं मिळुनी एक सुरानें। एक मनानें गाऊं या।**
**देवा रक्षीं आशीर्वचनें। अमुची प्रिय भू लटाव्हिया ॥ २ ॥**

त्यानें मुलांना लटाव्हिअनमध्यें तोंडचे हिशेब भराभर करून दाखविले. त्यानें लटाव्हिअन चित्रें दाखविलीं. घरीं आगाऊ मेहनत घेऊन त्यानें तिथलीं गाणीं पण म्हणून दाखविलीं. घरीं मेहनत करतांना ट्रोचाला नी मला पण त्यानें ते शब्द शिकविण्याचा प्रयत्न केला.

माझ्याजवळ लटाव्हिअन शब्दकोश नसल्यानें तो जें काय ओरडे त्यांतून मला जो शब्दबोध झाला तो मी खालीं देऊन त्याचें गाणें देत आहे.

**ढम्‌ढम्‌ बडवित जॉनी आला। हुर्रे, हुर्रे!।**
**बालकगणही गोळा केला। ,, ,,**
**सेंट जॉनचा सणही मोठा। ,, ,,**
**आनंदाला कधीं न तोटा। ,, ,,**
**जॉन जयाचें नांव राहिलें।**
**देवदारपर्णांनीं सजले।**
**मुकुट, घालुनी पुढें ठाकले। ,, ,,**

मला मागाहून कळलें कीं Ligua ह्या शब्दाचें इंग्लिशमध्यें बरोबर भाषांतर करितां येणार नाहीं. त्याचें खरें स्पेलिंग Liga असें आहे. आणि तो तसाच इंग्रजींत राहणार. बहुतेक तो संस्कृतमधून आला असावा. त्या भाषेंत त्याचा अर्थ

'दैवी प्रकाश' असा असावा. थोडक्यांत 'देवाची कृपा' असा त्याचा अर्थ घेतां येईल.

पण टिंची गातांना इतका ओरडे कीं त्याचा अर्थ देवकृपा असा वाटण्यापेक्षां लोकांनीं आनंदानें काढलेले उद्गार असाच होतो आहे असें आम्हांला वाटे म्हणून मी त्याचें 'हुर्रे' शब्दानें भाषांतर केलें. 'सेंट जॉनच्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या सर्व मुलांवर देव कृपा करो' असा त्याचा अर्थ असावा.

टिंची हीं गाणीं फारच उत्साहानें व इतक्या जोरानें म्हणे कीं बरेच वेळां तो बेसूर होई. त्यामुळें मुलें तर हसूं लागतच पण त्यालाहि हसूं आल्याशिवाय राहत नसे.

"तुम्हांला आमच्या राष्ट्रीय निशाणाची माहिती हवी आहे ना? ऐका तर. आमचें निशाण लाल रंगाचें आहे. पण कांहीं कापलें म्हणजे येणाऱ्या लाल भडक रक्ताचा रंग नाहीं त्याचा. जरासा काळपट लाल, रक्त वाहत नसलें म्हणजे होतो तसा—कसं बरं सांगूं?...रक्त सुकायला लागलें...वाहायचें थांबलें, म्हणजे होतो त्याप्रमाणें लाल. त्याच्या खालच्या बाजूला बरोबर मध्यावर पांढरा रंग आहे. खूप मोठा नाहीं. पातळ, हो, अरुंदशी पांढरी पट्टी. ती पट्टी बिछाना दाखवते. त्या ठिकाणीं देशाकरतां प्राण खर्ची घालणारा लटाव्हियन शिपाई जखमी होऊन पडतो. तो असतो त्या पांढऱ्या पट्टीखेरीज बाकी सगळा लाल रंग म्हणजे त्याच्या अंगांतून वाहणारें देशाकरतां सांडलेलें रक्त. कळलें? आवडली तुम्हांला आमच्या निशाणाची हकीकत. लटाव्हियामध्यें मी असतांना मला कुणींतरी सांगितली होती."

बाल्टिक संस्थानांची सुद्धां त्याला किती तरी माहिती होती. फिनलंडला पण तो गेला होता. तो बाल्टिक समुद्रांतून जात असतांनाच ती लहानशी छोकरी मरण पावली होती. ती इतकी छोटी होती कीं पाण्यांत भिजवून पावाचा तुकडा दिला तरी तिला खातां येत नव्हता. युद्धामध्यें तेथें कसें काय लोकांचें जीवन होतें याची त्यानें वर्गाला चांगलीच कल्पना दिली. पण मजा ही कीं लटाव्हिअन भाषा जशी तो विसरला तशा युद्धाच्या त्या त्याच्या आठवणींवर पण काळाचा पडदा पडून विस्मृतींत जात होत्या.

याच दिवसांत तो एक दिवस घरीं आला नी मला म्हणूं लागला, 'आम्हांला सगळ्यांना एकेक, खरी खरी, घडलेली गोष्ट वर्गात सांगायची आहे. मला काय सांगावें तेंच सुचत नाहीं." असें म्हणून त्यानें एक मोठा सुस्कारा टाकला.

"कां, ती तुमच्या राष्ट्रीय निशाणाची सांग कीं. रशियन सैनिकांनीं तुमच्या

राष्ट्रीय निशाणांची कशी होळी केली व तुम्हांला आपलीं निशाणें कशीं जाळायला लावलीं ? तूं आपलें निशाण न जाळतां कसें लपविलेंस, तें सारें सांग कीं. सुंदर आहे ती गोष्ट."

"काय सांगते आहेस तूं? मला कांहींच कसं आठवत नाहीं ?"

"अगदींच कसा...बुवा तूं–ती रे—गोष्ट कशी विसरलास! तूं नाहीं का म्हणत असस कीं रशियन शिपायांच्या संगिनींची तुला कमालीची भीति वाटे तरीपण तेवढ्यांत मोठ्या शिताफीनेंतूं आपलें स्वतःजवळचें राष्ट्रीय निशाण लपविलेंस—"

"खरं सांगूं, मला त्या शिपायांची फक्त एकच गोष्ट आठवते आहे. ती म्हणजे ते आम्हांला मध देत असत ती. इतका छान मध असे तो! आम्हांला पूर्वी कधींच मध मिळत नव्हता. तें मला आठवतें पण हें तूं संगीनीचें म्हणतेस हें कांहीं आठवत नाहीं."

"तुझी स्मरणशक्ति दगा द्यायला लागलीसें दिसतें आहे. कित्ती वेळांतरी तूं आम्हांला सांगितलें आहेस कीं तुम्ही सारीं मुलें आपलीं लहान लहान राष्ट्रीय निशाणें कशीं हलवीत होतां, निशाणें नसतील त्या मुलांनीं लहानशीं टांचणी-वरचीं निशाणें शर्टाला कशीं लावलीं होतीं, इतक्यांत एकाएकीं रशियन शिपाई कसे आले, त्यांनीं तुम्हांला एक होळी पेटवून त्या भोवतीं कसें फिरायला लावलें, व फिरतांना निशाणें फेकायला कसें लावलें; तुम्हांला त्यांच्या बंदुकीवरच्या लांब लांब सुऱ्यांकडे पाहिलें कीं कशी भीति वाटत असे, तरीसुद्धां तूं आपलें निशाण..."

"हां, मीं तें माझ्या गणिताच्या पुस्तकांत ठेवलें" त्याला एकदम आठवण होऊन दुवा उचलून तो बोलूं लागला. बोल्शेव्हिक शिपाई आम्हांला शाळेचीं पुस्तकें ठेवूं देत असत म्हणून मीं तें निशाण हळूच माझ्या अंकगणिताच्या पुस्तकांत घडी करून ठेवलें नी सुरक्षितपणें येथें अमेरिकेंत घेऊन आलों. कसं फसविलं त्या तपकिरी डोळेवाल्यांना! आतां मला आठवतंय सारं! हो, ते आम्हांला मध द्यायचे तें म्हणजे त्यांच्याविषयीं चांगलें मत व्हावें म्हणून आणि आमचीं निशाणें सारीं 'टप्पकन्' होळींत फेकायचे'. वरून गोड दाखवून मग असे वागणारे लोक मला नाहीं आवडत."

मागल्या आठवणी उसळून आल्याबरोबर त्याच्या चेहऱ्यावर आंठ्या दिसूं लागल्या. त्याचा नुकताच फुटूं लागलेला आवाज फारच कर्कश झाला.

लहान मुलाच्या मनाची किती गंमत असते! काळाबरोबर त्यांच्या सगळ्या

वाईट आठवणीवर विस्मृतीचा पडदा ओढला जाऊन आठवणींत राहतें तें फक्त चांगलें. टिंचीची जर्मनीची आठवण अशीच गुलाबाच्या फुलांनीं लदलेली होती. रशियन सैनिकांबद्दलहि त्याला आठवत होतें तें एवढेंच कीं त्यांनीं या पोरक्या पोरांना मध खायला दिला.

अमेरिका व 'प्रेमळ घर' यांनीं मिळून त्याच्या मनावरील दुःखाचें पटल नाहींसें करण्याचा प्रयत्न केला. त्यांत पोलादी सुऱ्या, रक्त, यांच्या आठवणीसुद्धां पार बुझून गेल्या.

मागें आठवणी राहिल्या त्या साऱ्या गुलाब व मध, मध व गुलाब यांनीं भरलेल्या होत्या.

अशा रीतीनें जसजशी त्याची भीति जात चालली तसतसें त्याचें बॉंबचें भय पण नाहींसें झालें. दुसऱ्या उन्हाळ्यांत आम्ही समुद्रकांठीं राहत असतां सगळीं मुलें समुद्रांतून किनाऱ्यावर वाहून आलेल्या एका जेलीफिशमधून जेली घेऊन बर्फाचे गोळे एकमेकांवर फेकावे तसे फेकीत होतीं. टिंचीनें नुकताच एक जेलीचा गोळा दुसऱ्या मुलाच्या उघड्या पाठीवर फेकला होता. इतक्यांत एक विमानांचा तांडाच्या तांडा भयंकर कर्कश आवाज करीत वरून गेला. पण टिंचीनें नुसतें वर सुद्धां पाहिलें नाहीं. दुसऱ्या एका मुलानें त्याच्या तोंडावर धरलेला नेम चुकविण्यांतच तो दंग होता. एवढ्यांत तीं विमानें पार गेलीं.

"टिंची, तूं पाहिलींस तीं आतां विमानें गेलीं तीं?" मी मुद्दाम कुतूहलानेंच विचारलें.

"जेट विमानें होतीं तीं" खेळांत दंग असल्यानें नुसती नजरसुद्धां न फिरवतां त्यानें उत्तर केलें.

जेट विमानें म्हणजे युद्धनौकाच त्या, पण त्यांचीसुद्धां त्याला भीति वाटेनाशी झाली होती. बॉंबचें भय तर त्याला आतां आठवत सुद्धां नव्हतें.

घरीं कित्येक वेळीं बोलतां बोलतां, टिंचीच्या पहिल्या गोष्टी निघायच्या; त्यानें आवारांत मोटार चालवतां चालवतां पोर्चचा भाग कसा पाडला, इत्यादि त्याचे पूर्व पराक्रम कुणी कुणी सांगूं लागे. टिंचीला अर्थात् त्यापैकीं कांहींच आठवत नसे. "छे, मीं कधींच असें केलें नाहीं. तुम्ही बनवतां आहां," असें तो म्हणूं लागे. टिंचीचे दुःखद अनुभव जसे पुसून चालले होते तशाच याहि गोष्टी त्याच्या मनांतून पुसून जात आहेत, असें आम्हांला आढळून आलें.

आम्हीं त्याला आठवणी करून दिल्याच तर तो म्हणे "बरें झालें मी विसरलों

तें. मला सगळं वाईट तेवढं विसरायला पाहिजे आहे. मी वाईट वागलों असेन तें सुद्धां. वाईट आठवण्यापेक्षां चांगल्याच गोष्टी आठवलेल्या बऱ्या नाहीं का?"

एवढें खरें कीं या गुलाबी आठवणींची स्मृति राखीत असतां त्यानें राष्ट्रीय निशाणाची ती गोष्ट मात्र पक्की आठवणींत ठेवली. मीं सांगितल्याप्रमाणें शाळेंत तो निशाणाची गोष्ट सांगत असतां त्याच्या साऱ्या खोलवर दडलेल्या स्मृति उफाळून बाहेर येऊं लागल्या. नदीच्या एकाद्या प्रवाहासारखें त्याचें मन होतें. जुन्या आठवणी खालीं जात जात तळाशीं निरनिराळ्या खोलीवर तरंगत होत्या, तर कांहीं विस्मृतीच्या गाळांत पार गाडल्या जाऊन नामशेष झाल्या होत्या. अशाच गाळांतून ही गोष्ट वर उफाळून येऊन त्यानें ती साऱ्या वर्गाला सांगितली. मनापासून उसळून येऊन सांगितली. सांगतां सांगतां रागद्वेषाच्या भावनांनीं त्याचा चेहरा कावराबावरा झाला. त्याच्या दृष्टीनें तरी एक प्रकारें ती गोष्ट मुलांना कळली हें फार बरें झालें. त्यामुळें हा रशियन नसून लटाव्हिअन आहे—रशियाचा वैरी आहे, ही गोष्ट मुलांना कळली. पूर्वी हें माहीत नसल्यानें पुष्कळशीं मुलें त्याला रशियन समजत व 'ए स्टॅलिन, जा कीं मास्कोला परत' म्हणून ओरडत त्याच्या पाठीमागें लागत. त्याच्याविषयीं सहानुभूति असलेले लोक सुद्धां त्याच्याविषयीं उल्लेख करतांना तो रशियन मुलगा म्हणून उल्लेख करीत आणि त्याला तें फार लागे.

आपण त्या बोल्शेव्हिक शिपायांच्या डोळ्यांदेखत त्यांना फसवून आपलें राष्ट्रीय निशाण कसें बाहेर आणलें, इतर मुलें कशीं फसलीं व मग रडूं लागलीं, याचें त्यानें फार परिणामकारक चित्र मुलांच्या पुढें उभें केलें. त्यानंतर त्याला 'रशियन' म्हणून कोणींच संबोधिलें नाहीं.

एवढ्याशा चिमुरड्या वयांत सैनिकांच्या व त्यांच्या संगिनींच्या भीतीला न जुमानतां ज्यानें आपलें निशाण बाहेर काढलें तो आपल्या आक्रस्ताळीपणाच्या भरांत आम्हांला दाद देत नव्हता याचें कांहींच आश्चर्य नाहीं असें एक वेळ माझ्या मनांत येऊन गेल्याशिवाय राहिलें नाहीं.

टिंचीच्या वर्गात लटाव्हियाचा अभ्यास चालू असतां मला त्या देशाबद्दल पुष्कळच गोष्टी कळल्या.

लटाव्हिअन भाषा इतर युरोपिअन भाषांप्रमाणें नसून ती संस्कृतशीं बरीचशी जुळती मिळती आहे हें कळल्यावर टिंचीला इंग्रजी शिकायला इतका त्रास कां पडतो हें मला सहज उमगूं शकलें. आमच्या सातव्या वर्गातील लटाव्हिअन प्रश्नावरील अधिकारी व्यक्तीपेक्षां एका बऱ्याच मोठ्या गृहस्थांनीं मला सांगितलें कीं

ग्रीक भाषेपेक्षां लिथ्वानियन भाषा जास्त अवघड आहे. कॉलेजमध्यें होमर, डेमॉस्थिनिस यांची ओळख करून घेतांना मला ग्रीक भाषेचा चांगलाच अनुभव होता त्यामुळें लिथ्वानिअन, लटाव्हिअन, संस्कृत या साऱ्या माझ्या आवांक्या-बाहेरच्याच भाषा आहेत असा मीं थोडक्यांत निष्कर्ष काढला.

टिंचीच्या वर्गानें बाल्टिक राष्ट्रानंतर स्कॅन्डिनेव्हिआ, जर्मनी, नेदरलंड्स यांचा अभ्यास सुरू केला. त्यामुळें टिंचीचा वर्गांतील भाव एकंदरींत चांगलाच वाढला. जर्मनीविषयीं, प्रत्यक्ष तो तेथें राहिला असल्यानें, त्याला इतर मुलांपेक्षां किती तरी माहिती होती. त्यामुळें कांहीं वेळापुरता कां होईना वर्गाच्या अग्रभागीं राहण्याचा मान त्याला मिळाल्याकारणानें त्याच्या मनाला किती तरी समाधान वाटलें.

नॉर्वे, स्वीडन, बेल्जम या राष्ट्रांविषयीं त्यानें बरीच माहिती दिली. "युद्धा-नंतर निर्वासित मुलांची काळजी घ्यायचें जेव्हां ठरलें तेव्हां स्वीडननें क्षयरोगी असलेलीं मुलें घेण्याचें कबूल केलें. नॉर्वेला पहिल्या महायुद्धानंतर घेतलेल्या जर्मन मुलांचा फार वाईट अनुभव आला होता. त्यांनीं खुद्द नॉर्वेच्या विरुद्धच या युद्धाच्या आरंभीं हेरगिरी केली. त्यामुळें फार साशंक राहून या खेपेला त्यांनीं फक्त अपंग मुलेंच घ्यायचें कसेंबसें कबूल केलें. बेल्जमनें फक्त आंधळीं मुलें तेवढीं घेतलीं. निरोगी, दणदाकट, अनाथ होतीं तेवढ्यांनाच कॅनडा, ऑस्ट्रेलिया व युनायटेड् स्टेट्स यांतील घरांतून शिरकाव मिळणार होता. मला U. S. A. ला पाठविलें त्याअर्थीं मी चांगलाच असलों पाहिजे अशी माझी कल्पना होती. पण काय ? इथें येऊन पाहतों तों मी कांहींच नाहीं," असें म्हणून टिंचीनें दीर्घ सुस्कारा सोडला.

आतां सातव्या वर्गात आपण मागें पडूं अशी भीति त्याला वाटूं लागली होती. "शाळेंत मी कुठेंच कांहीं नाहीं" त्यानें मला सांगितलें आणि कां कोण जाणे तेव्हांपासून शाळेच्या अभ्यासांत चांगली प्रगति दाखवावी अशी ईर्षा त्याला उत्पन्न झाली.

'घरीं अभ्यास करायचा नाहीं' वगैरे त्याची भाषा आतां पार नाहींशी झाली. माझ्या सगळ्याच मुलांना केव्हां ना केव्हां तरी "पांच वाजतां घरांत येऊन 'सपर'-पूर्वी तुम्हीं घरचा अभ्यास केलाच पाहिजे" अशी मला ताकीद करावी लागे. पण आतांशें टिंचीचें अभ्यासाकडे इतकें लक्ष लागलें होतें कीं, मधमाशी जशी सरळ पोळ्याकडे परत जाते, तसा तो घरीं येई. मी चारला शाळेंतून परत येतें आहे तों, टिंची पुस्तकें मांडून अभ्यासाला बसलेला मला दिसूं लागला.

"तूं येण्यापूर्वी जितकें करतां येईल तेवढें करतों." मला तो हसत सांगे. त्याच्या बाबतींत अभ्यासापेक्षां शाळा सुटल्यावर त्यानें खेळायला पाहिजे असेंच बहुधा सांगायची पाळी माझ्यावर येई.

"आतां मी मोठा झालों. मला अभ्यासाकडे लक्ष दिलें पाहिजे. खेळत बसून कसें चालेल?" तोच मला शिकवूं लागला.

T. V. ची त्याला कमालीची आवड, पण सगळा अभ्यास संपल्याशिवाय तो तिकडे आतां ढुंकूनसुद्धां पाहत नसे.

पहिले कांहीं दिवस तरी सातव्या वर्गाचे विषय टिंचीला फारच गोंधळाचे व अवघड वाटत असत. त्यामुळें एकाद्या आंधळ्या मुलाप्रमाणें त्याचीं पुस्तकें ट्रोचा किंवा मी त्याला मोठ्यानें वाचून दाखवायला सुरवात केली. अगदीं नवीन आला असतां तो जसा लक्ष लावून अभ्यास करी तसाच आतां एकाग्र चित्त करून तो आम्हीं वाचलेलें ऐकत राही व म्हणे "फारच मनोरंजक आहे नाहीं?"

कांहीं दिवसांपूर्वी सुतारकाम किंवा रंगकाम करीत असतांना तो जितकें अत्यंत मन लावून काम करी त्याच तऱ्हेनें आतां अभ्यासांतहि तो तसेंच मन लावून काम करूं लागला. अभ्यासाची हेळसांड करायची, तिकडे लक्षच द्यायचें नाहीं, असें जें त्यानें मध्यें आरंभलें होतें, तें पार नाहींसें झालें. याचा परिणाम असा झाला कीं शाळेंत सातवी वर्ग शिकवून थकल्यावर टिंचीला घरीं तेच विषय शिकवावयाचा माझा उत्साह कायम राहिला. याचें सारें श्रेय टिंचींत जो हा नवा बदल घडून आला, त्यालाच द्यावयाला पाहिजे.

"टिंची, तूं इतका रे कसा बदललास?" मीं त्याला विचारलें.

"वाः ज्युनिअर खरी खरी कठीण आहे. तिथें अभ्यास केलाच पाहिजे. आतांपर्यंत काय लहान पोरसोरांच्या यत्ता होत्या."

हें होतें त्याचें कारण.

ज्युनिअरला बरेचसे पुरुष शिक्षक शिकवायला असत तेंहि त्याला बरें वाटे.

टिंचींत झालेला हा बदल त्याच्या चांगलाच पथ्यावर पडला. निरनिराळ्या विषयांत त्याला चांगले मार्क पडूं लागले. अभ्यासांत, वागणुकींत, सगळीकडेच त्याची प्रगति दिसून येऊं लागली. लहानपणीं असलेली खोड्या काढण्याची प्रवृत्ति पार गेली. त्याच्याबद्दल शाळेंतून जे अहवाल येत त्यांत आतां चांगलेच शेरे असत.

"मनोनिग्रह चांगलाच दाखवतो."

"विनयशील वागण्याचा छानच प्रयत्न करतो."

"चांगला मेहनती."

"दुसऱ्यांबरोबर सुरेख जमवून घेतो."

अभ्यासाव्यतिरिक्त कामांत दाखविलेल्या प्रगतीबद्दल त्याला शाळेंतून एक मानपत्रिका देण्यांत आली. शिवाय क्रीडांगणावर मुलांची सुरक्षितता पाहण्याचा अधिकार त्याला देण्यांत आला.

टिंचीच्या दृष्टीनें ही गोष्ट फारच महत्त्वाची होती.

शाळेंत सर्व बाजूंनीं तो चांगलाच जम बसवीत होता हें खरें, तथापि अजून-हि मुलांशीं त्याला तितकी चटकन् मैत्री जोडतां येत नसे. मध्येंच केव्हां तरी कार्लिस उसळून डोकें वर काढी. शिवाय टिंची स्वतःच्या कामांत इतका गर्क असे कीं, त्याला वेळ जाण्याकरितां म्हणून मित्राची फारशी कधींच जरुरी भासली नाहीं. मला वाटतें, त्याला चटकन मित्र न मिळण्याचें कारण हेंच असावें. मैत्री जोडण्याकरतां तो तितकी खटपट करीत नसे.

टिंचीचा अभ्यास घेत असतां एक गोष्ट माझ्या लक्षांत येऊन चुकली कीं, व्याकरणाच्या बाबतींत टिंचीची ग्राहकता फारच उत्तम आहे. इंग्रजी भाषा बोलण्या-संबंधीं असलेली त्याची अनास्था, एरवीं असणाऱ्या भाषाविषयक त्याच्या सगळ्या अडचणी नेहमीं पाहत असल्यानें, त्याचा व्याकरणाचा पाया पक्का असावा याबद्दल मी चांगलीच जागरूक होतें. त्या बाबतींत मला कल्पनेबाहेर यश आलें. तसें, आतांपर्यंत टिंची कोणत्याच भाषेचें व्याकरण शिकलेला नव्हता. तरीसुद्धां कमालीच्या झपाट्यानें त्यानें व्याकरणाचे नियम लक्षांत ठेवणें सुरू केलें. वाक्य व्हायला कर्ता क्रियापद कसें लागतें, हें त्याच्या ताबडतोब लक्षांत आलें. कोणत्याहि वाक्यांतील नाम, क्रियापद, शब्दयोगी अव्ययें, वाक्प्रचार तो ताबडतोब ओळखी व त्यावर न चुकतां खुणा करी.

मला तर पुष्कळदां असें वाटूं लागे कीं, आधीं इंग्रजी बोलण्याचा अट्टाहास करण्यापूर्वी आम्हीं त्याला व्याकरणाचे नियम समजावून सांगितले असते तर त्याला चटकन् भाषा आली असती.

एक दिवस घरच्या अभ्यासांत टिंचीला ब्रिटिश बेटांतील उत्पन्नें लिहावयाचीं होतीं. तीं लिहितांना नुसती यादी न देतां इंग्रजी 'कॉम्पोझिशन' म्हणूनहि तीं उत्तरें नीट इंग्रजींत लिहावयाचीं होतीं. मी सहज तो काय लिहितो आहे हें पाहिलें तर स्काटलंड—ओट एवढेंच त्यानें लिहिलें होतें. मीं म्हटलें "बा, तें वाक्य

पुरें कर कीं. 'कॉम्पोझिशन' लिहितोस ना? मग असें कसें चालेल?"

"हां, स्काटलंडला क्रियापद पाहिजे नाहीं का?"

'क्रियापद', 'क्रियापद' करीत त्यानें वाक्य पुरें केलें.

दुसऱ्याच दिवशीं मी माझ्या शाळेंत जायला निघालें. वाटेंत शाळेच्या कोंपऱ्यावर टिंचीला सोडला व म्हटलें, "गुडबाय भेटेन मग."

आज त्याला संधि मिळाली. माझ्याकडे पाहून मिस्किलपणें हसत टिंची म्हणतो, "वाक्य पुरें कर कीं. तुझ्या वाक्याला कर्ताच नाहीं." त्याचें तें गोलमाल इंग्रजी बोलणें ऐकलें कीं, व्याकरण त्याला इतक्या चटकन कसें येऊं लागलें याचें आश्चर्य वाटे.

याच अवधींत टिंचीचा आमच्या घराविषयींचा आपलेपणा पक्की करणारी आणखी एक गोष्ट घडून आली. माझ्या बहिणीनें आपल्या दोन जुळ्या मुलांच्या वाढदिवसाच्या निमित्तानें मला जेवायला बोलावलें होतें. रिची आणि चार्लीपैकीं चार्लीचा 'सिनेमागृहांतून घालवून दिल्याचा' टिंचीनें केलेला उल्लेख मागें आलाच आहे. 'हें बघ आपलीं आपण फक्त कुटुंबांतलींच माणसें आहोंत, दुसरें कोणी नाहीं, तरी तुम्ही याच' तिनें मला बजावून सांगितलें.

"मग मी नाहीं येत." टिंची म्हणूं लागला. "वाः, तुला तर यायलाच पाहिजे. त्यांनीं तुला बोलावलें आहे एवढेंच नव्हे एक 'गंमत' सुद्धां तुझ्याकरतां आणली असल्याचें मला माहीत आहे." मीं त्याला समजावून सांगितलें.

"पण त्या तर म्हणाल्या 'फक्त कुटुंबांतली मंडळी, दुसरे कोणी नाहीं'."

"अरे पण तूं कुटुंबांत येतोस कीं. तिचे दोन मुलगे जसे तिच्या कुटुंबांत येतात तसाच तूं. तूं माझाच मुलगा नाहींस का? तूं माझ्या कुटुंबांत येतोस."

"खरंच? खरं सांगते आहेस तूं!" अगदीं आश्चर्यचकित होऊनच त्यानें विचारलें. "मी खरंच कुटुंबांत येतों!" म्हणून तो आनंदानें नाचूं लागला. "तुला माहीत आहे मला नेहमीं एकादा भाऊ हवासा वाटे. आतां एक सोडून दोन भाऊ. जुळे. किती छान! काय, कसं काय वाटतं तुला?"

त्रेपन्न सालच्या हिवाळ्यांतील दुसरी सहामाही सुरू झाली, त्यावेळीं टिंचीला पूर्वीसारखें वाचून दाखवायची जरूर नाहींशी झाली.

"आतां मी स्वतः वाचूं शकतों, फक्त कठीण शब्द आले कीं मी तुला विचारीन." त्यानें मला आश्वासन दिलें.

"काय रे आतांपर्यंत नाहीं आणि आत्तांच कसं तुला एकदम वाचतां येऊं लागलं?" मीं मुद्दामच त्याला विचारलें.

"बरं तुला सांगतों अं...माझी गंमत!" असें म्हणून त्यानें सुरवात केली. "आतां माझं खरंखुरं घर इथं झालंय. मी ह्या घरांतला—कुटुंबांतला एक आहें ह्या कल्पनेमुळें किती आनंद वाटतो सांगू! यामुळें तुमच्या साऱ्याकरतां मी वाचीन. तुमची इंग्रजी भाषापण शिकेन. मी आतां तुमचा आहें ना?"

एकूण आतांपर्यंत न वाचण्याचें व आतां एकदम वाचायला लागायचें हें उत्तर होतें तर!

आतां त्याला नुसतें वाचतांच नव्हे, लिहितां सुद्धां येऊं लागलें होतें. कोण-त्याहि विषयाची त्याची ग्रहणक्षमता चांगलीच होती. तथापि अजून त्याचें स्पेलिंग तितकेंसें चांगलें नसल्यानें शिक्षक कांहीं वेळां त्याची लेखी परीक्षा घेण्याऐवजीं तोंडी परीक्षा घेऊन त्याला विषयाचें ज्ञान कितपत झालें आहे याची चाचणी घेत.

त्याच्या प्रगतीच्या मार्गांत स्पेलिंगची मात्र चांगलीच धोंड होती. एक दिवस संध्याकाळीं तो असेंच स्पेलिंग करीत असतां इतका थकला कीं त्याच्या आवांक्या-बाहेरचें तें काम आहे असें मला वाटूं लागलें. मी सुद्धां निराश झालें. त्याला मदत करायची तर मीसुद्धां इतकी थकलें होतें कीं तेवढें त्राणच माझ्यांत उरलें नव्हतें. अशा मनःस्थितींत आमच्या नेहमींच्या धोरणाला सोडून त्याला मीं म्हटलें, "टिंच, या यादींतील सगळेच्या सगळे शब्द जर तूं बिनचूक लिहिलेस तर मी तुला शब्दागणिक एकेक डॉलर देईन."

मला फारसें द्यावें लागणार नाहीं ही जवळ जवळ माझी खात्री होती. टिंचीला मात्र असलें आमिष आवडलें नाहीं. किंबहुना थोड्याशा निर्भर्त्सनेच्या स्वरांतच तो म्हणतो: "तुला आज काय झालें, असें बोलायला? मला जें करायलाच पाहिजे तें करण्याबद्दल मी तुझ्याकडून पैसे घेऊं? तूंच ना मला सांगतेस कीं घरांत काम केल्याचे किंवा अभ्यास केल्याचे पैसे मिळत नसतात म्हणून. आणि आज तूं एकदम मला सांगतेस कीं तुझ्या शब्दागणिक मी तुला डॉलर देईन म्हणून. छे. मला नकोत ते तुझे डॉलर. मी शिवणार सुद्धां नाहीं तशा पैशाला. राहूं दे डॉलर तुझ्याच जवळ, तुला बिलें द्यायला उपयोगी पडतील."

मला हसूंच आलें त्याचें बोलणें ऐकून. "बरं, डॉलर नाहीं तर नाहीं, मी तुला प्रत्येक बिनचूक शब्दागणिक डॉलरचा चौथा हिस्सा देईन. मग तर झालें?"

"वा ग, चाथा हिस्सा काय नी डॉलर काय, हा मुळीं प्रश्नच नाहीं. मुळांत पैसे द्यायची कल्पनाच चुकीची आहे. नको, मला डॉलरहि नको कीं त्याचा चौथा हिस्साहि नको. रागावूं नकोस मी स्पष्ट बोलतों म्हणून, पण हें तुझें म्हणणें वेड्यासारखें नाहीं का?"

मला आतां मात्र राहवेना. मी चांगलीच हसत सुटलें. "अरे वेड्या, तुला कठीण काम केल्याबद्दल बक्षीस देत होतें मी."

"अंहं, मला नाहीं तें पटत." त्यानें आपली नापसंती दर्शवीत मला म्हटलें. "मला तर वाटतें कीं तुझें हें असे पैसे देणें हा एक प्रकारचा जुगार–शर्यत आहे. बाईसाहेब, आपणच मला सांगतां ना जुगार खेळणें वाईट म्हणून. एक दिवस मी असेंच केलें नी जिंकलों, तर तूं किती रागावलीस मला! 'कधीं असें फिरून करशील तर याद राख', म्हणून दम दिलास केवढ्यांदातरी ओरडून. आणि आतां तूंच असें करतेस? मला कधीं कल्पना नव्हती कीं तूं स्वतःच असें वागशील म्हणून!" त्यानें चांगल्या कडक शब्दांत मला दोष दिला. मी एकदम नरम होऊन त्याला सांगितलें कीं, "डॉलरच्या गोष्टी करणें बरोबर नव्हतें हें खरें आहे तुझें म्हणणें. पण मी कांहीं तुझ्याबरोबर शर्यत बांधीत नव्हतें. स्पेलिंग करतांना तुला त्रास होण्याऐवजीं मजा वाटावी म्हणून माझा तो एक उपाय होता एवढेंच."

"करेंहि असलें तरी पैसे घेतल्याशिवाय मी स्पेलिंग पाठ करीन" त्यानें मला आश्वासन दिलें. "समज माझे कांहीं शब्द बरोबर आले तर ठीक, पण सगळेच चुकले तर? छट् अशा गोष्टीवर डॉलर खर्चायला तुझा पैसा कांहीं वर नाहीं आलाय."

त्याला तसें बोलतांना ऐकतां ऐकतां एक क्षणभर तो मोठा आणि मी लहान झालें आहे असेंच मला वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

तो स्पेलिंगच्या तर कमाल चुका करीतच असे पण अक्षरहि इतकें घाणेरडें–न लागणारें-काढी, कीं तो काय लिही हें कळतच नसे. एक दिवस मी त्याला चांगलीच रागावलें व म्हटलें, "टिंच, तूं पहिल्या प्रथम नव्यानें आलास तेव्हां किती रे सुरेख कोरून प्रत्येक अक्षर काढीत असस. आणि आतांच काय झालंय तुला असं त्याह्यला? एकादा कोळी दौतींतून शाईभरले पाय घेऊन तुझ्या कागदावर नाचलाय, असें वाटतें हें अक्षर पाहिलें कीं. तेव्हां नीट पहिल्यासारखें अक्षर काढीत जा आतां." त्यावर टिंचीनें दिलेलें उत्तर मोठें मासलेवाईक होतें.

"अग, चांगलें वळणदार अक्षर काढणें ही युरोपिअनांची तऱ्हा झाली.

अमेरिकनांची नव्हे. इथें असेंच काड्यासारखें त्याह्यचें असतें. मला अमेरिकन मुलांसारखें त्याह्यचें आहे. निराळें नको दिसायला. मग कशाला काढायचें नीट वळणदार अक्षर?”

असो, एवढें खरें कीं शाळेच्या सगळ्या अभ्यासांत आपण चांगलें व्हावें ही त्याच्यांत ईर्षा तर उत्पन्न झालीच. त्याचा परिणाम दिसून आल्याशिवाय राहिला नाहीं. स्पेलिंगमध्यें तो पास झालाच. पण इतरहि सर्व विषयांत तो पास झाला.

त्या दुसऱ्या सहामाहींत, प्रत्येक सहा आठवड्यांच्या प्रगतीचे त्याचे जेवढे अहवाल घरीं आले, त्यांत लागोपाठ तीनदां, तो चांगलाच वर आल्याचें लिहिलें होतें. अभ्यासांतील हुषारीबद्दल त्याचें नांव शाळेच्या वर्तमानपत्रांत आलेलें जेव्हां त्यानें वाचलें तेव्हां त्याला फारच आनंद झाला.

एकूण मला वाटलें होतें, त्याप्रमाणें त्याचा I. Q. होता तर—त्याला बुद्धि होती तर!

टिंचीचें इंग्रजी व्याकरण पक्कें असल्यामुळें सातवी झाल्यावर आठवीला लॅटिन घेण्याची शाळेनें त्याला परवानगी दिली, पण ट्रोचाचें म्हणणें नववी होईपर्यंत गडबड करूं नये असें पडलें. ट्रोचा गणितांतल्या कांहीं खेळांनीं त्याला बीज-गणित शिकवीत होती. आणि बीजगणितांत हा फारच प्रगति करणार असें तिचें भाकीत होतें.

“एवढ्यांतच त्याला हारवर्डला पाठविण्याच्या भरीस नको पडूं” मीं ट्रोचाला बजावलें, “आणि कुणास ठाऊक इंचा म्हणाली तसें व्हायचें असेल तर हा एकाद्या धंद्यांतच पुढें यायचा. सुतारकाम तर फक्कडच करील तो. शिवाय प्रोफेसराच्या दसपट पैसे मिळवील. सुतारकामाला लॅटिन, बीजगणित यांची कांहीं जरूरी लागत नाहीं. कीं लागते?”

“हें बघ एवढ्यांतच नाहीं ना ठरवायचें? अजून वेळ आहे तोंपर्यंत आपण थांबूं ना पाहूं कीं चेंडू कसा उशी घेतो तें!” ट्रोचानें उत्तर दिलें.

टिंचीला जेव्हां ‘क्रीडांगणावरची सुरक्षितता पाहणारा अधिकारी’ म्हणून नेमण्यांत आलें, तेव्हां टिंचीवर तरी त्याचा फारच चांगला परिणाम घडून आला. टिंचीला स्वतःला ह्या अधिकारपदाचा फारच अभिमान वाटे.

निळें फूल व दंडावर सोनेरी पट्टा असें त्या अधिकारपदाचें चिन्ह होतें. टिंचीला त्याचा एवढा अभिमान वाटत होता कीं फक्त कामावरच असतांना वापरून त्याचें समाधान झालें नाहीं. घरीं जेवतांना, कचऱ्याच्या टोपल्या बाहेर

नेऊन टाकतांना, घरांतलें इतर काम करतांना, टेलिव्हिजन पाहतांना सुद्धां त्यानें तें चिन्ह तसेंच ठेवलें होतें. पहिल्या दिवशीं रात्रीं तर अखेर त्यानें मला विचारलें, “मी जर रात्रीं निजतांना हें अधिकारचिन्ह असेंच घालून निजलों तर चालेल काय ?”

“हो, अगदीं चालेल.” मीं त्याला उत्तर दिलें. “‘डॉक्तार’ तर बिछान्यांत निजतांना सुद्धां तें बांधून निजला होता. तुझ्याच वयाचा होता तेव्हां.”

“मग मी सुद्धां तसाच निजेन. मला तसें करतात कीं नाहीं एवढेंच पाहिजे होतें.”

यानंतर टिंचीला लोकशाहीचे धडे मिळायला सुरवात झाली.

शाळेच्या फाटकाजवळ, आपलें अधिकारचिन्ह लटकावून जेव्हां टिंचीची स्वारी नव्यानें उभी राहिली, तेव्हां तो अधिकार त्याच्या डोक्यांत चढल्याशिवाय राहिला नाहीं. जो येईल त्यावर त्यानें आपला अधिकार गाजवायला सुरवात केली.

एक नववीचा मुलगा नियमाविरुद्ध क्रीडांगणावर सायकल घेऊन आला.

टिंचीचें काम प्रत्येकजण शाळेच्या क्रीडांगणाशीं आला कीं खालीं उतरतो कीं नाहीं हें पाह्यचें होतें. हेतु इतकाच कीं, पहिल्या वर्गाच्या मुलांना लागूं नये किंवा इतरहि कोणत्या वर्गातील मुलाच्या बाबतींत कांहीं अपघात होऊं नये.

त्या नववीच्या मुलाला नियमाविरुद्ध क्रीडांगणावर सायकल फिरवतांना पाहिल्याबरोबर टिंचीनें फारच अधिकारानें ‘उतरतोस कीं नाहीं तुझ्या सायकलवरून’ म्हणून त्याला दम भरला.

त्या मुलानें त्याच्याकडे काडीइतकें लक्ष न देतां खुशाल सायकल चालू ठेवली.

“बघ, उतरतोस कीं नाहीं? नाहींतर तुझं नांव टिपीन बरं.” टिंचीनें त्याला ताकीद दिली.

टिंचीचा करडा सूर त्या मुलाला बिलकूल आवडला नाहीं, तो तसाच निघून गेला.

“बघ, तुझा नंबर टिपून घेतोंय नी तुझं नांव पण वरती पाठवतोंय.” टिंचीनें ओरडून त्या मुलाला सांगितलें व नियम मोडणाऱ्या मुलांच्यांत त्याचें नांव घातलें.

तें पाहतांक्षणीं तो मुलगा तसाच सायकलवरून टिंचीकडे आला नी त्यानें टिंचीचें पान फाडून ते तुकडे गवतावर फेकून दिले. आतां टिंचीचा पारा चढूं लागला. “थांब, मी दुसऱ्यांदां लिहतों तुझं नांव” टिंची ओरडला.

इतक्यांत तो मुलगा टिंचीजवळ येऊन म्हणतो, "जा रे, माझें नांव लिहणाऱ्या, तुला माहीत नाहीं का मी कोण आहे तें? तुला माझें नांव मुळीं टिपतांच नाहीं येणार!"

लगेच मुलांची गर्दी जमली. "तुला याचें नांव टिपतां यायचें नाहीं, आंद्रि" एका मुलानें आंद्रिसला सांगितलें.

"कां नाहीं? मी जरूर टिपीन."

"शक्यच नाहीं तुला टिपणें." अपराधी मुलगा टिंचीला चिडवीत बोलूं लागला.

"कां नाहीं याचें नांव टिपायचें? यानें नियम मोडला, सायकल आंत चालवली, तेव्हां माझें अगदीं बरोबर आहे, याचें नांव टिपलेंच पाहिजे."

"जा रे, तुला माहिती आहे का, मी विद्यार्थी शासन मंडळाचा अधिकारी आहें तो!" मुलानें हेटाळणीच्या स्वरांत उत्तर केलें.

"हो अगदीं बरोबर. तो मुळीं अधिकारी आहेच." दुसरीं कित्येक मुलें एकदम ओरडलीं. "ए पागल, अशा अधिकाऱ्याचें कुठें नांव टिपतात का?" मुलांत हशा पिकला.

"तें मला कांहीं माहीत नाहीं. ह्यानें चूक केली आहे. चूक करणारा, मग तो कुणीहि असो, नांव टिपलेंच पाहिजे. अधिकारी वा दुसरे, सगळे सारखेच आहेत इथें."

"असं तुला वाटतंय" फिरून मुलांचा गलका सुरू झाला. मधून मधून 'कशी जिरली' म्हणूनहि आरोळ्या ऐकूं येऊं लागल्या.

"हें बघ, तुला माझें नांव टिपतां येणार नाहीं. व्यर्थ टिपूं नकोस." अधिकारी मुलानें मोठ्या तोऱ्यानें बजावून सांगितलें.

"वाः, अधिकारी झालास म्हणून सायकल फिरवून मुलांना अपघात करणार कीं काय? मोठा आलाय! तें कांहीं नाहीं, मी जरूर तुझें नांव टिपणार! हें बघ टिपलेंच." असें म्हणून टिंचीनें फिरून त्याचें नांव टिपलें. त्या मुलानें तें फिरून फाडून टाकलें.

"अस्सं काय, मग शाळेच्या 'प्रिन्झिपालांकडेच' जातों नी हें सारं त्यांना सांगतों बघ."

"जा तर खरं, कान उपटून हातांत देईन लक्षांत ठेव."

"उपट तर मग. हा मी चाललों."

आणि टिंची खरोखरच शाळेच्या मुख्यांकडे गेला. रागांतच त्यानें मुख्याधिकाऱ्यांच्या खोलींत प्रवेश केला.

"काय झालें ॲन्डी ?" त्यांनीं विचारलें.

तोडक्या मोडक्या इंग्रजींत काय झालें तें शाळेच्या मुख्यांना सांगण्यांत आलें. "आणि मला तरी वाटतें कीं चूक केली तरी त्याचें नांव टिपायचें नाहीं असा कोणी बड़ा अधिकारी अमेरिकेंत तरी असूं शकणार नाहीं."

आंद्रिसनें भाषण संपवलें.

"तूं म्हणतोस तें अगदीं बरोबर" 'प्रिन्झिपाल'नीं त्यांला सांगितलें व न्याय्य तें करण्याचें आश्वासन दिलें.

लवकरच एक सभा बोलवण्यांत आली. त्या सभेंत विशेषाधिकाराच्या प्रश्नावर खल होऊन टिंचीच्या मनासारखा त्याचा शेवट झाला.

लोकशाही म्हणजे काय, हें टिंचीला कळलें आणि तें सुद्धां त्याचें पारडें वर राहून.

त्या नववीच्या वर्गातील 'अधिकारी' मुलाच्या बाबतींत एवढें निश्चितपणें म्हणतां येईल कीं त्या मुलालासुद्धां आपल्या जबाबदारीची जाणीव नव्हती असें नाहीं. पण आमच्या या क्रीडांगण पोलिसानें दमबाजी न करतां जरा नरमाईनें त्याला सांगितलें असतें तर त्यानें खास ऐकलें असतें. पण टिंची आपल्याला मिळालेल्या अधिकारानें इतका चढून गेला होता कीं, त्यानें नवव्या वर्गाच्या मुलाला एकदम दमबाजीच्या भाषेंत, दरडावूनच सांगायला सुरवात केली आणि तें ऐकून घेणें ह्या मुलाला कधीं शक्यच नव्हतें.

खरं म्हणजे प्रत्यक्ष चूक दाखविण्यापेक्षां, टिंचीचा बोलायचा स्वरच अधिक बोचणारा होता. त्यामुळेंच तोहि मुलगा ऐकेनासा झाला. इतरहि मुलांनीं त्या मुलाची बाजू घेतली, त्याचें मुख्य कारण हेंच होतें.

बोलायचा स्वर! माणसाच्या बोलायच्या स्वरांत काय जादू असते! प्रत्यक्ष शब्दांपेक्षां बोलणाऱ्याच्या स्वरानेंच कितीदां राग उसळतो किंवा शांत होतो. टिंचीचें बरोबर असलें तरी प्रशियन अधिकाऱ्यासारख्या त्याच्या दरडावणीमुळें मुलें चिडलीं व त्याच्याविरुद्ध झालीं. ज्या सभेंत विशेषाधिकारावर खल होऊन त्या मुलाचें असें करणें बरोबर नाहीं असें ठरविण्यांत आलें त्याच सभेंत टिंचीचीहि चूक त्याला दाखविण्यांत आली.

यानंतर सातवींतून आठवींत जायला लागणाऱ्या एका वर्षांत टिंचींत किती फरक पडला, हें पाहणें जरा मनोरंजक होईल.

याहि वर्षी सप्टेंबरमध्यें शाळा सुरू झाल्यावर टिंची गेल्या वर्षीसारखाच क्रीडांगणावर अधिकारी म्हणून उभा राहिला. पण या वर्षी तो आठवींत गेला होता. मागल्या वर्षाप्रमाणें आपलें अधिकारचिन्ह दाखविण्याची ऐट त्याला राहिलेली नव्हती. त्यामुळेंच कीं काय, त्यानें तें दंडावर बांधलें सुद्धां नाहीं. मीं जेव्हां त्याला विचारलें, तेव्हां चुरगळलेलें तें फूल व पट्टा मला त्यानें खिशांतून काढून दाखविला.

"कां रे, बांधलास कां नाहीं पट्टा?"

"आमच्या वर्गाचीं मुलें नाहीं बांधीत. फक्त सातवींतलीं नवीं मुलेंच पट्टा बांधून ऐटी दाखवीत फिरतात." असें म्हणून त्यानें तें पदचिन्ह फिरून खिशांतच ठेवलें.

याहि वेळेला एका खालच्या वर्गातील मुलानें सुरक्षिततेच्या नियमबाह्य वर्तन केलें, म्हणून टिंचीची व त्याची चकमक उडालीच. पण यावेळची त्याची वागणूक फारच वेगळी होती.

"मीं त्याला चारदां खालीं उतर म्हणून सांगितलें, पण तो 'जाम' ऐकेना. मी चारदां त्याचें नांव टिपूं शकलों असतों. पण अखेर टिपलेंच नाहीं."

"कां रे?"

"अग तो अजून नवा आहे आणि त्याचे वडील पोलिसांत आहेत."

आतां पोलिसाचा मुलगा म्हणून स्वतःच टिंची विशेष सवलती द्यायला लागला वाटतें?—असें माझ्या मनांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. म्हणून मीं मुद्दामच त्याला डिंवचलें: "असतील त्याचे वडील पोलिसमध्यें—म्हणून काय झालें?"

"थांब, तुला जरा समजावून सांगतों. अग, त्याचे वडील खरे, खरे पोलिस आहेत. मी काय नुसता शाळेंतला पोलिस. मी नवीन जेव्हां इथें आलों, तेव्हां मला वाटे, हे पोलिस मनांत आलें तर बंदूक झाडून मारूनसुद्धां टाकतील. पण आतां मला कळलें कीं, गर्दीत मुलांना लागूं नये किंवा त्यांच्यामुळें दुसऱ्या कुणाला सुद्धां लागूं नये, अपघात होऊं नये, हें पाहाचें मुळांत त्यांचें काम असतें. तसेंच माझें. मीसुद्धां शाळेंतला पोलिस असलों तरी उगीच मुलांना ढकलून उपयोगी नाहीं. कोणा मुलांना दुखापत होऊं नये किंवा त्यांनीं कुणाला दुखापत करूं नये, एवढें पाहण्याचें माझें काम आहे. म्हणूनच मला वाटलें कीं, हा नवीन पोरगा आहे, त्याला कळत नाहीं. पण त्याच्या वडलांना हे नियम कां, तें कळतें. त्यांनीं सांगितलें तर त्याला समजेल. म्हणूनच तो ऐकेनासा झाला तेव्हां मी त्याच्या वडलांकडे गेलों. मी त्यांना ओळखीतच होतों. त्यांना म्हटलें, 'पाहा; तुमच्या मुलाला

हे नियम माहीत नाहींत. तुमच्यासारखे मोठे पोलिस त्याला नीट समजून सांगायला असल्यावर मी काय सांगणार? म्हणून त्याला सांगा कीं, शाळेच्या पोलिसाचें सुद्धां ऐकलें नाहीं तर एक दिवस त्याला दुखापत होईल. म्हणून सांगतों आहें मी, पण त्याला कळत नाहीं. त्याला वाटतें मी उगाचच दम भरतों आहें. म्हणून तुमच्याकडे आलों एवढेंच.' त्या पोलिसानें उलट 'बरें केलेंस' म्हणून माझे आभार मानले, आणि आपल्या मुलाला समजावून सांगितलें. तेव्हांपासून तो मुलगा आतां माझें चटकन ऐकतों. बघ, तंटा नाहीं, भांडण नाहीं. त्याशिवाय साधलें सारें. मीं त्याचें चारदां नांव टिपलें असतें, वरतीं कळवलें असतें, तर मला चिडवण्याकरितां मुद्दाम त्यानें माझें ऐकलें नसतें. आतां त्याच्या वडलांनीं बरोबर काय तें त्याला सांगितलें तेव्हांपासून अगदीं निमूटपणें नीट वागतो. मला तरी वाटतें नांवें टिपून तीं वर पाठविण्यापेक्षां असें करून घेतलेलें जास्त बरें नाहीं का?"

या सगळ्या प्रकरणांत त्याची सारासार विचार करण्याची ती शक्ति पाहिली नी मलो पूर्वींची एक आठवण झाली. तो अगदीं नवीन असतांना त्याच्या मानसिक व बौद्धिक चाचणींतून ह्या मुलाला सारासारविचारशक्ति अजिबात नाहीं असा अहवाल देण्यांत आला होता. किती चूक होती त्यांची! आज या मुलामध्यें नुसती विचारशक्तीच दिसून येत नव्हती, तर गेल्या एका वर्षाच्या अवधींत ती विचारशक्ति चांगली प्रगल्भ होत असल्याचें सुद्धां दिसून येत होतें.

आठव्या वर्गाच्या सुरवातीला त्याची एकंदर मानसिक वाढ वरच्या पायरीपर्यंत आली. तथापि साऱ्या गोष्टी नीट समजावून घ्यायच्या म्हटल्या, तर फिरून सातवीचें वर्ष एकदां डोळ्याखालून घालणें जरूर आहे.

मुलांच्या वाढीविषयीं सारें नीट कळून घ्यावयाचें म्हटलें तर मुलींचा उल्लेख अवश्य पाहिजेच. त्याशिवाय त्यांच्या वाढीला पूर्तता येत नाहीं.

मुलींच्या बाबतींत सांगायचें तर मुलींना टिंची आवडे त्याचप्रमाणें टिंचीला पण मुली आवडत.

"ए, रंगारंगाचे कपडे घातले कीं पोरी किती छान दिसतात नाहीं! मला त्यांचे केस फार आवडतात. किती छान, मऊमऊ आणि चकाकतात, नाहीं?" तो मला नेहमीं सांगे.

पण या दिवसांत मी टिंचीला नृत्याच्या शाळेंत जाऊं देत नसें. एक तर तो फारच बेशिस्त असून कसा वागेल याचा कांहीं नेम सांगतां येत नसे. शिवाय मुलींच्या अशा सहवासाचा त्याच्यावर भलताच परिणाम होऊन आधींच बिघडलेलें

काम फारच चमत्कारिक तऱ्हेनें भडकण्याचा संभव होता. आणि तसें झालें असतें तर मग मात्र मला त्याला कोणत्याच तऱ्हेनें आळा घालतां आला नसता. म्हणून स्त्रीपुरुषांच्या मिश्र समाजांत त्याला मिसळूं देण्यापूर्वीं तो बराच ताळ्यावर येणें, साधारण मुलासारखा होणें जरूर आहे, असें मला मनापासून वाटत होतें. या कारणानें कांहीं दिवस तरी तो अशा संमिश्र समाजापासून दूर राहिला. असा संमिश्र समाज बहुधा नाचायच्या वर्गांतूनच एकत्र येतो. तो सहाव्या वर्गात असतां एका लहान मुलीनें नृत्यशाळेच्या एका समारंभाला आपला जोडीदार म्हणून येतोस का, असें त्याला विचारलें होतें. जरूर तर तिची–पन्नास सेंटची–हातखर्चाची रक्कम पण त्याला देऊं करायचें तिनें कबूल केलें. पण टिंची फारच लाजाळू. आपला लाजाळूपणा लपवण्याकरतां भसाड्या आवाजानें, 'मला अभ्यास करायचा असल्यानें यायचें नाहीं' म्हणून त्यानें तिला सांगितलें.

या उत्तरानें त्या मुलीची माझ्याविषयीं काय कल्पना झाली असेल याची कल्पनाच न करणें बरें.

मुलावर अभ्यासाचें ओझें लादून त्याला नाचायला सुद्धां जाऊं न देणाऱ्या खाष्ट सावत्र आईप्रमाणें तिनें माझें चित्र रेखाटलें असलें तर त्यांत कांहीं नवल नाहीं.

खरं म्हणजे मी त्या समारंभाला त्याला जाऊं दिला असता. पण तोच लाजाळूच्या झाडाप्रमाणें जो लाजला, तो जायला कबूलच होईना.

यानंतर पुढच्या वर्गात गेल्यावर "अहाहा, पोरींचे नुसते चेहरे नी पोषाक पाहून घ्यावे, एरवीं अगदींच बथ्थड, पगल्या." असें त्याच्या तोंडून उद्गार निघूं लागले.

ज्युनियर हॉलमध्यें आल्यावर मात्र आतां तो मुलींना 'पगल्या' म्हणेनासा झाला. उलट इतर मुलांप्रमाणें त्याचीं पुस्तकें शाळेंतून न्यायचीं आणायचीं, इ. दाक्षिण्याच्या तऱ्हा सुरू झालेल्या दिसून येऊं लागल्या. तेव्हां मात्र मीं ठरवलें कीं, आतां जरी हा नाचायला शिकला तरी बिलकूल हरकत नाहीं. टिंची फारच आवडीनें नाच शिकूं लागला.

मुलामुलींच्या नाचायच्या समारंभाचीं आतां ह्याला बोलावणीं पण येऊं लागलीं. खूपच मजा वाटे त्याला अशा पार्टीची. एक दिवस असाच एका पार्टीहून जाऊन आल्यावर मला म्हणतो, "मी आज पहिल्यांदाच अशा पार्टीला गेलों, नाहीं का ग? पण खूप मजा आली होती!" सांगतां सांगतां सुद्धां त्याचे डोळे आनंदानें

लकाकत होते. “पण तुला सांगूं, पार्टी संपल्यावर फारच अस्ताव्यस्त झालें होतें तें घर. सगळीकडे कागद, सान्या वस्तु पडलेल्या. खुर्च्या टेबलें पार अस्ताव्यस्त झालेलीं. तेव्हां मीं म्हटलें, जरा थांबून या मुलीला मदत करावी. आणि मी किनई थांबून तें ठाकठीक लावलें. काय ग, पण असें करायचें असतें कीं नाहीं? का चुकलें माझें? मला तरी असें वाटलें कीं, सगळें फिरून ठाकठीक करायला कांहींच हरकत नाहीं, म्हणून मीं केलें त्यावेळीं.”

त्याच्या त्या करण्यांत मला कांहींच गैर दिसेना. म्हणून मी पण ‘सब ठीक’ असल्याचा त्याला निर्वाळा दिला.

याच सुमाराला शाळेच्या संघामधून खेळण्यांत काय मजा असते याचा टिंचीला शोध लागला. आतांपावेतों टिंची खेळायचा—पण मनापासून नाहीं. आतांशा त्याला ‘सॉकर’ (Soccer) चें वेड लागलें होतें. “मला भारी आवडतो तो खेळ” तो मला सांगूं लागला. “आणि तुला माहित नाहीं, मी खेळतों पण छान. आज मीं सात गोल केले नी आम्ही जिंकलों. किती मजा येते अलिकडे! पूर्वी नसे इतकी मजा वाटत. सॉकर, नाच, पार्ट्या, ‘मस्त मजा’ येते सान्यांत! किती गंमत नाहीं! का ग, पूर्वी कां ग मी ह्या सान्या गोष्टींत भाग घेत नसें?”

“वाः, तेंच तूं करावेंस म्हणून आम्ही सारे प्रयत्न करीत होतों. आतां वाटते ना मजा! हेंच व्हायला पाहिजे होतें.”

“वाटते तर! खूपच मजा वाटते!”

आतां टिंची शाळेंतून आला कीं ‘काय म्हणते शाळा?’ हा प्रश्न आम्हीं करायचा असा परिपाठच पडल्यासारखा झाला. शाळेचें वर्ष संपत आलें. टिंची घरीं आला असतां आमच्या नेहमींच्या प्रश्नानें त्याचें स्वागत झालें. पण नेहमींसारखें ‘वा मजा आली आज’ एवढेंच म्हणून टिंची थांबला नाहीं. आपल्या मजेदार इंग्रजींत “आज मी शाळेंत सगळ्यांचा ‘आवडता’ होतों.” त्यानें आम्हांला सांगितलें.

“मजाच झाली तुझी!” म्हणून आम्ही हसूं लागलों.

“वाः, असें आवडतें झालें कीं, पोटांत कितीऽऽ बरें वाटतें” असें म्हणून तो आपल्या मध्यावरून हात फिरवूं लागला. “वाटतें, नेहमीं सर्वकाळ आवडतेंऽ राहावें!”

“वाः फक्कड होईल असें झालें तर!” आम्ही उत्साहानें भर देऊन बोलूं लागलों. पण ‘थांबा’ अशी हाताची खूण करून टिंची पुढें म्हणतो :

"पण कोण जाणे मला असें वागतां येईल कीं नाहीं तें! फार वेळ मी लोकांचा आवडता झालों कीं कंटाळा येतो मला."

"बरोबरच. कोणतीहि गोष्ट अति झाली कीं होतेंच असें." ट्रोचानें दुजोरा दिला.

१९५३ मध्यें कॅलिफोर्नियामध्यें स्काउटपथकाचा एक मोठा राष्ट्रीय मेळावा करायचा होता. त्याकरतां १९५२ च्या वसंत ऋतूंतच बालवीरचमूंना तयारीचे आदेश देण्यांत आले होते.

माझ्या 'डाक्तार' मुलाचें म्हणणें होतें कीं या मेळाव्याला टिंचीनें अवश्य जावें. "फारच उत्तम होईल तो गेला तर. अमेरिकेंतील कुठूनकुठूनचीं मुलें तेथें येतात. तेव्हां सारी अमेरिकाच टिंचीला तेथें बघायला मिळेल. आणि तसें होणें त्याच्या दृष्टीनें सुद्धां फार जरूरीचें आहे. तेव्हां तूं जरूर त्याचें नांव पाठव." असें त्यानें मला बजावून सांगितलें.

ट्रोचाला सुद्धां तसेंच वाटत होतें.

"मग विहंगमदृष्टीनें कां होईना त्याला अशा मेळाव्यांत अमेरिका म्हणजे काय याची कल्पना येईल आणि न जाणों एकादे दिवशीं तो इथला नागरिक सुद्धां व्हायचें कबूल करील."

तिनें मला सुचविलें, किंबहुना 'धाडच त्याला' म्हणून आग्रह धरला. यानंतर मला नाहीं म्हणणें शक्यच नव्हतें. मीं त्याचें नांव घातलें, एवढेंच नव्हे, त्याच्याकरतां जागा राखावी म्हणून आगाऊ फीसुद्धां भरली. अशा मेळाव्याला बालवीराच्या दृष्टीनें अवश्य लागणारे सारे गुणांक त्याला मिळालेच होते. 'कॅम्पिग'मध्यें तो सर्वांच्या वर होता. चांगल्या वागणुकीचीं इतर शिफारसपत्रें पण त्यानें आतां मिळवलीं होतीं. त्याशिवाय दोन गरुडचिन्हें पण त्याला मिळालीं होतीं. बालवीरांमध्यें या चिन्हांना चांगलाच वरच्या दर्जाचा मान असतो. तरी पण टिंचीनेंच मी नाहीं जात म्हणून स्वतःच कच खाल्ली.

"कां रे?" आम्हीं विचारलें.

"मी तुला सांगतोंच कां तें" त्यानें मला उत्तर केलें.

"तूंच पाहा, इथून पॅसिफिकपर्यंतच्या साऱ्या संस्थानांतील मुलें येणार तिथें. त्या साऱ्या भाषा कुठें येताहेत मला? मला एक न्यू जर्सीची भाषा येते. व्हर्जिनियाची भाषा समजते. नुसती समजते—बोलतां नाहींच येत. कॅलिफोर्नियांत काय

बोलतात कोण जाणे? मला नाहीं त्यांची भाषा येत. अशा वेळीं मी मुलांशीं बोलूं तरी कसा? तीं काय म्हणणार तें मला कळायचें नाहीं, आणि मी काय त्यांना कळायचें नाहीं. नाहीं बुवा, एवढ्या भाषांचें आपलें नाहीं जमायचें. मी म्हणतों तें आपला घरींच राहतों ना!"

"वेड्या, तीं सगळीं मुलें इंग्रजी बोलतात", असें जेव्हां आम्हीं त्याल सांगितलें, तेव्हां त्याचा विश्वासच बसेना.

"काय सांगतेस? खरं कां सांगतेस? साऱ्यांची एक भाषा! सगळ्या संस्थानांची? कमाल झाली बुवा अमेरिकेची म्हणे सगळयांची एक भाषा!"

युनायटेड स्टेट्सच्या भूगोलाबद्दल सर्वसाधारण नीट कल्पना यावीम्हणून त्यानें एक डॉलर पाठवून सगळया संस्थानांतून लायसेन्सच्या छोट्या तबकड्या मागविल्या. त्याचप्रमाणें जेथें जेथें आढळलीं, तेथलीं युनायटेड स्टेट्सच्या माहितीचीं चित्रें पण कापून एक माहितीसंग्रह तयार केला. या साऱ्या गोष्टींनीं बालवीरांच्या मेळाव्याला जायची कल्पना त्याच्या मनांत दृढ होत गेल्यास नवल नाहीं. या सफरींतील आणखी एक प्रमुख कल्पना फारच छान होती. सफरीला एकंदर साडेतीनशें डॉलर खर्च येणार होता आणि सर्वच्या सर्व नसली तरी त्यांतली शक्य तेवढी रक्कम मुलांनीं काम करून मिळवावी अशी चालकांची मूळ कल्पना होती. त्याप्रमाणें मीं त्याला काम करून पैसे मिळविण्यास प्रोत्साहनच दिलें.

"टिंची," मीं त्याला समजावून सांगितलें, "तूं बालवीरांच्या मेळाव्याला जावेंस अशी आमची फार इच्छा आहे. तूं एकदां तिथें गेलास कीं अमेरिका किती प्रचंड आणि सुंदर आहे याची तुला कल्पना येईल. एरवीं नाहीं कधीं येणार. अमेरिकेचे कित्येक भाग अगदीं जर्मनीसारखे सुंदर आहेत. तुला आतां त्याची कल्पना नाहीं, पण तेथें गेलास कीं दिसेल. अमेरिकेविषयीं तुला चांगली माहिती व्हावी अशी आमची फार इच्छा आहे. अमेरिका नुसतीच चांगली नाहीं, कुठेंहि गेलें तरी या देशांत तूं अगदीं सुरक्षित आहेस, म्हणून समज. तेव्हा तूं जाच. पाहा, जाऊन आल्यावर तुला आमचा देश इतका आवडेल कीं, मोठ झाल्यावर तूं इथला नागरिक व्हावें असें तुला वाटेल."

टिंचीला याबद्दल शंका होती, तथापि जाण्याकरतां पैसे जमवायचे ही गोष्ट त्याला आवडत असल्याकारणानें काम करावयाचें हा बेत त्याला अगदीं पसंत पडला.

त्या उन्हाळ्यांत मैदानावरचें गवत कापायचें काम त्यानें केलें. हिंवाळा आल्यावर

रस्त्यावरून बर्फ दूर करायचें काम पण त्यानें अंगावर घेतलें. सकाळीं लवकरच उठून तो रात्रभर बर्फ पडत असलेले रस्ते साफ करायच्या कामाला सुरवात करी. न्याहारीच्या आधीं सारें काम उरकून येई. फावडें घेऊन बर्फ वितळायच्या आंत तो झपाट्यानें बर्फ बाजूला करी. त्यामुळें चांगलेच पैसे मिळत. कधीं कधीं, न्याहारीच्या आधीं आणि शाळेच्यापूर्वी मिळून कांहीं वेळां, जवळ जवळ, तो पांच डॉलरचें काम करी. घराच्या आवारांतले रस्ते साफ करण्यापासून त्याची कामाला सुरवात होई. ह्या घरच्या कामाबद्दल मात्र तो एक पेनीसुद्धां घेत नसे.

"वाः घरच्या कामाबद्दल पैसे घेऊं! तें कांहीं नाहीं. तुझा 'बाप' मेला आहे, तेव्हां मी घेईन आपल्या रस्त्यांची काळजी" तो मला बजावी व पैसे घेत नसे.

शेजाऱ्यांचे लिनोलिअम तो साफ धुऊन पुसून काढी. त्यांचीं इतर कामें करी. जसजसा उन्हाळा येऊं लागला, तसतसें मैदानांतील गवत काढायचें काम मोठ्याच प्रमाणावर सुरू करून त्यानें पैसे मिळवले. अशा रीतीनें काम करून त्यानें जवळजवळ शंभर डॉलर जमा केले. निरनिराळ्या लोकांनीं दिलेले दीडशें असे मिळून त्याच्या जवळ अडीचशें डॉलर जमले. बाकीचे आम्हीं घातले. त्यानंतर स्वतः जाऊन आपल्या प्रवासाचे पैसे त्यानें भरले, त्या दिवशीं त्याला काय अभिमान वाटला! शेवटीं एकदांचा मोठ्या महत्त्वाचा–जायचा–दिवस आला. गणवेषावर नीट नांवें घालून घड्या करून त्यानें ते सामानांत भरले. कॅमेरा व इतर गोष्टी अगदीं तयार ठेवल्या. प्रवासांत पाह्यला असावा म्हणून ट्रोचानें त्याला एक अमेरिकेचा नकाशा पण दिला होता. एकंदरींत सारी तयारी झाली. त्यासरशीं हळूच जवळ येऊन टिंची मला म्हणतो, "तुला म्हणून सांगतोंय, आपण तो नायगाराचा मोठा धबधबा पाहतों ना सिनेमांत, त्याच्या खालीं मुलें बोटीनें गेलीं तरी मी नाहीं जायचा. फारच धोक्याचें आहे तें. मी बिलकुल जाणार नाहीं."

"पण टिंची, सगळे बालवीर जातात, मग काय हरकत आहे?"

"फारच धोक्याचें ठिकाण आहे तें. तेव्हां नकोच. शिवाय मी पॅसिफिक महासागरांत पोहायला पण जाणार नाहीं. मला त्याची कांहींच माहिती नाहीं."

मागली आठवण येऊन हळूहळू त्याच्या डोळ्यांत मिस्किलपणाचें हसूं चमकूं लागलें. "अग, मी पॅसिफिक महासागरापेक्षां बळवान नसेन कदाचित्, मग कशाला?"

मलाहि ती आठवण होऊन हसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं.

"पण टिंची, पॅसिफिक ॲटलँटिकपेक्षां कितीतरी शांत आहे. म्हणूनच तर त्याला पॅसिफिक म्हणतात. पॅसिफिक याचा अर्थच शांत असा होतो."

"असो, पण उगीच कशाला परीक्षा पाहा. तेव्हां मी बहुधा पोहणार नाहीं. हो आणखी एक सांगायचें विसरलोंच. तें मिठाचें सरोवर कीं काय म्हणतात तें, तिथें सुद्धां जायचा नाहीं मी."

"पण त्यांत माणूस बुडत नाहीं, टिंची."

"हो, पण तुला काय माहिती. एखाद्या वेळीं आंत शिरलों तर मिठाच्या दाबामुळें आंतच राह्यचा. बाहेरच येतां यायचें नाहीं मला. तेव्हां नकोच तें."

"अगदीं वेड्यासारखें करतोस तूं कांहीं कांहीं वेळां."

"हं, रागावलीस वाटतें. खुश्शाल रागाव. बघ आणखी कांहीं गोष्टी सांगतों, त्यांनीं तर तुझा पारा चढूनच जाईल. आतां ऐक.

"तें कायसेसें गरम पाणी निघतें म्हणे...घरापेक्षां उंच उडतें तें पाणी... त्याच्याजवळ सुद्धां जायचा नाहीं मी. त्या 'यलो पार्क'मध्यें अस्वलें पाह्यला पण मी नाहीं जाणार. बसच्या खालीं मी मुळीं उतरणारच नाहीं. तेव्हां तुला आतां मी काय काय करणार नाहीं, हें कळलं ना पुरं."

"टिंची, हें करायचें नाहीं, तें करायचें नाहीं, हें पाह्यला जायचें नाहीं, मग सफरीला जाण्यांत काय अर्थ?"

तो हसूंच लागला.

"खरं सांगूं का तुला, मला किनई भीति वाटते. कोंबडीच्या पिलासारखं धडधड होतं आंत." असें म्हणून तो फिरून हसूं लागला.

यावेळेला मागल्या सारख्या 'नकार घंटा' वाजत नव्हत्या. पश्चिमेच्या जंगलांची आपल्याला भीति वाटते असें सरळपणें तो कबूल करीत होता.

असो 'आंत धडधडत' असतांहि जायच्या दिवशीं मुलांबरोबर जातांना तो मोठ्या खुषींत होता. सगळ्या बालवीरांच्या घरची मंडळी त्यांना निरोप द्यायला आली होती. त्यांचें जड सामान आधींच पुढें धाडून दिलें होतें. मुलांजवळ सैन्यांतल्या शिपायासारख्या फक्त 'हातपिशव्याच' तेवढ्या होत्या.

ट्रोचानें मला सांगितलें कीं पिशवी भरतांना टिंचीनें आवश्यक म्हणून पहिली कोणती गोष्ट घातली असेल तर ख्रिस्त व मेरीची प्रतिमा आणि नंतर मग दांत घासायचा ब्रश, पैजामे, साबू, टॉवेल, स्वच्छ मोजांच्या जोड्या, आणि एक आंत घालायची चड्डी. टिंचीच्या मनाची घडी आतां व्यवस्थित बसल्यामुळें अधिक

चड्डया घालायची त्याला पूर्वीसारखी जरुरी वाटत नव्हती.

बालवीरांची खास आगगाडी आली. टिंची वर चढला. चढल्यावर माझा निरोप घेतांना हळूच मला म्हणतो, "मी जातों आहें पण मला घर सोडतांना वाईट वाटतंय. उद्यां तूं कांहीं दिसायची नाहींस."

"वेड्या, तूं सफरीवरून ये आणि बघ मी येथें असेन कीं नाहीं. तूं गेलास कीं मला सुद्धां भारी अवघड वाटेल, पण तूं जा. सारें पाहून ये. मजा कर."

"मी तुला रोज पत्र धाडीन बरं" जातांना त्यानें मला ओरडून सांगितलें. त्यावेळीं तरी तो खरोखर रोज पत्र लिहील हें मला खरें वाटलें नाहीं.

वास्तविक टिंची आपला शब्द विसरत नाहीं हें माहीत असल्यानें तो म्हटल्या-प्रमाणें न चुकतां पत्र धाडील हें मला कळायला पाहिजे होतें. त्यानें तसें पत्र धाडलेंहि.

नायगाराहून ट्रोचाला त्याचें कार्ड आलें.

"तुला माहीत आहे .

*मला काय झालंय तें ?*

"कागद नसल्यानें मला कॅनडांत जातां येणार नाहीं असें म्हणतात."

पण दुसरें कार्ड आलें त्या कार्डांत :

"मी कानडामध्यें आनंदानें आहें" असें त्यानें मला लिहिलें. हा काय गोंधळ झाला हें आम्हांला कळेना.

"काय ग, कागदपत्र नसतांना हा नायगाराच्या धबधब्याखालून गुपचूप सरपटत सरपटत तर कानडांत नाहींना शिरला?" माझ्या मनांतील कल्पना मीं ट्रोचाजवळ बोलून दाखविली. पण लवकरच सगळा उलगडा झाला. आमचा जिमी जॉन बालवीरांबरोबर एक सल्लागार म्हणून गेला होता, त्यानें आम्हांला सारी हकीकत सांगितली.

कॅनडांत प्रवेश करायच्या वेळीं तेथल्या जकातीच्या अधिकाऱ्यांनीं मुलांना तुम्ही कुठें जन्मलां असें विचारून एकेकाला सोडायला सुरवात केली.

"काय रे ॲन्डी, तूं कुठेंतरी युरोपांत जन्मलास नाहीं का रे?" बरोबरच्या एका मुलानें ॲन्डीला प्रश्न केला. तेवढ्यांतच मास्तरांनीं त्याला दाबलें नी आन्द्रीसला म्हटलें, "हें बघ, तूं कांहीं तसें सांगू नकोस. उगीच हे लोक अडवतील आपल्याला. आणि मग किती खोळंबा होईल कोण जाणे. सारेंच आपलें वेळापत्रक बिघडेल. तेव्हां म्हण मी न्यूजर्सींतच जन्मलों, झालें."

हें सांगण्यांत मुलांना खोटें बोलायला शिकवायचा कांहीं त्या मास्तरांचा हेतु नव्हता. निर्वासिताच्या सगळया हकीकतीची जरुरी तर तेथें नव्हतीच. त्यामुळें झाला तर फक्त खोळंबाच होईल व त्यानें पुढचें वेळापत्रक बरोबर साधणार नाहीं, या एका गोष्टीला ते अधिक भीत होते. म्हणूनच त्यांनीं ॲन्डीला तसें सांगितलें. पण ॲन्डीला हा कुठला पांचपोच! तो चांगलाच रागावला.

"वा, तुम्ही स्वतः बालवीर व बालवीरचमूचे एक अधिकारी असतां, मला खोटं बोलायला कसं सांगतां? बालवीर खरं बोलतो हें तुम्हांला माहीत कसं नाहीं? तें कांहीं नाहीं. मी खोटं सांगणार नाहीं. आणि समजा मी एक वेळ सांगितलें कीं मी न्यूजर्सीमध्यें जनमलों तरी माझ्या बोलण्याचें काय? माझ्या चमत्कारिक बोलण्यावरून ते ओळखणार नाहींत का? तेव्हां मी खरें तेंच सांगेन."

आणि त्यानें तेंच केलें. अधिकाऱ्यानें तूं कुठें जन्मलास, असा प्रश्न केल्याबरोबर टिंचीनें सरळ 'लटाव्हियांत' म्हणून उत्तर दिलें. व आणखीहि पुस्ती जोडली कीं "सध्यां माझा देश रशियानें घेतला असल्यामुळें कदाचित् मी रशियाचाच प्रजाजन असेन."

या उत्तरासरशीं आगींत तूप पडल्यासारखें अधिकाऱ्यांच्यांत झालें. त्या डोंगर-माथ्यावरचें पोलिसदल रशियन हेराला पकडायला क्षणांत सज्ज झालें असल्यास नवल नाहीं.

त्या ठिकाणीं खोळंबा तर झालाच. अधिकाऱ्यांनीं आपसांत खूप खलबतें केलीं, फोनाफोनी झाली. अखेर कॅनेडानें तो बालवीर आहे या एका गोष्टीमुळें त्याला जाण्याची परवानगी दिली व सारी सफर अखेर ठरल्याप्रमाणें निघाली.

मला वाटतें त्या दिवशीं अमेरिकेचे कागदपत्र आपल्याजवळ असणें बरें, ह्या गोष्टीची ॲन्डीला अंधुकशी जाणीव झाली. वास्तविक या अफाट जगांत तो कोणाचा नव्हता कीं त्याचेंहि कोणी नव्हतें. त्याचें त्यालाहि हें पक्कें माहीत होतें. म्हणूनच 'येथलें' होण्याची कल्पना त्यावेळीं त्याच्या मनाला शिवली असली पाहिजे.

त्यानंतरचें त्याचें पत्र ग्रॅन्ड कॅनिअनचें होतें. एक ट्रोचाला नी एक मला.

"तूं म्हणालीस तें खरें.

*ग्रेट कॅटन सुरेख,*

*सुरेख, सुरेख आहे."*

ट्रोचाच्या पत्रांत त्यानें लिहिलें होतें.

आणि मला

*"अमेरिका ठीक आहे.*
*फारच सुरेख, कधीं*
*एवढी पाहिली नव्हती सुरेख अमेरिका."*

"तिथल्या निळ्या अनंत आकाशाच्या विस्ताराकडे पाहून बहुधा हे 'सुरेख' लिहलंय," ट्रोचानें पत्र पाहून उद्गार काढले.

इतक्या भराभरा दिवस गेले कीं आम्हांला कळायच्या आंत आंद्रितिनिसचा परत यायचा दिवससुद्धां येऊन ठेपला. बाकीची सगळी मंडळीं समुद्रकांठीं होती. तो यायच्या दिवशीं मी मात्र मोटरनें त्याला गाडीवर आणायला गेलें.

बालवीरांच्या व त्यांच्या घरच्या माणसांच्या गर्दीत मी दूर, एका टोंकाला उभी असल्याचें, त्यानें पाहिलें आणि उतरून धावत धावतच तो माझ्याकडे आला. आल्यावर एकदम त्यानें मला मिठी मारून मुके घ्यायला सुरवात केली.

टिंचीच्या खांद्यावरून माझी नजर जरा इकडे तिकडे फिरते आहे तों मला कोण दिसलें ? टिंचीचे मागले स्काऊटमास्तर. "निदान तुम्ही तरी असें वागून त्याला शरमिंदा करणार नाहीं", असें म्हणणारे मास्तर. टिंचीकडे पाहून त्यांना कमालीचें हसूं येत होतें. मीहि त्यांना एका डोळ्यानें हळूच पाहत असल्याची जाणीव दिली, पण सारें लक्ष मात्र टिंचीवर केंद्रित केलें.

टिंची प्रवासांतल्या गमती गमती सांगत होता.

"बाई, तुला सांगूं का ? बरें वाटेल तुला ऐकून. अखेर धबधब्याखालीं बोटींत बसून गेलों होतों मी मुलांबरोबर. पॅसिफिकमध्यें पोहलों सुद्धां. आणि त्या मिठाच्या सरोवरांत पण पोहलों. खरंच त्यांत माणूस आंत नाहीं जात. मी तर त्या पाण्यावर चक्क बसलों. खुर्चीत पाठ टेकतात ना तशी पाठ टेकली. आणि ट्रोचानें दिलेला नकाशा काढून कुठें आलोंय हें पाहत बसलों. त्यांत तें सरोवर पण दिलंय. आणि मी त्याच सरोवरांत बसलों होतों नकाशा उघडून. हसतेस तूं, पण खरं, अगदीं खरं...आणि तें गरम पाणी ? यलोपार्कमध्यें आहे तें गरम पाणी. घरांइतकं उंच उडतं ग. आणि तिथें किनई आम्हीं आस्वलं पाहिलीं. मला अगदीं भीति वाटली नाहीं पाहतांना. आतां नाहीं धडधड होत. आतां गेलं तें सगळं."

"वा, छानच झालं. टिंची, इतका तूं शूर झालास हें काय कमी आहे? सगळे प्रवासाचे पैसे यांतच वसूल झाले असं वाटतंय मला."

"ए, आणखी ऐक ना. प्रवासांत किनई आम्ही अशा रांगाच्या रांगा लावीत असूं नी कित्ती वेळ उभे राह्यचों. पण मला त्याचें कांहींच वाटलं नाहीं. खरं सांगतों, मी कध्धीं गडबड केली नाहीं. वेळ लागला तर लागला, काय मोठंसं, असं वाटायला लागलं मला. काय वाटतं तुला? चांगलं झालं कीं नाहीं हें?"

"वाः, फारच छान."

"आणखी सांगूं तुला?"

"हो तर."

"तिथें मेळाव्यांत मी एकाहि मुलाशीं भांडलों नाहीं कीं मारामारी केली नाहीं. जरा चिडतों आहें असं वाटलं कीं माझ्या बिछान्यांत शिरून गुडुप्प बसायचों. सांग, चांगलं केलं नाहीं?"

"उत्तम केलंस अगदीं."

"बरं मग तुला आणखी मजा सांगतों तर. तूं हसशील मला. मी आतां माझे बूट पॉलिश करतों. अगदीं वेड लागल्यासारखे पॉलिश करतों. इतके कीं चकाकतात ते." मला हसलेली पाहून त्याला पण आनंद झाला. "तुला माहीत नाहीं कां तें. आमची बालवीरांची रोज तपासणी असते. त्यांत लिहिलंय बूट अगदीं लख्ख पाहिजेत. तेव्हां काय? मी काढतों लख्ख—चकचकीत. पण आतां तुला सांगतों ना ती तर याहून मज्जा!!!

"तिकडे असतांना किनई, माझे सगळे पैसे संपले. तुला म्हणून सांगतों, मीं खिसमसकरतां भेटी घेऊन ठेवल्या आहेत प्रत्येकाकरतां. मग मजजवळ तर पैसे नव्हते. मीं पाहिलें मुलांना चकचकीत बूट काढतांच येत नसत. आवडतच नसे त्यांना. मीं म्हटलं मला द्या. मी करतों चकचकीत. मात्र त्याचे पैसे द्या म्हणजे झालें." असें म्हणून त्यानें आपल्याजवळचे खिशांतले पैसे खुळखुळवले व मला सांगितलें कीं एवढेंच नाहीं आणखी पाकिटांत पण आहेत.

"पण काय रे, तूं तर अगदीं नाखूष असस हें काम करायला?"

"तें आतां सांगतों मी. जर्मनींत किनई, आम्हांला अधिकारी आपले बूट पॉलिश करायला देत. खूप उंच बूट असत ते. मला त्यांचे बूट साफ करायचें जिवावर येई. मी घासून, घासून, घासून स्वच्छ करीत असें. तरी जोरानें घाशीत नाहीं म्हणून मला मार बसे. एक अधिकारी तर पट्ट्यानें मला मारी. त्याच्या टोंकाचें बकल एवढें लागे कीं विचारूं नकोस. तेव्हांच मी मनांत अगदीं निश्चय

केला कीं इथून सुटून एकदां अमेरिकेंत गेलों कीं कध्धीं कुणाचे बूट या जन्मांत पॉलिश करणार नाहीं."

"पण मग आतां?"

"मला दुसरं कुणी थोडंच करायला लावतंय? मी आपण होऊन करतोंय! माझे बूट पण मी कसे लख्ख ठेवले आहेत ते पाहा तरी. खरंच बघ." असें म्हणून त्यानें आपले बूट मला दाखविले.

"सुरेख." मीं शाबासकी दिली.

"हें बघ, आतां मीं सारी अमेरिका पाह्यलीय. खरंच—खूप मोठी, खूप सुरक्षित, आणि खूप सुरेख आहे अमेरिका. मी आमच्या गाडींतून बाहेर पाहत असें तेव्हां माझ्या मनांत येई 'खरंच मी मोठा झाल्यावर इथलाच नागरिक होईन, ते सारे 'कागद' मिळवीन.' कसं काय वाटतं तुला? आवडलं हें?"

"हो भारी."

"तुला मी लटाव्हियाला गेलेला आवडेल कीं इथें राह्यलेला आवडेल?"

"इथें."

त्याचें हें बोलणें ऐकून मला टिंचीची पूर्वीची आठवण झाली. आणि "मला आवडतें. मी मुका घेतें. मी ठेवतें" पूर्वीच्याच शब्दांत त्याला मीं उत्तर दिलें.

टिंची या प्रेमळ घरांत आल्याला चार वर्षें लोटलीं. आज तो पाहा पंधरा वर्षांचा आंद्रिस कसा उंच, सोटासारखा ताठ उभा आहे तो!

त्याच्या चेहऱ्यावर निर्वासिताची एवढीशी सुद्धां छटा राहिलेली नाहीं. घरचाच असा तो एक आहे आतां. युनायटेड स्टेट्सचें नागरिकत्व पत्करून आपलें पुढील आयुष्य इथला नागरिक म्हणून घालवायला आज तो आपखुषीनें व आनंदानें तयार झालेला आहे.

या 'सुरेख अमेरिकें' त त्याचा भावी आयुष्यक्रम कसा जाईल हें आत्तांच सांगणें कठीण असलें तरी एवढें निश्चित कीं, मानाचें आणि स्वतंत्रतेचें असें जिणें तो इथें जगेल!